Nivadaka lekha

# निवडक लेख

Ganesh Hari Khare

**गणेश हरी खरे**

भा. इ. सं. मंडळाचे अभिरक्षक व एक कार्यवाह; पुणें
विद्यापीठांत मराठी इतिहासाच्या पदव्युत्तर
संशोधनाचे अधिकृत मार्गदर्शक अध्यापक;
पन्नास लहानमोठीं पुस्तकें व ३६०
लेख यांचे लेखक व संपादक.

या पुस्तकास महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति
मंडळानें अनुदान दिलें आहे.

श. १८९४ मूल्य ८ रुपये इ. १९७२

# अर्पण

प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मीं दुबला अर्चितसे भक्ति ॥
म्हणौनि बोलु जऱ्हीं गंगावती । तऱ्ही स्वीकराल ॥

रा. ज्ञानेश्वरी ९।१४

## ब्रीद

अनेकसंशयोच्छेदि । तत्त्वार्थस्यापि दर्शकम् ।
सद्भिश्च सेवितं नित्यं । शुद्धं ज्ञानमुपास्महे ॥

प्रकाशक : गणेश हरी खरे
१३२१ सदाशिव पेठ, पुणें ३०

मुद्रक : जेजी प्रिन्टर्स
८५०/७ ८३ शिवाजीनगर, पुणें ४

# निवेदन

१. सुमारें ४८ वर्षांपूर्वी (इ. १९२४) मी राजकारण सोडून देऊन विद्येच्या व्यवसायांत पडावयाचें ठरविलें तेव्हां माझी तत्कालीन विचारप्रणाली व परिस्थिती लक्षांत घेतां मला इतिहासाशिवाय इतर विषय अभ्यासणें शक्य वाटलें नाहीं. तेव्हां शिक्षकाचें काम संभाळून उरलेल्या वेळांत इतिहास अभ्यासावा या हेतूनें मी सातार्‍याच्या राष्ट्रीय शाळेंत शिक्षकाचें काम पत्करिलें. त्या वेळींही इतिहासाभ्यासांतील प्राचीन, मध्ययुगीन, अर्वाचीन व आधुनिक हे कालकृत भेद माझ्या लक्षांत आले होते. परंतु यांपैकीं कोणत्या कालाचा अभ्यास करावयाचा हें मी ठरवूं शकलों नाहीं. म्हणून मी प्रथम भारतीय इतिहासाची सार्वकालिक सामग्री व त्यावरील संकलनात्मक पुस्तकें यांपैकीं सातार्‍यास हातीं लागतील तीं यथाशक्ति वाचण्यास व अभ्यासण्यास प्रारंभ केला. या पुस्तकांत हुल्शचें इन्स्क्रिप्शन्स ऑफ अशोक, कै. खरे शास्त्री यांचे ऐतिहासिक लेखसंग्रहाचे खंड, भारत इतिहास संशोधक मंडळाचीं तोंवर प्रसिद्ध झालेलीं प्रकाशनें, ज्ञानकोशाचे प्रस्तावना खंड, इत्यादि ग्रंथ होते. हे ग्रंथ वाचीत असतां लेखकांनीं केलेलीं परस्परविरोधीं विधानें माझ्या लक्षांत येऊं लागलीं. तेव्हां मला वाटूं लागलें कीं, वाचलेले ग्रंथ आपणांस नीट समजले; म्हणूनच त्यांमधील चुका, उणीवा, इत्यादी आपल्या ध्यानांत आल्या. यामुळें उत्साहीत होऊन मी अधिक सूक्ष्म अभ्यास करूं लागलों. मराठींतील पुस्तकें वाचणें, अगदींच सोपें होतें. प्रथम वर्षांतून कॉलेज सोडल्यावरही नाहीं म्हटलें तरी मी संस्कृत व इंग्रजी या विषयांचें वाचन सवड मिळेल तसें चालूं ठेवलेंच होतें. यामुळें त्या भाषांतील साधनात्मक व संकलनात्मक ग्रंथ समजण्यास अवघड गेलें नाहीं. तसेंच इ. १९२२ मध्यें एक वर्षाची शिक्षा होऊन तुरुगांत गेल्यावर तेथें मुख्यत: हिंदीचा अभ्यास केला. पण अशोकाच्या लेखांचें पुस्तक विशेषत: त्यांतील मूळ लेखांचे पाठ केवळ प्रतिमापत्रांवरून सहज वाचतां येणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यासाठीं मी प्रथम ज्ञानकोशांत दिलेल्या प्रतिमापत्रांचा उपयोग करून ब्राह्मी लिपी हस्तगत केली आणि अशोकाच्या शिलालेखांच्या उपर्युक्त पुस्तकांतील प्रतिमा पाहून त्यांचे पाठ जमले तसे लिहून काढले. नंतर कै. य. रा. गुप्ते इत्यादींना वळेंवळेंच विचारून शिलालेखांचे ठसे कसे घेतात याची माहिती करून घेतली.

२. हा अभ्यास चालू असतां माझ्या हेंही ध्यानांत आलें कीं, भारतीय इतिहासाचीं कांहीं साधनें फार्सी भाषेंत आहेत. तेव्हां तीं साधनें अभ्यासावयाचीं तर फार्सी लिपी व भाषा यांचें ज्ञान असणें आवश्यक आहे. यांपैकीं उर्दू लिपीचें कामचलाऊ ज्ञान मी जुन्या इंग्रजी पाचवींत (आतांच्या नववींत) असतांनाच एका वर्गबंधूकडून करून घेतलें होतें. सुदैवानें माझ्या सातारा येथील वास्तव्याच्या जागीं एक सर्व्हे मामलेदार असे होते कीं, त्यांना उर्दू थोडेंबहुत येत होतें. तेव्हां आम्ही दोघांनीं एकत्र बसून उर्दूचीं चार पुस्तकें वाचलीं. त्याचा फायदा एवढाच झाला कीं, उर्दू लिपी डोक्यांत पक्की बसली.

३. एवढी पूर्वतयारी केल्यावर माझ्या हें लक्षांत आलें कीं, कोणत्याही विषयाचा खोल अभ्यास करावयाचा तर संपन्न ग्रंथालयाचा लाभ घेतला पाहिजे. तेव्हां पुण्यासारख्या ठिकाणीं जाणें आवश्यक आहे. म्हणून पुण्यास कांहीं नियत काम मिळून निर्वाहासाठीं नियत द्रव्यप्राप्ती होईल कां असें ईषत् पूर्वपरिचित कै. शं. ना. जोशी यांस विचारलें. त्यांचें होकारार्थी उत्तर आल्यावर साताऱ्याचें बिऱ्हाड मोडून पुण्यास आलों. परंतु येथें आल्यावर निराळाच अनुभव आला. ज्या अदमासानें कै. जोशी यांनीं कळविलें व मी येथें आलों तो चुकीचा ठरला. नियत काम न मिळाल्यामुळें नियत द्रव्यप्राप्ती झाली नाहीं. त्यामुळें पुण्यास जागा भाड्यानें घेऊन मी बिऱ्हाड करूं शकलों नाहीं. पण येथें पाय रोवणें तर भागच होतें; तेव्हां कसें तरी जीवन कंठीत येथेंच राहिलों.

४. त्या वेळचा माझा दिनक्रम असा : सकाळीं उठल्यापासून ते दुपारीं सुमारें एक वाजेपर्यंत भारत इतिहास संशोधक मंडळांत पुस्तकें वाचीत बसावयाचें. नंतर वाटेनें दोन पैशांचा एक पाव घेऊन व आनंदाश्रमांत जाऊन स्नान करावयाचें. पुढें एका मित्राच्या घरीं जावयाचें व त्यानें मजकरतां घेऊन ठेवलेल्या दीड पावशेर दुधाबरोबर तो पाव खावयाचा आणि पुन्हा मंडळांत येऊन पुस्तकें वाचीत बसावयाचें. सायंकाळीं जेवणाची कांहींच व्यवस्था नसल्यानें थंडा फराळ करून मंडळांत किंवा आनंदाश्रमांत झोपावयाचें. हा दिनक्रम मधूस मधून इ. १९२९ जानेवारी ते जून अखेर चालू होता. एवढ्या अवधींत मला कामाबद्दल द्रव्यप्राप्ती झाली ती अशी: हुनगुंडी देसायांकडील फर्मानांच्या छापील फार्सी पाठांचें मराठी लिप्यंतर करणें १० रुपये; मान्यांची बखर नकलणें १५ रु; श्री. बुवा गोसावी यांजबरोबर ब्रह्मनाळ येथें तेथील मठाचे मोडी कागद वाचून त्यांचे सारांश काढणें १० रु; श्री. फलटणकर (?)

यांजसाठीं श. १५०१ ते १५५० या अवधींतील जंत्री लिहून काढणें (हें काम मजबरोबर येथें रहात असलेल्या माझ्या धाकट्या बंधूंनींच प्रायः केलें) ५०रु; कोयनाखोऱ्यांत जाऊन व प्रचार करून सभा भरविणें प्रवासखर्चासह ५० रु. याच काळांत मी फार्सीचाही अभ्यास केला. फार्सीचें व्याकरण फार सोपें आहे. तेव्हां तें स्मरणांत राहण्यास फार वेळ लागला नाहीं. पण गुरु कोणीच नसल्यानें शब्दांचे उच्चार व अर्थ यांनीं फार वेळ खाल्ला. त्यासाठीं कांहीं प्राथमिक पुस्तकांच्या शंभर शंभर आवृत्तीही केल्या. सुमारें चार महिन्यांत शालांत परीक्षेच्या वर्गांत बसण्याएवढा अभ्यास झाला. नंतर श्री. मालशे यांच्या अनुमतीनें भावे स्कूलच्या उपर्युक्त वर्गांत जाऊन बसूं लागलों. अशा रीतीनें फार्सीचा किमान अभ्यास पूर्ण केला.

५. पुण्यांतील वास्तव्याच्या पहिल्या सहा महिन्यांत हें सर्व करीत असतां पुन: जमेल तितका अभ्यास व वाचन करीत होतों. मला वाटतें इ. १९२९च्या जुलैपासून मी मंडळाच्या शिवचरित्रकार्यालयांत काम करूं लागलों. त्या वेळीं मजकडे शिवकालीन पत्रसारसंग्रह या ग्रंथासाठीं मराठी पत्रांचे सारांश तयार करणें हें काम दिलें होतें. तें काम एक सारखें बसून इ. १९२९ च्या दिवाळीपर्यंत संपविलें आणि मग इंग्लंडमधून आणलेल्या इंग्रजी उताऱ्यांचे अनुवाद करण्याचें काम मागितलें; पण तें न मिळाल्यानें कांहींशा विषण्ण मन:स्थितींत व अनिच्छेनें मिळविलेल्या परवानगीचा फायदा घेऊन शिलालेख वगैरेंचे ठसे घेण्यासाठीं पंढरपूर, पुळुंज, आंबे जोगाई, अक्कलकोट, सोलापूर इत्यादी ठिकाणीं जाऊन आलों. त्या वेळीं मोटारींची आजच्या एवढी वर्दळ नव्हती. माळेगाव, बारामती, फलटण आणि पंढरपूर, पुळुंज, प्लेगदूषित बाभूळगाव, मुंढेवाडी हे प्रवास पायींच केले. इ. १९३० सालच्या जुलै महिन्यांत मंडळाच्या सेवेंत समाविष्ट झालों. तेव्हांपासून आजपावेतों तेथेंच आहे.

६. या त्रेचाळीस वर्षांच्या कालांत सुखदु:ख, मानापमान, निंदास्तुति यांचे अनुभव घेत घेत मला जी सवड मिळाली ती अभ्यास, लेखन व प्रवास ह्या तीन गोष्टींत व्यतीत करीत गेलों. या अवधींत एकंदर ५० लहानमोठीं पुस्तकें व सुमारें ३६० लेख मुख्यतः मराठींत, थोडेसे इंग्रजींत व हातांच्या बोटांवर मोजण्याएवढेच कानडींत लिहून प्रसिद्ध केले. पुस्तकांपैकीं चार पुस्तकें अशीं आहेत कीं, ज्यांत मजबरोबर इतरांनीं किंवा इतरांबरोबर मी काम केलें आहे.

७. मी लिहिलेल्या पुस्तकांचें व लेखांचें वर्गीकरण करावयाचें तर तें (१) कला व पुरातत्त्व, (२) लेखविद्या, (३) वाङमय व भाषाशास्त्र, (४) संकीर्ण, (५) अर्वाचीन इतिहास (मराठी काळ), (६) मुद्राशास्त्र, (७) मध्ययुगीन इतिहास (मुसलमानी काळ), (८) परीक्षणें आणि (९) शिल्पशास्त्र अशा नऊ विभागांत करतां येईल. या ग्रंथलेखांचे कांहीं नैमित्तिक तर कांहीं शाश्वत असेही भाग पडतील. यांपैकीं प्रायः शाश्वत स्वरूपाचे आणि बरेच जुने, सामान्यतः मराठी व मध्ययुगीन इतिहासासंबंधीं मराठींत असलेले लेख प्रस्तुत पुस्तकांत एकत्र केले आहेत. अशाच प्रकारचीं आणखी तीन पुस्तकें प्रकाशित केलीं म्हणजे माझें शाश्वत स्वरूपाचें सर्व मराठी लिखाण प्रकाशित झालें असें होईल.

८. प्रस्तुत पुस्तकांत समाविष्ट केलेले कांहीं लेख असे आहेत कीं, ज्यांत आजही कांहीं अधिक माहिती घालण्यासारखी परिस्थिती नाहीं. उलट दुसरे कांहीं असे आहेत कीं, ज्यांत नवीन माहितीची भर घालणें आवश्यक वाटलें. अशा लेखांत घातलेली भर सामान्यतः पुरवणीमध्यें समाविष्ट केली आहे. तथापि शिवकालीन राजपत्रांची लेखनपद्धति हा लेख असा आहे कीं, त्यांतील कांहीं माहिती माझ्या इतर पुस्तकांत अधिक विस्तारानें आली आहे व कांहीं नव्यानें जेथल्या तेथेंच घालणें आवश्यक होतें. म्हणून तो छापतांना मूळ लेखांत अनेक ठिकाणीं काटछाट करून भर तर घातलीच; पण पुरवणींतही कांहीं भर घातली आहे.

९. यांतील बहुतेक लेखांच्या प्रती मजजवळ होत्या. एकदोन लेख उतरून आणावे लागले. तीन लेखांच्या प्रति मजजवळ नव्हत्या. त्या मिळविण्यासाठीं बरीच आटापीट केली; पण मिळाल्या नाहींत. त्यांचीं नावें अशीं : १ स्वराज्याचे तीन फायदे=अग्रणी–प्रभाकर २३।४।१९४७; २ शिवाजीचा आग्र्याहून परतीचा प्रवास=श्रीसरस्वती ५।१९५९; ३ ऐतिहासिक कागदपत्रांचें अर्थविशदीकरण–झुंजार १।१९६१. आतां न छापलेल्या एका लेखाची दुःखद कहाणीही येथें सांगतों. कित्येक वर्षांपूर्वी इचलकरंजीचे अधिपति कै. बाबासाहेब घोरपडे यांनीं मला दिल्ली व मराठे या विषयावर एक लेख लिहिण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मी त्यांस एक लेख तयार करून दिला. त्याबद्दल त्यांनीं मला ५० रु. पारिश्रमिकही दिलें. तो लेख त्यांनीं स्वतःच्या नावावर प्रसिद्ध केला असता तर मी विशेष कुरकूर केली नसती; पण झालें तिसरेंच. त्या वेळीं ओक ? या नावाचे गृहस्थ मला वाटतें त्या वेळच्या केंद्रीय असेंब्लीचे सदस्य

होते. त्यांनीं कै. बाबासाहेबांना सांगितलें होतें कीं, असा एखादा लेख असेल तर त्याच्या सहाय्यानें मी दिल्लीस मराठ्यांचीं स्मारकें करण्याचा, विशेषत: तेथील रस्त्यांना मराठ्यांचीं शक्य तितकीं अधिक नावें देवविण्याचा प्रयत्न करीन. म्हणून कै. बाबासाहेब यांनीं तो लेख त्यांना दिला. त्यांनीं दिल्लीस कितपत प्रयत्न केला हें समजलें नाहीं मला. पण माझा तो लेख त्यांनीं आपल्या नांवानें इ. १९३४ च्या बृहन्महाराष्ट्र वार्षिकांत प्रकाशित केला. हें वाङमय चौर्य नाहीं कां ? मी त्या लेखावरील माझा हक्क सोडलेला नाहीं. पण तो छापावयाचा तर त्यांत आतां पुष्कळच भर घालावी लागेल. म्हणून तो येथें छापला नाहीं. दुसऱ्या एका लेखाची अशीच कहाणी आहे. कै. गो. स सरदेसाई यांच्या गौरवग्रंथासाठीं लेख पाठवा म्हणून श्री. श्री. रा. टिकेकर यांचें पत्र आलें. सरदेसाई–सरकार–मंडळ तणाव कमी व्हावा, निदान आपल्या कृतीनें त्यांत भर पडूं नये म्हणून मी आवर्जून लेख पाठविला. पण तो सरदेसाई गौरवग्रंथास अयोग्य म्हणून परत पाठविला गेला. भोजनाचें निमंत्रण द्यावयाचें; पण त्याप्रमाणें निमंत्रित गेल्यावर त्यास हाकून द्यावयाचें ही पद्धत दोघांच्याही स्वभावधर्मास अनुरूप अशीच होती हें मला पुढें कळून आलें. तो लेख क्र. ५ म्हणून छापला आहे. त्याचें इंग्रजी रूपांतर प्रथम कर्नाटक हिस्टॉरिकल रिव्ह्यू व नंतर माझ्या सिलेक्ट आर्टिकल्स या इंग्रजी लेखसंग्रहांत प्रसिद्ध झालें आहे.

१० महत्त्वाचे, जुने, विखुरलेले व दुर्मिळ लेख अभ्यासकांस उपलब्ध करून दिल्यास अभ्यासकांचे श्रम वाचतील आणि त्यांचें पुनर्मुद्रण करीत असतां त्यांत सुधारणा करण्याची संधी आयतीच मिळेल या दोन हेतूंनीं मी हे लेख प्रसिद्ध करण्यास प्रवृत्त झालों. त्याप्रमाणें या संग्रहांतील सर्वांत जुना लेख इ. १९३० च्या आरंभींचा आहे. पण विषयाच्या परिपूर्तीसाठीं कांहीं अलीकडचे लेखही यांत समाविष्ट केले आहेत. शिवजन्मतिथि या वादग्रस्त विषयावर मी केलेलें आणखी कांहीं लिखाण प्रकाशित झालें आहे; पण तें अगदीं अलीकडचें असल्यानें या संग्रहांत समाविष्ट केलेलें नाहीं. यांतील कांहीं लेख निमित्तानिमित्तानें लिहिले गेले. उ. क्र. १, ३, १५, १६, १८, २७; उरलेले लेख इतिहासविषयावर लिखाण करावें म्हणूनच लिहिले.

श. १८९४ आषाढ शु. ११ (२२।७।७२) ग. ह. खरे

## श्री. ग. ह. खरे यांची साहित्यसेवा मूल्य रु.

| | | |
|---|---|---|
| १,२ | शिवकालीन पत्रसारसंग्रह खंड १ व २ (अंशतः), (१९३०) | १४–०० |
| ३ | मंडळातील नाणीं (१९३३) | २–०० |
| ४-८ | शिवचरित्रसाहित्य खंड ३ (अंशतः), पूर्णतया ६, ११, १२, १३ (१९३०, ३७, ५८, ६४, ६५) | रु. ५, ३, ५, ५, ६ |
| ९-१३ | ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड १ ते ५; (१९३४, ३७, ३९, ४९ ६१ व ६९) खंड १ ते ३ प्रत्येकी ३–००; खंड ४ रु. ६–००; खंड ५ | १६–०० |
| १४-१६ | दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड १ ते ३ (१९३०, ३४, ४९) | रु. ३, ४ व ६ |
| १७-१८ | शिवचरित्रवृत्तसंग्रह खंड २ व ३ (१९३९, ४१) | प्रत्येकी २–५० |
| १९-२० | हिंगणे दप्तर खंड १ व २ (१९४५, ४७) | प्रत्येकी ६–०० |
| †२१ | श्रीक्षेत्र आळंदी; * ३७ सर ऑरेल स्टीन; | प्रत्येकी ०–२५ |
| *२२ | श्रीविठ्ठल आणि पंढरपूर; * ४३ स्वराज्यांतील तीन दुर्ग; | प्रत्येकी १–५० |
| *२३ | संशोधकाचा मित्र (१ ला भाग); ३१ इतिहासकर्ते मराठे | प्रत्येकी ४–०० |
| *२४ | Simhagadh (१९५३); * ३४ सिंहगड (हिंदी) | प्रत्येकी ०–२५ |
| *२५ | तुलादानविधि (१९४८); * २६ सिंहगड (मराठी) | प्रत्येकी ०–५० |
| *२७ | शनिवारवाडा (मराठी) ०–५०; * (हिंदी) | ०–२५ |
| २८ | Exploration at Karad (अंशतः) (१९४९) | १०–०० |
| *२९ | पेशवेदप्तर–पत्रें : कालनिर्णयसुधारणा (१९५०) | २–०० |
| *३० | Shanivara Palace (Second Edition) (१९५९) | ०–६२ |
| * ३२ | विजयनगरसम्राट कृष्णदेवराय (१९५१) | ०–२५ |
| ३३ | इतिहासाभ्यासवर्ग–व्याख्यानें (१९५२) | ०–५० |
| *३५*३६ | शिवचरित्रसंशोधनवृत्त रा. श. २७९ व २८२ | प्रत्येकी ०–२५ |
| *३९ | महाराष्ट्राचीं चार दैवतें; * ४२ Select Articles | प्रत्येकी ६–०० |
| †४० | आज्ञापत्र (अंशतः) (१९६०) | २–०० |
| ४१ | भा. इ. सं. मंडलस्थहस्तलिखितग्रंथानुक्रमणिका (१९६६) | १५–०० |
| †५० | महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग (संपादन) (१९७१) | ५–०० |

**अप्राप्य पुस्तकें:**— *४४ मूर्तिविज्ञान, †४५ भोरसंस्थान ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय प्रदर्शिका, †४६ भोरसंस्थान ऐतिहासिक स्थलदर्शन, †४७ ऐतिहासिक आख्यायिका, †४८ पंढरपूरचा विठोबा, * ४९ लाठी शिक्षक भाग १.

---

अनंकित भा. इ. सं. मंडळ प्रकाशन; * स्वतःचें प्रकाशन; † इतराचें प्रकाशन.

# अनुक्रमणिका

# ग. ह. खरे – निवडक लेख

## १. दर्याखानाचा बंडावा व शहाजीच्या हालचाली

### सरदेसाई लेख : परीक्षण व सुधारणा

१. रावसाहेब गो. स. ऊर्फ नानासाहेब सरदेसाई यांचा दि. १८ जुलै १९३४ चे ज्ञानप्रकाशच्या अंकांत 'दर्याखानाचा बंडावा व शहाजीच्या हालचाली' या नांवाचा लेख आला आहे. हा लेख म्हणजे बादशाहनाम्यांतील कांहीं फार्सी भागाच्या त्यांनीं करवून घेतलेल्या इंग्रजी भाषांतराचा मराठी अनुवाद आहे, असें त्यांनीं लेखाच्या प्रास्ताविकांत सांगितलें आहे. हा अनुवाद अभ्यासूंस उपयोगी पडावा म्हणून त्यांनीं प्रसिद्ध केला, हें त्यांच्या इतिहास-प्रेमास साजेसेंच आहे; पण हा लेख वाचत असतां या अनुवादांत दोष उत्पन्न झाले आहेत अशी माझी कल्पना झाली. म्हणून हा अनुवाद मी मूळ बादशाहनाम्यांतील फार्सी मजकुराशीं ताडून पाहिला. तेव्हां माझी कल्पना खरी ठरून कांहीं दोष माझ्या ध्यानांत आले. हे श्री. नानासाहेब व इतर अभ्यासू यांच्या लक्षांत यावे एतदर्थ पुढें लिहीत आहे. श्री. नानासाहेब यांच्या लेखांतील प्रास्ताविक भाग सोडून देऊन बाकीच्या परिच्छेदांची येथें अनुक्रमानें चर्चा केली आहे.

२. पण प्रथमच एक गोष्ट श्री. नानासाहेब यांच्या नजरेस आणावीशी वाटते ती ही कीं, त्यांनीं ज्या फार्सी भागाचें इंग्रजी भाषांतर करवून घेतलें त्याच भागाचें इंग्रजी भाषांतर इलियट व डौसनच्या ७ व्या खंडामध्यें आलें आहे. विशेषतः ज्ञानप्रकाशच्या सातव्या पृष्ठावर जो मजकूर आला आहे तो थोडयाशा जास्तच विस्तारानें आला आहे. यामुळें त्या मजकुराची आवश्यकता नव्हती. दुसऱ्या पानावर जो मजकूर आला आहे त्यापैकींहि अर्धा अधिक मजकूर इलियट व डौसनमध्यें आला आहे. पण तो त्रुटित असल्यामुळें श्री. नानासाहेब यांनीं सबंध मजकूर प्रसिद्ध केला हें योग्यच झालें.

श्री. नानासाहेब यांनीं हा लेख प्रसिद्ध करण्यापूर्वीं इलियट व डौसनचा वरील खंड पाहिला होता कीं नाहीं न कळे. पण पाहिला असता तर त्यांना अनुवादांत झालेले दोष सहज टाळतां आले असते. पण अनेक कारणांनीं त्यांच्या हातून तें घडलें नसावें.

३. दुसऱ्या परिच्छेदांत दक्षिणेंत पांच सरदार पाठविले असें सांगितलें आहे. पण वस्तुतः तीनच सरदार दक्षिणेंत आले होते. अजमखान व इरादतखान हे दोन सरदार नसून इरादतखानास दक्षिणेंत येतांना अअजमखान हा किताब मिळाला होता. अअजमखान अगोदरच बालाघाटांत आला नव्हता. तिन्ही सरदार बरोबरच बालाघाटाकडे निघाले होते. सय्यिद मुजफ्फर हा स्वतंत्र म्हणून आला नव्हता. त्यास आघाडीचें काम दिलें होतें. त्यानें अअजमखानाच्या हुकुमाप्रमाणेंच वागावयाचें होतें.

४. लालिक म्हणजे लांबकानी नव्हे. लांबकानी धुळयाच्या वायव्येस सुमारें दहाबारा मैलांवर खेडें आहे. तर लालिक किंवा ललंग हा धुळयाच्या दक्षिणेस सुमारें तीनचार मैलांवर किल्ला आहे. लांबकानी व ललंग एक नव्हत.

५. तिसऱ्या परिच्छेदास संदर्भ दिला नाहीं. तो पृ. ३००–३०२ असा आहे.

६. शेरखान गुजरातेंतून येऊन ता. २६ रोजीं ख्वाजा अबुल हसन यास खानदेशांत मिळाला हें खरें. पण ही २६ तारीख शव्वाल महिन्याची नाहीं. शव्वालच्या पाठीमागील कोणत्या तरी महिन्याची आहे. कारण मुळांत तेवीस शव्वाल रोजीं घडलेल्या गोष्टींच्या तपशीलांत ख्वाजा अबुल हसननें शेरखानास, जो सव्वीस तारखेस त्याजकडे येऊन पोहोंचला होता, त्यास बातोरह किल्ला व चांदोरच्या आसपासचा मुलूख ताराज करण्यासाठीं पाठविलें व त्याप्रमाणें तो मुलूख ताराज करून व पुष्कळ लूट मिळवून परत आला असें सांगितलें आहे. शेरखानानें बातोरह (= पाटोदे ?) किल्ला घेतलाही नाहीं व त्यास घेण्याचा हुकूमही नव्हता.

७. वऱ्हाडांत बंडखोर आल्याची बातमी जिल्हेज महिन्यांत आली नव्हती तर त्यापूर्वींच केव्हां तरी येऊन जिल्हेज महिन्यापूर्वींच्या

जिल्काद महिन्याच्या सातव्या तारखेच्या तपशीलांत वझीरखानास वऱ्हाडांत आलेल्या बंडखोरांवर पाठविल्याची नोंद आहे.

८. या परिच्छेदाचा संदर्भ दिला नाहीं. तो पृ. ३०३ - ३०४ आहे.

९. यांत अजमखान व बंडखोर यांच्या लढाईचें वर्णन आहे. यांतील दोन्ही बाजूंच्या सरदारांचीं नांवें अनुवादांत गाळलीं आहेत. तसेंच कोणकोण मेले यांची यादी दिलेली नाहीं.

१०. नसीरीखानानें (नासिरीखानानें नव्हे) विनंति केली ती 'तेलंगण व कंधार किल्ला हीं दोन्ही हस्तगत करतों' अशी होती. कंधार किल्ला राव रतनाचा नव्हता राव रतन हा मोंगलांतर्फे तेलंगण जिंकण्याच्या कामावर होता; पण त्याला तें जमेना. तेव्हां त्याच्या जागीं नसीरीखानास बादशाहानें नेमलें.

११. या परिच्छेदाचा संदर्भ दिला नाहीं. तो पृ. ३०४-३०८ आहे.

१२. जाधवरावास नुसती मनसब नव्हती तर जागीरही होती. जाधवरावास पकडून ठार मारलें नाहीं. निजामाचा पकडण्याचाच फक्त बेत होता. पण पकडत असतां जी दंगल झाली तींत तो मारला गेला. जाधवरावाच्या बायकोचें नांव किरजाई नव्हतें. गिरजाबाई होतें. शाहजहाननें लुखजी जाधवराव याचा भाऊ जगदेवराय व नातू तिलंगराव आणि अचलोजीचा मुलगा विठोजी यांना दिलेल्या मनसबीचा तपशील व यांचीं नावें कां दिलीं नाहींत? त्यांची काय जरूरी नाहीं? मला वाटतें निस्संशय जरूरी आहे.

१३. संदर्भ म्हणून बादशाहनाम्यांतील पानांचा ३१० हा आंकडा दिला आहे तो चुकला आहे. ३०८ ते ३१० असा पाहिजे.

१४. निजामाच्या नोकराचें नांव नावजी (मावजी नव्हे) किताब रविराय आणि आडनांव शिंदे होतें. यास मुगलांकडून जी मनसब मिळाली ती व परिच्छेदांतील हकीकत यांची नोंद सफरच्या सात तारखेखालीं आहे. तेव्हां रविरावास मोहरममध्यें मनसब मिळाली असेल असें नाहीं.

१५. ख्वाजा अबुल हसन यास येऊन मिळालेल्या सरदारांचीं नांवें खान झमान (जमाल नव्हे) व लहरास्प हीं असून त्याच्या बापाचें नांव महाबतखान होतें.

१६. या परिच्छेदांत आलेला मजकूर बादशाहनाम्यांत रबिलावल महिन्याच्या सात व आठ अशा दोन तारखांखालीं नोंदलेला आहे. पण तसा उल्लेख वरील अनुवादांत नाहीं.

१७. निजामाच्या सरदारांत महलदारखान, दादा पंडित, उमरखान, अफगाण, येवढेच सरदार होते. इत्यादि शब्द घालावयास आणखी सरदारांचीं नांवें बादशाहनाम्यांत असावयास पाहिजे होतीं. पण तीं तशीं नाहींत. ७ व्या व ८ व्या परिच्छेदांतील हकीकत बादशाहनाम्यांत तीनशें पंधरापासून तीनशें अठरा पृष्ठांपर्यंत आहे. मात्र अनुवादांत ३१५-३१६ येवढाच संदर्भ आहे.

१८. आसफखानाबरोबर दिलेल्या सरदारांत सय्यिद हब्शीखान होता. हासवार या निरर्थक नांवाचा कोणीही सरदार नव्हता.

१९ या परिच्छेदाच्या संदर्भांत ३१८ व ३१९ हीं दोन्ही पृष्ठें हवीं.

२०. येथवर पहिल्या नऊ लहान लहान परिच्छेदांच्या अनुवादांत कशा चुका आहेत हें दाखविलें. आतां दहाव्या व अकराव्या परिच्छेदांत बादशाहनाम्याच्या ज्या भागाचा अनुवाद दिला आहे त्या भागांत किती माहिती आहे व त्यापैकीं अनुवादांत किती समाविष्ट झाली आहे हें नीट समजावें म्हणून त्या भागाचा मी केलेला तर्जुमा सादर करतों. श्री. नानासाहेब यांनीं करवून घेतलेला अनुवाद किती अपुरा आहे हें यामुळें स्पष्ट होईल.

२१. पावसाळा संपल्यावर जेव्हां बादशाही लश्कर निजामी व अफगाणी (खानजहान लोदीच्या) सैन्याच्या नाशासाठीं देऊळगांवाहून निघालें तेव्हां मुकर्रबखान, बहलोल व इतर बंडखोर यांना ही खबर मिळून त्यांनीं जालनापुराहून (येथें ते पावसाळ्यासाठीं राहिले होते) पाथरीस कूच केलें. अअजमखानास ही बातमी कळतांच तो आपल्या फौजेसह कूचामागून कूच करून पाठलाग करूं लागला. तो बाणगंगेच्या कांठीं असलेल्या रांभोरी गांवीं पोहोंचतांच त्यास बातमी लागली कीं, निजामी सैन्य धारूर घाटाच्या माथ्यावर येऊन धारूर किल्ल्याचा आश्रय करून आहे व खानजहानचें अफगाणी सैन्य अजून बीडच्या आसपासहून वर

आलेलें नाहीं; तसेंच बादशाही सैन्याच्या त्या बाजूच्या आगमनाची बातमी ऐकून (त्यानें) बीडशीं संबंधित असलेल्या महालांमधून महसूल आणण्यासाठीं पाठविलेल्या टोळीस परत बोलाविलें व तो नेवाशाहून येणाऱ्या दर्याखानाची आणि धारूरहून येणारे मुकरंबखान व बहलोल यांची वाट पहात आहे. तेव्हां अअजमखानानें हे बंडखोर एकत्र होण्याच्या अगोदरच त्यांस गांठून परागंदा करावें या हेतूनें रांभोरीहून प्रयाण केलें. या वेळीं सफशिकनखान वलद सय्यिद युसुफखान रिझ्वी बीडचा किल्लेदार याचीं पत्रें आलीं कीं, खानजहान मछलीगांवाहून चोवीस कोसांवर असलेल्या राजोरी या गांवीं, केहूं (नव्हे गेहूं) आणि कीवराई (नव्हे गेवराई) या ठिकाणीं त्याजबरोबर असलेल्या व्यापाऱ्यांना लुटून आणलेल्या मालाची वांटणी करीत आहे व त्याचे सर्वच्या सर्व मुतालीक – जे वसुलासाठीं हिंडत होते – एकत्र जमले आहेत आणि सर्वजण बादशाही सैन्याच्या आगमनाची बातमी ऐकून पाथरीस मुक्काम ठोकून आहेत; हेतु हा कीं, बादशाही सैन्य बीडजवळ येतांच कूच करावें. तेव्हां अअजमखानानें याकूतखान, माबूजी ( = ताबूजी ? ) भोसले, इकरामखान, मीर अब्दुल्लाह, रियायतखान व इतर बादशाही नोकर यांना सैन्याबरोबर मछलीगांव येथें ठेवून त्यांनीं तळाचें रक्षण करीत सावकाश मार्ग चालावा असें फर्माविलें आणि सिपहदारखान, राजा जयसिंग, राजा जुझारसिंग बुंदेला, राव सूर भोरतियह, बहादुरखान, राजा बीठलदास, सरदारखान, पहाडसिंग बुंदेला, राजा अनूपसिंग, खवासखान, जाननिसारखान, राणा कर्णाचा भाऊ अर्जुन, मरहमतखान, चंद्रमन बुंदेला, इहतमामखान, केलोजी (खेलोजी), उदाजीराम, जगदेवराय आणि इतर दखनी वगैरेंस आपल्याबरोबर घेऊन अअजमखान प्रहर रात्रीनंतर मछलीगांवाहून शत्रूचा नाश करण्यासाठीं निघाला व चार घटका रात्र उरण्याच्या वेळीं बीडपासून सहा कोसांवर असलेल्या पिंपळनेर गांवीं आला. तेथून त्यानें सफशिकनखानास लिहिलें कीं, तुम्ही आपली सेना घेऊन खानजहानच्या लश्करच्या बाजूस असावें म्हणजे तो बादशाही सैन्य येवढेंच असें समजून पळून जाणार नाहीं.

त्याप्रमाणें सफशिकननें आपलें सैन्य खानजहानच्या सैन्याच्या – जें बीडपासून ४ कोसांवर डोंगरकठडीस होतें – समोर एक कोसावर ठेवलें. तेव्हां खानजहानचा मुलगा अझीझ बापाच्या जमेतीसह सफशिकनवर धावला. इतक्यांत अअजमखान चालून आला. तेव्हां अझीझ बापापाशीं पळून गेला. खानजहाननें पळून जाण्यास वाट नाहीं असें पाहून लढाई देण्याचें ठरविलें. तेव्हां अघाडीचा मुख्य राजा जयसिंग, राजा बीठलदास, राजा अनूपसिंग व इतर राजपूत, उजव्या बगलेचा मुख्य सिपहदारखान, बहादुरखान, सरदारखान, खवासखान, तोफखान्याचा दारोगा इहतमामखान, मरहमतखान हे शत्रूच्या बुणग्यांजवळ आले. तेव्हां खानजहाननें व त्याच्या लोकांनीं, वांटून घेतलेली संपत्ति व सामान टाकून देऊन डोंगर चढण्यास आरंभ केला. शत्रूचा तळ व सामान उध्वस्त करण्यांत बादशाही सैन्य गुंतल्यामुळें तें पांगलें. पण कांहीं अमीर व रजपूत सरदार आपले थोडे लोक घेऊन शत्रूच्या पाठोपाठ डोंगर चढूं लागले. बहादुरखान रोहिला, इहतमामखान, नरहरदास झाला, हे इतरांच्या अगोदर डोंगर चढून शत्रूचा पाठलाग करूं लागले. खान जहाननें पाहिलें कीं, बादशाही सैन्यापैकीं थोडेसेंच जवळ पोहोंचलें व बाकीचेंही लौकरच पोहोंचेल. तेव्हां त्यानें एका हत्तिणीवर बायकांस बसवून शेवगांवास पाठवून दिलें व आपण लढाईला तयार झाला. आणि बहादुरखान (निजामी) नांवाच्या आपल्या पुतण्यास बहादुरखान मोगली वगैरेंच्या तोंडावर पाठविलें. सैन्य थोडें असल्यामुळें बहादुरखान, नरहरदास, इहतमामखान, हे अडचणींत सांपडले व पाय उतारा होऊन जिवावर उदार होऊन लढूं लागले. बहादुरखानास दोन जखमा झाल्या आणि नरहरदास व इतर कांहीं रजपूत मरण पावले. सिपहदारखान, खवासखान व मरहमत-खान हे उजव्या बाजूनें डोंगर चढून आल्यावर त्यांनीं हें पाहिलें. तेव्हां ते दगडी भिंतीपाठीमागें उभे राहून बाणांचा वर्षाव करूं लागले. राजा पहाडसिंग बुंदेला उजव्या बाजूची फौज घेऊन बहादुरखानाच्या कुमकेस पोहोंचून मोठें शौर्य दाखविता झाला. राजा जयसिंग, राजा बीठलदास व राजा अनूपसिंग हे दुसऱ्या

बाजूनें वेळेवर येऊन पोहोंचले. अअजमखान त्वरेनें डोंगराच्या पायथ्याशीं येऊन त्यानें मुल्तफितखान, राव सूर भोरतियह, चंद्रमन बुंदेला व इतर डाव्या बगलेचे लोक यांस डोंगरावर जाण्याची ताकीद केली. या वेळीं फार कठीण प्रसंग होता. पण शेवटीं बादशाही सैन्यास जय मिळण्याचा रंग दिसूं लागला व शत्रू पळूं लागला. इतक्यांत शत्रूंपैकीं बहादुरखानास गोळा लागला. नंतर पहाडसिंग बुंदेला याच्या नोकरानें – परशुरामानें व बहादुरखानानें एकमेकांवर हल्ला केला. पण त्यांत बहादुर मेला. तेव्हां त्याचें शिर, घोडा, ढाल, आंगठी, दोन तलवारी हे जिन्नस पहाडसिंगाकडे पाठविले व पहाडसिंगानें ते जिन्नस अअजमखानाकडे पोचविले. खानानें घोडा व हत्यारें परशुरामास दिली, डोकें बीडच्या दरवाजास बांधविले आणि आंगठी बादशाहाकडे रवाना केली. नंतर बादशाही सैन्यानें तीन कोसपर्यंत शत्रूचा पाठलाग करून पुष्कळांस यमसदनास पाठविलें. या वेळीं बादशाही सैन्यानें प्रहर रात्रीपासून तीन प्रहर दिवसापर्यंत तीस कोसांवर मजल मारल्यामुळें ती अगदीं दमून गेली होती व पाठीमागील फौज यावयाची होती. म्हणून अअजमखानानें तेथेंच मुक्काम केला. यामुळें बंडखोरास फुरसत मिळून तो पळाला. तेव्हां अअजमखानानें दुर्वेश मुहम्मद दखनी यास जाधवरायाचा भाऊ जगदेवराय–जो बीडमध्ये होता – याच्या लोकांसह व कांहीं बादशाही लोकांसह त्याच्या पाठलागास पाठविलें व आपणही पाठीमागून रवाना झाला. खानजहाननें पाहिलें कीं, बादशाही लश्कर आपला पिच्छा सोडत नाहीं. तेव्हां त्यानें आपल्या बायकांना हत्तीच्या अंबारींतून काढून घोड्यावर बसवून आपल्याबरोबर घेतलें. दुर्वेश मुहम्मद व इतरानीं हत्तीण व अंबारी हस्तगत केली आणि पुष्कळ अफगाण व त्यांचीं मुलें यांना कैद केलें. खानजहान व त्याजबरोबरचे इतर लोक डोंगरांत पळून गेले. शेवटीं रात्र पडल्यावर अअजमखानानें पाठलाग करण्याचें सोडून दिलें. अजून याकूतखान सैन्यासह मछलीगांवाहून यावयाचा असल्यानें अअजमखान परत बीड येथें गेला. हेतु हा कीं, तो येऊन मिळावा व मुकर्रबखान व बहलोल यांची बातमी लागावी. या दिवशीं याकूतखान

येऊन पोहोंचला. याच वेळीं समजलें कीं, शत्रूचें सैन्य नेवाशाहून वर येऊन खानजहानास मिळालें. अअजमखानानें तेथें कांहीं काळ मुक्काम केला तेथून अअजमखानानें स्वारीची हकीकत बादशाहास लिहून पाठविल्यामुळें त्यानें त्याचा बहुमान केला. तसेंच बहादुर-खानाचा सन्मान करून त्यास हजार स्वारांची बढती म्हणजे चार हजारी व तीन हजार स्वारांची मनसब दिली. त्याचप्रमाणें इतरांनाही योग्यतेनुरूप बढती दिली पृ. ३२१–३२७. (अनुवादांत ३२३ ते ३२५ असा संदर्भ दिला आहे तो चूक आहे).

२२. खानजहान व त्याचे साथीदार यांचें सैन्य सेवगांवहून वैजापूर येथें गेलें आणि शहाजी निजामाच्या परगण्यांतून दौलताबादेस जाण्याच्या विचारांत होता. अअजमखानास ही बातमी लागून त्यानें वीस हजार सैन्यासह सेवगांवच्या बाजूस कूच केलें. या वेळीं जाधवरावाचा जावई व निजामाच्या हिंदु सैन्याचा मुख्य शाहूजी भोसला, अअजमखानाच्या लश्कराकडे आला. तो जाधवराव मारला गेल्यानंतर निजामाशीं असलेला संबंध तोडून पुणें व चाकण या परगण्यांत रहात होता. त्यानें अअजमखानास लिहिलें कीं, मला जर बादशाहाचा अहदनामा मिळेल तर मी आपल्या लश्करांत येऊन चाकरी करीन. अअजमखानानें ही हकीकत बादशाहास कळविली तेव्हां हुकूम झाला कीं, त्यास तसल्ली द्यावी, त्यास व त्याच्या नातेवाइकांस मनसब मिळेल. हा हुकूम आल्यानंतर साहूजी दोन हजार स्वारांसह बादशाही लश्करांत दाखल झाला. आणि अअजमखानाच्या विनंतीप्रमाणें पोशाख, पांच हजारी जात व स्वार येवढी मनसब, जडावाची जमदाडा, झेंडा, नगारा, घोडा, हत्ती व दोन लाख रुपये इनाम येवढ्या गोष्टी त्यास मिळाल्या. त्याचा भाऊ मीनाजी (मंबाजी ?) यास पोशाख, तीन हजार जात व पंधराशे स्वार ही मनसब, जडावाची तलवार, घोडा व सामाजी (=संभाजी) वलद साहूजी यास पोषाख, दोन हजारी जात व हजार स्वार ही मनसब व घोडा अशीं बक्षिसें मिळालीं. याशिवाय रविराव साठे, मालोजी, हाबाजी यांचेकडील मनुष्यांची व त्यांचे

नातेवाइकांची योग्यतेनुरूप सरफराजी झाली. या सर्वांना ऐंशी हजार रुपये दिले गेले (पृ. ३२७,३२८; नुस्तें ३२७ नव्हे).

२३. ही सर्व हकीकत वाचली व तिजशीं श्री. नानासाहेब यांच्या अनुवादांतील दहाव्या व अकराव्या परिच्छेदांतील हकीकत ताडून पाहिली तर (१) बंडखोरांचीं नांवें देणें, (२) खानजहान बीडच्या आश्रयास जाणें, (३) मछलीगांवाचें राजोरीपासूनचें अंतर, (४) गेहू व गेवराई येथील व्यापारी लुटणें व राजोरीस वाटणी होणें, (५) परशुराम हा पहाडसिंग बुंदेल्याचा नोकर असणें व तो जिवंत असणें, (६) अझीझ, खानजहानचा मुलगा असणें इत्यादि बाबतींत विपर्यस्त अनुवाद झाला आहे आणि शहाजीच्या बाबतींतहि तपशील गळला आहे असें दिसेल.

२४. (१२, १३ १४, व १५) या परिच्छेदांतील अनुवाद पूर्ण नसला तरी विस्तृत आहे. पण त्यांत अनेक चुका आहेत त्या अशा :–

निजामशाह निजामशाही फौजेबरोबर नव्हता. तो पूर्वीपासून दौलताबाद किल्ल्याबाहेर निजामाबाद येथें होता. तो किल्ल्यांत राहण्यास गेल्यावर निजामी फौज एरखतला या ठिकाणीं आली.

अब्दुल्लाहखान व त्याचे सरदार ईसा तर्खान (ईसातारखान नव्हे) वगैरे एकदमच दहा जमादिलावलला रवाना झाले. सरदार मागाहून व अब्दुल्लाहखान आधीं असा प्रकार झालेला नाहीं.

माणिकदूदा (माणिक दौंड) खिडींत चकमक झाली ती खुद्द अअजमखानाशीं नसून त्याचा सरदार इहतमामखान याशीं झाली.

धामणगांवचें अंतर अहमदनगरहून वीस कोस (वीस मैल नव्हे) दिलेलें आहे.

अअजमखानानें किलंगी (नव्हे तालिंगी) चा किल्ला इहतमामखान (ईतामनखान नव्हे) व महंमतखान दोघांनीं काबिज करावा असा हुकूम दिला होता. एकट्या इहतमामखानास सांगितलें नव्हतें. अअजमखान ईलन (इलाम नव्हे) बीडला गेला.

२५. पंधराव्या परिच्छेदाच्या अनुवादांत पुष्कळ घोटाळे आहेत, हे तो परिच्छेद आणि बादशाहनामा पहिला भाग पृ. ३३४ ते

३३९ यांतील मजकूर किंवा ईलियट व डौसन सातवा भाग पृ. १८ व १९ यांतील मजकूर याशीं ताडून पाहिलें असतां सहज समजून येईल. नमुन्यासाठीं एकच गोष्ट मी येथें देतों. या परिच्छेदांतील हकीकत हि. १०४० जमादिलावल महिन्याच्या चोवीस तारखे-पासून जमादिलाखर महिन्याच्या १४ तारखेपर्यंत घडल्याचें दिसतें. पैकीं जमादिलावल महिन्याच्या अठ्ठावीस किंवा सत्तावीस तारखेस (खानजहान व इतर) बंडखोरांचा मुक्काम लोनहिरह (नपेरा नव्हे) येथें होता. सय्यिद मुजफ्फर देपाळपूराहून निघून पांच जमादिलाखरला मनकोदे येथें आला आणि सहा तारखेस तालगांव (थळगांव नव्हे) येथें आला. जमादिलावल २८ आणि जमादि-लाखर पांच व सहा या तारखांशीं जुळत्या इंग्रजी तारखा इ. स. १६३० डिसेंबर तेवीस, तीस व एकतीस या येतात; तेव्हां श्री. नानासाहेब यांनीं अनुवादांत वरील प्रसंगांना बारा, तेरा आणि वीस (कोणत्या महिन्याच्या हें तर दिलेलेंच नाहीं) या तारखा कशाचे आधारानें मांडल्या हें समजत नाहीं. तसेंच शत्रू सिरोंजेवर असून त्याजपाशीं पन्नास हत्ती आहेत असें विधान आहे. तेथें बंडखोरांनीं सिरोंजेच्या जवळून पन्नास हत्ती पकडून नेले होते, असें विधान पाहिजे. या सर्वांचे संदर्भ दाखविणारे पृष्ठांचे आंकडे दिले नाहींत.

२६. सोळाव्या परिच्छेदांत बादशाहनाम्यांतील अनुवाद येथें संपला असें नानासाहेब सांगतात; पण विसाव्या परिच्छेदांत बादशाहनाम्याचाच अनुवाद आहे.

२७. विसावा परिच्छेद वास्तविक अगदीं प्रथम पाहिजे. बादशाह-नाम्यांत या ठिकाणींच प्रथम शहाजीचा उल्लेख आला आहे. या परिच्छेदांत सांगितलेली व पहिल्या परिच्छेदांत सांगितलेली हकीकत एकाच कालांतील आहे व बादशाहनाम्यांत ती तशी पृ. २४८ ते पृ. २५१ पर्यंतच्या चार पानांत दिलेलीही आहे. मात्र या चार पृष्ठांत नसलेली हकीकतही या परिच्छेदांत आहे. उदाहरणार्थ, बादशाहनाम्यांत शाहजहाननें आदिलशाहास स्वतःच्या मदतीस व तेंही जिकलेल्या प्रदेशाची वांटणी मिळण्याच्या शर्तीवर बोलविल्याचें

नमूद नाहीं. बीडचा किल्ला ताब्यांत घेण्यास खान झमान (खान जहान नव्हे) गेला होता. बीडच्या किल्लेदारास मोगलांशीं विरोध करण्याबद्दल गुप्त हुकूम गेला होता हें बादशाहनाम्यांत नमूद नाहीं.

२८. असो. श्री. नानासाहेब सरदेसाई यांनीं जो अनुवाद प्रसिद्ध केला तो मूळ बादशाहनाम्यांतील मजकुराशीं ताडून पहात असतां त्यांत जे दोष आढळले त्यांपैकीं कांहीचें दिग्दर्शन येथपर्यंत केलें. यावरून त्यांना व इतरांनाही दिसून येईल कीं, प्रसिद्ध झालेल्या अनुवादांत मूळ फार्सी मजकुरापैकीं काहीं गळला आहे; हकीकतीचा विपर्यास झाला आहे; आनुपूर्वी बदलली आहे; व्यक्तिनामें व स्थलनामें चुकलीं आहेत किंवा त्यांचे विपर्यस्त उच्चार दिलेले आहेत; प्रसंगांच्या तारखा चुकल्या आहेत; संदर्भ दाखविणारे पृष्ठांचे आंकडे भलतेच पडले आहेत; अनुवाद करतांना तर राहोच, पण सारांश देतांनाही तारखा, व्यक्तिनामें, स्थलनामें व त्यांचीं अंतरें हीं वगळतां कामा नये; पण तीं येथें गळलीं आहेत, इत्यादि दोष उत्पन्न झाले आहेत.

२९. वर उल्लेखिलेल्या दोषांपैकीं, ज्या गृहस्थांनीं श्री. नानासाहेब यांस श्रमपूर्वक फार्सीचें इंग्रजी भाषांतर करून दिलें त्यांचे हातून कोणते दोष घडले, मराठी अनुवाद करतांना नजरचुकीनें कोठें कसर राहिली कीं काय व छापखान्यांतील भुताटकीचे खेळ कोणते हें मजसारख्या तिऱ्हाइतास समजण्यास मार्ग नाहीं; पण असें दोषयुक्त लिखाण उत्तम इतिहास रचण्यास उपयोगी पडेल असें वाटत नाहीं. तेव्हां श्री. नानासाहेब यांस माझी आदरपूर्वक पण अत्यंत आग्रहाची अशी विनंति आहे कीं, यापुढें अशा प्रकारचे अनुवाद त्यांस करून मिळाल्यास त्यांनीं ते दुसऱ्या एखाद्यास पुन्हा मुळांशीं रुजू घालण्यास सांगावें; म्हणजे वर दाखविलेल्या पद्धतीचे सहज समजून येणारे दोष टळतील व लिखाणास चिरस्थायी महत्त्व येईल.



## २. शहाजी व निजामशाहीचा अंत

१. इतिहासाचा तात्त्विक दृष्टया विचार करणाऱ्या एका नामांकित ग्रंथकारानें महापुरुषाची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत महापुरुषाचीं अनेक लक्षणें सांगतांना तो म्हणतो कीं, 'महापुरूष ज्या कालांत व प्रदेशांत उत्पन्न होतो, त्या कालांतील व प्रदेशांतील लोकांच्या कल्पना, आकांक्षा, आचारविचार इत्यादि गोष्टींची परिणतावस्था त्या महापुरुषाच्या ठिकाणीं दृष्टीस पडते. किंबहुना त्या महापुरुषाच्या ठिकाणीं वरील गोष्टी यशस्वी रीतीनें पूर्णत्वाला गेलेल्या असल्यामुळेंच त्याची महापुरुषांत गणना होते. ही गोष्ट खरी असेल तर मग ओघानेंच असें म्हणणें प्राप्त होतें कीं, जे गुणावगुण महापुरुषाच्या ठिकाणीं उत्कटत्वानें प्रकट झालेले दिसतात, तेच त्याच्या पूर्वीच्या लोकांत कमी अधिक प्रमाणांत वसत असले पाहिजेत व त्या गुणांचा उपयोग करून महापुरुषाच्या पूर्वीच्या लोकांनीं, ज्या गोष्टी महापुरुषानें यशस्वी रीतीनें शेवटास नेल्या, त्या गोष्टी अयशस्वी रीतीनें कां होईना, पण शेवटास नेण्याचा प्रयत्न केला असला पाहिजे. आतां अशा लोकांना, त्यांनीं हातीं घेतलेल्या कार्यांत यश न लाभल्यामुळें, महापुरुषत्वाचा मान मिळाला नाहीं हें खरें; पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं, आपण त्यांच्या कृतींकडे दुर्लक्ष करावें; उलट अशा लोकांच्या हातून घडलेल्या कार्याची प्रगति सूक्ष्म नजरेनें पाहणें हेंच आपल्या प्रगतीचें बीज आहे. या प्रगतीच्या सूक्ष्म अध्ययनानें लोकांमध्यें प्रयत्न करण्याविषयीं जी आस्था उत्पन्न होईल, ती अलौकिक समजल्या जाणाऱ्या महापुरुषाच्या चरित्राच्या आवृत्ती करूनही होणार नाहीं. शिवाजी व शहाजी यांच्या चरित्रांकडे नजर टाकली तर वरील विधानांची सत्यता पटण्यास वेळ लागणार नाहीं. शिवाजीनें यशस्वी रीतीनें उदार हिंदू राज्याची स्थापना करून दाखविली व ती गोष्ट करीत असतां त्याच्या ठिकाणीं असलेल्या अनेक गुणांची उत्कट प्रतीति तत्कालीन शत्रुमित्र व हिंदुमुसलमान अशा

दोन्ही प्रकारच्या समाजांस आली; पण याचा अर्थ शिवाजी एकाएकी, कोठें कांहींच नसतां, अगदीं विरुद्ध व विलक्षण प्रकारचा पुरुष उत्पन्न झाला, असा होत नाहीं. शिवाजीनें जसें स्वतःचें राज्य यशस्वी रीतीनें स्थापन केलें, तसेंच त्याच्या पूर्वीं स्वतःचें राज्य स्थापन करण्याचा प्रयत्न अनेकांनीं केला; पण त्यांचे प्रयत्न यशस्वी झाले नाहींत, म्हणून त्यांना महापुरुषत्व प्राप्त झालें नाहीं. असे. अयशस्वी प्रयत्न करणारांत शिवाजीचा बाप शहाजी हा अग्रगण्य आहे. शहाजीचे प्रयत्न शिवाजीच्या प्रयत्नांइतके शुद्ध स्वरूपाचे नव्हते; पण त्यामुळें वरील विधानांना जास्त बळकटीच येत आहे अशा एका प्रयत्नाची हकीकत येथें द्यावयाची आहे.

२. शहाजीच्या आयुष्याचे दोन भाग पडतात. त्याच्या कर्तृत्वाच्या आरंभापासून ते निजामशाही बुडून तो कायमचा विजापुरी नोकर बनण्यापर्यंतचा पहिला भाग व तेथून पुढें तंजावरला स्वतःचें बस्तान बसवून मरेपर्यंतचा दुसरा भाग. या दोन्ही भागांत त्यानें वरकरणी दुसऱ्याचें, पण वस्तुतः स्वतःचें असें राज्य स्थापण्याचे दोन प्रयत्न केल्याचे दिसतात. पैकीं पहिल्या प्रयत्नांत त्यास यश आलेलें दिसत नाहीं; दुसरा प्रयत्न मात्र बऱ्याच अंशांनीं तडीस गेलेला दिसतो. मला या अयशस्वी प्रयत्नाची माहिती द्यावयाची आहे.

३. या प्रयत्नाचें स्थूल स्वरूप असें – निजामशाही व मुघलांसह आदिलशाही सैन्यांमध्यें झालेल्या भातवडीच्या लढाईंत शहाजीनें निजामशाहीतर्फे मोठा पराक्रम केल्यामुळें त्याची कर्तबगारी चांगली प्रत्ययास आली; पण त्यामुळें तत्कालीन निजामशाहीचीं सूत्रें हालवणारा जो मलिकंबर त्यास शहाजीविषयीं मत्सर वाटूं लागला. तेव्हां मलिकंबर असे तों आपल्या कर्तबगारीचें चीज होणार नाहीं असें वाटून तो आदिलशाही नोकरींत शिरला. पण या नवीन नोकरींत शिरल्यास थोडे दिवस होतात न होतात तोंच, इब्राहीम आदिलशाह मरण पावला व त्याचा मुलगा मुहम्मद आदिलशाह गादीवर आला. याच्या अगोदरच निजामशाहीपैकीं मलिकंबर मरण पावला होता. तसेंच या वेळीं दिल्लीचा मुघल बादशाह जहांगीर मरून त्याचा मुलगा शाहजहान हा गादीवर आला होता.

त्यानें निजामशाही मुलुखावर स्वारी करून तो प्रदेश आपल्या राज्यास जोडावा असा विचार केला होता. शहाजीस निजामशाही-विषयीं अभिमान होता आणि मुहम्मदशाहानें त्याचा अपमान केल्यामुळें म्हणा किंवा दरबारांतील लोकांशीं त्याचें बनत नसल्या-मुळें म्हणा, त्यास विजापूरच्या आदिलशाहीचा तिटकारा आला होता. यामुळें तो आदिलशाही सोडून निजामशाहींत परत आला; पण पुढें निजामशाही प्रधान फतहखानानें करविलेला बुर्हान निजामशाहाचा खून व स्वतःचा सासरा लुकजी जाधवराव याचा खून यांमुळें त्याचें मन विटून तो मुघलांकडे गेला; पण तेही त्याला नीट वागवीनात; यामुळें व फतहखान मुघलांस मिळून निजामशाही बुडवीत असल्यामुळें तो परत निजामशाहींत आला. प्रथम त्यानें आदिलशाहीच्या मदतीनें मुघलांशीं सामना देऊन निजामशाही वाचविण्याचा प्रयत्न केला; पण लौकरच आदिलशाही व मुघल यांचा तह झाल्यामुळें त्यास एकट्यालाच मुघल व आदिलशाही अशा दोन्ही सैन्यांशीं टक्कर देणें भाग पडलें. या वेळीं त्याचा निभाव लागणें शक्य नव्हतें, हें त्यास समजलें असलेंच पाहिजे. पण त्यानें या वेळींही शेवटपर्यंत प्रयत्न करून पाहिला, हेंच विशेष आहे. मी पुढील पृष्ठांत शहाजीनें विजापूरकरांच्या मदतीनें नवीन निजामशाहीची उभारणी केल्यानंतर त्यास मुघलांशीं सामना करण्याचा प्रसंग आल्यापासून ते निजामशाही साफ बुडेपर्यंत सुमारें एक वर्षाची हकीकत सांगण्याचा विचार केला आहे.

४. या हकीकतीविषयीं एक गोष्ट प्रथमच स्पष्ट केली पाहिजे. ती ही कीं, ही हकीकत अनेक पुस्तकें वाचून त्यांतील माहितीची छाननी करून लिहिलेली नसून अब्दुल हमीद लाहोरी यानें बादशाहनामा नांवाचा शाहजहानच्या राज्याच्या पहिल्या वीस वर्षांची रोजची दरबारी व इतर हकीकत देणारा जो ग्रंथ केला आहे, त्याच्या कांहीं भागाचा सामान्यतः सारांश आहे. निरनिराळ्या ठिकाणच्या माहितीचा अभ्यास करून त्या अभ्यासाचें फल म्हणून स्वतंत्र निबंध न लिहितां मी तो देण्यास कां प्रवृत्त झालों याविषयीं थोडा जास्त खुलासा केला पाहिजे. मी ज्या भागाविषयीं माहिती

पुढें देणार आहे, त्या भागासंबंधीं अनेक ठिकाणीं माहिती यावयास पाहिजे. आणि त्याप्रमाणें शिवभारत, मुहम्मदनामा, बसातीनुस्सलातीन, कझवीनीचा पादशाहनामा, अब्दुल हमीद लाहोरीचा बादशाहनामा, शाहजहानची हकीकत सांगणारे इतर मुघली साधनग्रंथ यांतूनही ही हकीकत आली आहे; पण यांपैकीं मुघली साधनांचा विचार केला तर असें दिसतें कीं, हीं साधनेंहीं कमी जास्त प्रमाणांत कझवीनीच्या पादशाहनाम्याचीं रूपांतरें आहेत. अब्दुल हमीद लाहोरीनें बादशाहनाम्यांत कझवीनीचें ऋण कबूल केलें नसलें तरी कझवीनीचा पादशाहनामा व लाहोरीचा बादशाहनामा यांची तुलना केली असतां ही गोष्ट अगदीं स्पष्ट होते; पण एक तर कझवीनीचा पादशाहनामा अप्रकाशित आहे व तो शाहजहानच्या पहिल्या १० वर्षांचीच हकीकत देतो. या उलट बादशाहनामा पहिल्या २० वर्षांची हकीकत देत असल्यानें त्यासच महत्त्व आलें आहे. बसातीनुस्सलातीन, मुहम्मदनामा व शिवभारत यांमध्यें जरी कांहीं माहिती आली आहे, तरी या झटापटींत विजापूरकर व शहाजी दोघेही अयशस्वी झाले असल्यानें त्यांच्या पदरच्या लोकांनीं लिहिलेल्या यासंबंधीच्या हकीकती त्रोटक आहेत. यामुळें बादशाहनाम्यांतील हकीकतीस सर्वांत जास्त महत्त्व आलें आहे. आतां बादशाहनाम्याच्या बऱ्याच भागांचें भाषांतर इलियट व डौसन यांच्या सातव्या भागांत आलें आहे; पण त्यांत अनेक ठिकाणीं मुळांतील भाग भाषांतरित करण्याचें सोडून दिलें आहे. विशेषतः ज्या भागाचें भाषांतर मी आज केलें आहे, त्यांत अशीं स्थळें पुष्कळच आहेत, हें माझा सारांश व इलियट व डौसन मधील सारांश यांची तुलना केली असतां तेव्हांच स्पष्ट होईल. इलियट व डौसनमध्यें महत्त्वाचा नाहीं म्हणून ज्या भागाचें भाषांतर देण्याचें टाळलें आहे, तो भाग दक्षिणचा साग्र इतिहास जाणणाऱ्यांच्या दृष्टीनें महत्त्वाचा असल्यानें त्याचें शक्य तितकें विस्तृत वर्णन माहीत असणें अवश्य आहे. सारांश, देतांना व्यक्तिनामें, स्थलनामें, तारखा इत्यादींचे उल्लेख गाळूं नयेत, पण इलियट व डौसनमध्यें तसें झालें आहे, हें नाकबूल करून चालणार नाहीं. शिवाय अस्सल कागद-

पत्रांत आलेल्या व्यक्ती व स्थल यांच्या नांवांचा उलगडा होण्यास शक्य तितकी विस्तृत माहिती आपल्यापाशीं असणें जरूर आहे व तशी बादशाहनाम्यांतून मिळणारी विस्तृत माहिती कोणत्याही साधनग्रंथांत व प्रो. सरकार यांचें 'औरंगजेबाचें चरित्र' यासारख्या ग्रंथांतही आलेली नाहीं. केवळ शिवभारत, बसातीनुस्सलातीन, मुहम्मदनामा यांच्या सहाय्यानें शहाजीच्या या प्रयत्नाची माहिती देण्याचा प्रयत्न केल्यास तो यशस्वी होणार नाहीं इतकी तुटपुंजी व चुकीची माहिती या ग्रंथांत आली आहे. म्हणूनच मी हा सारांश देण्यास प्रवृत्त झालों आहे. या सारांशांत मी मागील सर्व दोष टाळले आहेत, एवढेंच नव्हे तर बादशाहनाम्यांतील माहिती जास्त सुसंगत रीतीनें मांडलेली आहे. तसेंच जेथें जेथें इतर ग्रंथांचा विचार करणें शक्य आहे, तेथें तेथें त्यांचा विचार टीपांतून केला आहे. यामुळें या हकीकतीस केवळ सारांशाचें स्वरूप राहिलेलें नाहीं. आतां माझ्या हकीकतींत कोठें कोठें अपरिचित असे शब्द आले आहेत व रचनाही क्वचित् बोजड झाली असण्याचा संभव आहे.

५. यांत आलेल्या हकीकतीचें स्वरूप सांगितल्यानंतर ती हकीकत समजण्यासाठीं तिच्या दिक्कालादि मर्यादा सांगितल्या पाहिजेत. ही हकीकत बादशाहनामा खंड १, भाग २, यांत आली आहे. शाहजहानच्या ९ व्या राज्याभिषेक (जुलूस) वर्षाच्या शाबान महिन्यापासून ते १० व्या जुलूस वर्षाच्या रज्जब महिन्यापर्यंत म्हणजे बरोबर एक वर्षांत ही घडलेली आहे. पैकीं पहिल्या सहा महिन्यांत एका बाजूस मुघल व दुसऱ्या बाजूस शहाजी-विजापूरकर यांच्या लढाया चालू होत्या आणि दुसऱ्या सहा महिन्यांत शहाजी विरुद्ध विजापूरकर व मुघल अशा लढाया सुरू होत्या. सर्व लढायांचें क्षेत्र दौलताबादेपासून ते विजापूरपर्यंत व कोंकणांतील माहुली वगैरे ठिकाणांपासून ते देशावरील बीदरपर्यंत असें होतें. या एका वर्षाच्या कालापैकीं पहिल्या सहा महिन्यांत स्वाहजहान बादशाह स्वतः दक्षिणेंत दौलताबादेस राहून खान झरान, खान झमान, खान जहान व शायिस्तेखान यांच्या कडून दौरीचें काम करवून घेत होता; पण या सहामाहीच्या शेवटीं

शाहजहान उत्तरेंत गेला व औरंगजेबाची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक झाली. लढाईचें बरेचसें काम पहिल्या सहामाहींत आवरल्या-मुळें दुसऱ्या सहामाहींत वरील चार सेनापतींपैकीं खान दौरान व खान झमान असे दोघेच दक्षिणेंत वावरत असून शहाजीचा संबंध त्यांपैकीं फक्त खान झमानशींच आलेला आहे. विजापूरकरां-तर्फे दोन्ही कालविभागांत एकच नांवाजलेला सेनापति वावरतांना दिसतो. तो म्हणजे रणदौलतखान. याशिवाय या स्वारींत नांवाजलेले असे पहिल्या प्रतीचे लोक अधिक दिसत नाहींत.

६. (पृ. १३५, १३६) साहू[१] व निजामशाहीकडील इतर बंडखोर[२] यांनीं मुख्य निजामशाही वारस[३] ग्वालेरच्या किल्ल्यांत अड-कल्यावर त्याच्या कुटुंबापैकीं एका मुलास[४] गादीवर बसवून त्याचें नांव निजामुल्मुल्क असें ठेविलें व निजामशाही मुलुखापैकीं कांहीं महाल आपले ताब्यांत घेऊन बंडखोरी सुरू केली होती. या वेळीं दौलताबादेच्या आसपासच्या प्रदेशावर बादशाहा (शाहजहान) चा अमल होता. त्यानें हुकूम केला कीं, खान दौरान बहादर, खान झमान व शायिस्तेखान यांनीं फौज घेऊन शत्रूला (शहाजीला) तंबी द्यावी. जर आदिलखान शत्रूला मदत न करतां आमच्यांशीं एकनिष्ठ राहील तर त्यास त्रास देऊं नये. नाहीं तर त्याचा मुलूख उद्ध्वस्त करावा."

७. शाहजहाननें पहिल्या प्रतीचे तीन सरदार शहाजीचा नायनाट करण्यासाठीं पाठविले. त्यांपैकीं खान दौरान एक आहे. याचीही निरवणूक शायिस्तेखान व खान झमान यांप्रमाणें ता. ७ रमजान-लाच[६] झालेली आहे. यास कोणतें काम सांगितलें होतें हें पुढें दिलेंच आहे. बादशाहानें खान दौरानजवळ राजा जयसिंग, विठ्ठलदास, मुबारिझखान, रशीदखान अन्सारी, माधवसिंग वलद राव रतन, अमरसिंग वलद गजसिंग, सझावारखान बिन लश्करखान, मुबारकखान नियाझी, नजर बहादर खीशगी, इहतमामखान, कझलबाशखान, सय्यद आलम बार्हा, नूर मुहम्मद मुखातिब अरबखान, जानसिपारखान, मुघलखान वलद झैनखान कोकुलताश,

कझ्झाकखान, लुत्फुल्लाह वलद लश्करखान, करमुल्लाह वलद अलीमर्दान बहादर, गोकुलदास शिसोदे, महेशदास राठोड, रशीदखानाचा भाऊ हादीदाद, ख्वाजा इनायतुल्लाह व कित्येक दक्षिणी लोक, तसेंच सराफराझखान, जोहरखान हबशी, उदाजीरामाचा मुलगा जगजीवन, सादात भकरी व इतर कांहीं मिळून १००० स्वार, तुफंगची व तीरंदाज अशी सुमारें २० हजार फौज दिली. या फौजेची बक्षीगिरी व वाकेनवीसी इसहाकबेग यास दिली आणि हुकूम केला कीं, राजा जयसिंग यानें विठ्ठलदास, अमरसिंग व इतर रजपूत यांसह अघाडीस रहावें; मुबारिझखानानें अफगाणांसह पिछाडीस असावें; खान दौरान बहादर यानें गोवळकोंडें व विजापूर यांच्या सरहद्दीवर असलेल्या नांदेड[९] व कंधार या गांवांच्या आसपास मुक्काम करावा आणि देश उद्ध्वस्त करीत त्या बाजूच्या उदगीर व औसा या बळकट किल्ल्यांस जिंकावें.

८. ( पृ. १५१ ) हुकुमाप्रमाणें कंधारास पोहोंचल्यावर खान दौराननें उदगीर व औसा हे किल्ले घेण्यासाठीं कमर बांधली आणि रसदेचा मार्ग बंद पडू नये म्हणून जागोजाग चौक्या बसविल्या. एवढें करून तो उदगीरजवळ एक कोसावर गेला असतां शव्वालच्या ८ तारखेस[^] त्यास बादशाही हुकूम आला कीं, आदिलखान निष्ठा व पेशकश या बाबतींत ढिलाई करीत आहे. तरी खान दौराननें बीदरच्या बाजूनें आदिलखानावर चढाई करावी. तेव्हां खान दौराननें आपलें सामान वंजरेच्या कांठीं ठेविलें व नव्या वर्षाच्या रात्रीं ( ता. १२ शव्वाल ) कूच करून पहाटे पांच वाजतां कल्याण ( कल्याणी ) गांठलें. तेथील लोकांची लढण्याची तयारी नसल्यानें त्यानें केलेल्या हल्ल्यामध्यें सुमारें २००० माणसें पडलीं, कित्येक कैद केलीं गेलीं व पुष्कळ लूट हस्तगत झाली. नंतर त्यानें नारायणपूर[१०], भालकी, मकनाथ वगैरे गांवें घेऊन चार दिवसांत पन्नास महाल उद्ध्वस्त केले आणि एक दिवस बंबरा[१०] नदीच्या कांठी विश्रांति घेऊन तीन दिवसांत पुन्हा भालकीस आला.

९. या वेळीं विजापूरकरांकडून खान दौरान यास तोंड देण्यासाठीं नेमलेले बहलोल, रणदौलतचा चुलता खैरियतखान बीजापुरी,

याकूत हबशीचा नातू याकूत, यांनीं बीदरपाशीं मुक्काम केला होता. तेथून त्यांनीं दोन हजार स्वार खान दौरानच्या लश्करानजीक पाठविले. तेव्हां आघाडीस असलेल्या जयसिंगानें त्यांवर हल्ला करून त्यांस परतवून लाविलें. यानंतर खान दौरान भालकी येथून उदगीरपासून तीन कोसांवर असलेल्या देवणी" गांवीं आला. येथून त्यानें लूट व सामान नांदेड येथें पाठवून दिलें; पण तें तेथें पोहोंचे-पर्यंत तो तेथेंच राहिला. सामान नांदेड येथें पोहोंचल्यावर खान दौरान मुलूख लुटीत व बेचिराख करीत विजापूरकडे जाऊं लागला. वाटेंत त्यानें गुलबर्गा शहर घेऊन सुलतानपूर" व हीरापूर" हीं गांवें लुटलीं व तो भिवरेच्या तीरावर येऊन पोहोंचला. ( पृ. १५३ ) येथें त्याची व विजापुरी सैन्याची गांठ पडली.

१०. खान दौराननें विचार केला कीं, दोन मुक्काम मागें जाऊन व घोडेस्वार तयार करून हल्ला करावा; पण अरबखान, खाजा इनायतुल्लाह, अल्लाहयार कोका याचे मुलगे सुलतानयार व इस्फिदियार, बहमतखान, इहतमामखान व हुसेनी यांनीं शत्रूवर लगट केली आणि राजा जयसिंगानें कुमक केली. तेव्हां खान दौरानला मागें स्तब्ध राहणें योग्य न वाटून मुबारिझखानाला तळावर ठेवून तो स्वत: चकमकीच्या जागीं आला आणि शत्रूला हाकलून लावून त्यानें पुष्कळ लूट व घोडे जिंकले. नंतर तेथेंच एक दिवस मुक्काम करून दोन दिवसांनंतर विजापुराहून बारा कोस अंतरावर असलेल्या फीरोझाबादेस तो आला. तेथें त्यास मुकर्रमतखानाचें पत्र आलें कीं, विजापुरी लोकांनीं शापूर ( इडौ = शाहपूर )चा तलाव फोडून टाकला आहे व आजूबाजूच्या लोकांस किल्ल्यांत घेऊन पाणी व अन्न यांचें दुर्भिक्ष्य उत्पन्न केलें आहे. तेव्हां खान दौरान याकूत हबशीच्या नातवाच्या अतिशय समृद्ध अशा बेतली" व इतर महालांकडे रवाना झाला. जातांना त्यानें रात्र नारायणपूर येथें घालविली आणि उजाडण्याच्या पूर्वी स्वार होऊन व १४ कोस मजल मारून कमलापूरवर" तुटून पडला. तेथें पुष्कळ रसद व इतर वस्तू त्याच्या हस्तगत झाल्या. तेथून चार कोस पुढें जाऊन त्यानें रेहान सोलापुरीची जागीर लुटली,

कुत्बुलमुल्काच्या सरहद्दीपर्यंतचा शत्रूचा मुलूख उद्ध्वस्त केला व सुल्तानपूर-हीरापूरच्या आसपास जाऊन तेथून आपल्या एका विश्वासू मनुष्यास गोवळकोंड्याहून आलेल्या मुहम्मद तकीसह अब्दुल लतीफ सफीरबरोबर पेशकश पाठवून देण्याची ताकीद करण्यासाठीं गोवळकोंडें, बीजापूर व तेलंगण या ठिकाणीं पाठविलें आणि स्वतः गोवळकोंड्याच्या व बादशाही प्रदेशाच्या सीमेवर वंजरेच्या कांठीं जाऊन राहिला. इतक्यांत बातमी आली कीं, खान जहानच्या विरुद्ध असलेल्या रणदौलतखानाच्या मदतीसाठीं आपल्यापासून १२ कोस अंतरावर असलेली शत्रूची फौज जात आहे. तेव्हां त्यानें तेलंगणांत असलेल्या कोतकूर[१४] किल्ल्यांत सैन्याचा तळ ठेवला व त्याच दिवशीं सोळा कोस मजल मारून देगलूर [१५] येथें शत्रुपक्षाचा समाचार घेण्यासाठीं तो आला.

११. दुसरे दिवशीं २४ कोस मजल मारून व उदगीरचा घाट उतरून तो औशाच्या बाजूस आला. शत्रू जवळच आहे अशी माहिती मिळाल्यामुळें त्यानें तेथेंच मुक्काम केला. दुसरे दिवशीं बातमी आली कीं, रणदौलतनें सय्यिद खान जहानची सन्मुखता सोडून देऊन सोलापूरचा रस्ता धरला आहे. या वेळीं बादशाही फर्मान आलें कीं, आदिलखानाकडून उदगीर व औसा हे किल्ले आपणांस देण्याची विनंति करण्यासाठीं, मीर अबुल हसन व काजी अबू सईद हे आले होते; पण ते निजामशाही असल्यामुळें त्यास देण्याचें त्यानें नाकारलें. तसेंच मुकर्रमतखानाच्या अर्जावरून कळून आलें कीं, यामुळेंच तो परत येऊन हुकुमाची वाट पहात आहे. तेव्हां आतां मुलखाची खराबी न करतां औसा व उदगीर हे किल्ले घेण्याचा प्रयत्न करावा. म्हणून खान दौरान २३ मोहरम रोजीं[१६] उदगीरला वेढा घालण्यास निघाला. (पृ. २१७) हा खान उदगीरला पोहोंचल्यावर प्रथम त्यानें दोन्ही किल्ल्यांच्या अधिकाऱ्यांना लिहून धाडलें कीं, निजामशाही सर्व मुलूख बादशाहाच्या ताब्यांत आला असून या दोन किल्ल्यांची मागणी आदिलखानानें सोडून दिली आहे. तेव्हां तुम्ही दोन्ही किल्ले आमच्या स्वाधीन करावे. नाहीं तर आम्ही जबरदस्तीनें दोन्ही किल्ले ताब्यांत घेऊं. किल्लेदारांनीं सूचनेकडे लक्ष न देतां

किल्ल्यांची दुरुस्ती चालविली आहे हें पाहून खान दौराननें ता. २५ मोहरमला[१६] उदगीर गांवांत मुक्काम ठोकला व किल्ल्यास मोर्चे लाविले. त्यांत नजर बहादर खीशगी, इहतमामखान, पहिलवान दरवेश सुर्खरू यांस किल्याच्या दक्षिण दरवाजावर, सराफराझखान दक्षिणी, सझावारखान वलद लश्करखान व चंद्रमन बुंदेला यांस नैर्ऋत्येच्या दिडीवर, मुबारिझखान व हसन आका रूमी यांस कांहीं बरकंदाजांसह किल्ल्याच्या पश्चिम बाजूस असलेल्या भुयार करण्यासारख्या ठिकाणीं, नेमून त्यानें ठरविलें कीं, जेव्हां जेव्हां मोर्चेवाल्यांस मदत लागेल तेव्हां तेव्हां ती मी करीत जाईन. तेव्हां पश्चिमेकडील लोकांनीं मोर्चे पुढें सरकवून भुयार खणण्यास सुरवात केली.

१२. भुयार किल्ल्यापाशीं पोहोंचतांच किल्ल्यांतील लोक घाबरले व किल्लेदार सीदी मिफ्ताह हबशी यानें खान दौरानशीं बोलणें लाविलें कीं, मला जर बादशाही नोकरींत घेतलें तर मी किल्ला आपल्या हवालीं करतों; पण ही अट कबूल करतांच त्यानें दुसऱ्या अयोग्य अटी पुढें टाकल्या. तेव्हां खान दौराननें शेर हाजी बुरुजापाशीं पोहोंचलेल्या भुयारवाल्यांस तो बुरूज उडविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो बुरूज वर असलेल्या तोफ वगैरे युद्धसामग्रीसह उडविला गेला; पण आंतील किल्ल्याच्या भागास त्यामुळें नुकसान न पोहोंचल्यानें खान दौराननें आपल्या लोकांस लगट करूं दिली नाहीं; पण सीदी मिफ्ताहास मात्र सांगून पाठविलें कीं, जर किल्ला बादशाहाकडे सोपविलास तर ठीक; नाहीं तर प्राणांस मुकावें लागेल. त्यास शरण येण्याशिवाय दुसरा मार्ग न राहिल्यानें तो खान दौरानपाशीं आला. (पृ. २१९) आणि लौकरच गुरुवार ता. ८ जमादिलावलास[१७] म्हणजे वेढा सुरू झाल्यापासून सुमारें तीन महिन्यांनीं त्यानें तो किल्ला इब्राहीम आदिलशाहाचा नातू इस्माईल—हा येथें कैदेंत असून यास पकडण्यासाठीं मुहम्मद आदिलखानानें मोठ्या युक्तीनें सीदीचा उपयोग केला होता—यासह बादशाहाच्या ताब्यांत दिला. हा किल्ला इतका मजबूत होता कीं, तो घेण्यास लागलेली ३ महिने मुदत थोडीच समजली पाहिजे.

१३. इस्माईल हा इब्राहीमचा मुलगा दुर्वेश आणि मुहम्मद

कुली कुत्ब याची बहीण यांचा मुलगा होता. जेव्हां इब्राहीमास वाटलें कीं, आपला दुसरा मुलगा मुहम्मद यास गादी मिळावी, तेव्हां त्यानें आपला अत्यंत विश्वासू चाकर जो दौलत कलावंती त्यास मरतांना सांगितलें कीं,माझ्यानंतर मुहम्मदाला गादीवर बसवा. इब्राहीमनंतर जेव्हां मुहम्मद गादीवर आला तेव्हां दुर्वेशचे डोळे काढले गेले. या वेळीं दुर्वेशच्या बायकांनीं सहा वर्षांच्या इस्माईलास गुप्त रीतीनें निजामाकडे पाठविलें होतें. कदाचित् ही गोष्ट स्पष्ट झाल्यास मुहम्मद आदिल आपल्याशीं शत्रुत्व करील या भीतीनें त्यानें त्यास उदगीरचा किल्लेदार सीदी मिफ्ताह याच्या हवालीं केलें. त्यानें त्यास १० वर्षें या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें व या वेळीं त्यास खान दौरानच्या हवालीं केलें. ( पृ. २२० ) खान दौराननें सीदी मिफ्ताह यास तीन हजारी जात, १५०० स्वार आणि हबशखान हा किताब देण्याबद्दल बादशाहास विनंतिपत्र लिहून तो स्वत: औसा किल्ल्याकडे जाण्यास निघाला.

१४. या किल्ल्यास पूर्वीं त्यानें मोर्चे लावण्याची व्यवस्था करून रशीदखानास वेढा घालून बसण्यास सांगितलें होतें. आतां खान दौराननें तेथील किल्लेदार भोजराज यास लिहून पाठविलें कीं, उदगीर किल्ला आम्ही घेतला. यामुळें शहाणपण शिकून जर किल्ला ताब्यांत दिलास तर तुझी सुटका आहे; नाहीं तर कैद व्हावें लागेल. या गोष्टीच्या कबुलीची बातमी खान दौरानकडे न आल्यानें खानानें किल्ला घेण्याचा प्रयत्न करण्याविषयीं सैन्यास फर्माविलें. सैन्यानें वरून मारा होत असतांही किल्ल्याच्या खंदकापर्यंत चर नेऊन भिडविले. तेव्हां किल्ल्यावरील लोक व भोजराज हे भिऊन गेले व भोजराजानें सांगून पाठविलें कीं, मला बादशाही नोकरींत घेतल्यास मी किल्ला हवालीं करतों व त्याची खात्री झाल्यावर ता. २९ जमादिलावल [१८] म्हणजे किल्ल्यास वेढा घातल्यावर तीन महिन्यांनीं किल्ला खान दौरानच्या ताब्यांत आला. त्या किल्ल्याच्या रखवालीस इहतमामखान ठेवल्याचें व भोजराजास एक हजारी जात व पाचशें स्वार अशी मनसब देण्याविषयीं बादशाहास कळवून खान दौरान परत फिरला.

(पृ. २२१ ) खानाच्या लिहिण्याप्रमाणें दोघांही किल्लेदारांना तेलंगणांत जागीर मिळाली व खानाचा योग्य सन्मान करण्यांत आला.

१५. ( पृ. १४०–१५१) या वेळीं (ता. ८ शव्वाल[१९] ?) दिसून आलें कीं, आदिलखानानें वाईट उपदेशाच्या नादीं लागून व आपल्या निष्ठेचा विचार न करतां उदगीर व औसा येथील किल्लेदारांस गुप्त रीतीनें पैसा पाठविला; एवढेंच नव्हे, तर त्यानें त्या दोन किल्ल्यांच्या संरक्षणासाठीं खैरियतखान यास व साहूस मदत करण्यासाठीं रणदौलतखानास पाठविलें आहे. यामुळें रागावून जाऊन बादशाहानें या दिवशीं सय्यिद खानजहान याची सिपहदारखान, रुस्तुमखान, शाहनवाझखान, मुर्तजाखान, सफशिकनखान रिज्वी, रावकर्ण, पाचशें बरकंदाजांसह खलीलुल्लाहखान मीर आतिश, मिर्झा हैदर सफ्वीचा मुलगा नौदर, मिर्झा रुस्तुम सफ्वीचा नातू मुरादकाम, शेरखानतरीन, अहदाद महमंद, हरीसिंग राठोड, किलेदारखान, राजा बहरोझ वलद राजा रोझ अफ्झून, सय्यिद लुत्फ अली भकरी, जयराम वलद राजा अनूपसिंग, खाजा अबुलबका, याकूबबेग वलद शाहबेगखान काबुली, राव रतनचा नातू इन्द्रसाल, इस्माईलखान अताई याचा मुलगा अब्दुलहादी, दक्षिण्यांपैकीं वाली ( वली ) महलदारखान, मन्गोजी, हसनखान वलद फख्रुल्मुल्क, कृष्णाजी शर्झेराव, यशवंतराव व इतर मन्सबदार– हे सर्व मळून दहा हजार स्वार झाले–यांसह त्यास रगडण्यासाठीं योजना केली. खानजहानचा निरनिराळ्या वस्तूंनीं सन्मान करून त्याला हुकूम दिला कीं, खानजहाननें सोलापूरच्या बाजूनें आदिलखानाच्या प्रदेशांत जाऊन रणदौलतास साहूची मदत करूं देऊं नये व विजापुरी मुलूख वैराण करावा. जर आदिलखान गफलतींतून जागा होऊन निष्ठेच्या मार्गावर आला तर त्यांनीं आपला हात आखडावा; पण न आला तर त्याच्या नाशाचा प्रयत्न करावा.

१६. (पृ. १५५ ) सय्यिद खानजहान शाहगढ[२०] व बीड[२०] यांच्या आसपास येऊन तेथून धारूर[२१] येथें गेला व सामानसुमान तेथें ठेवून फौजेची व्यवस्था करूं लागला. त्यानें हुकुमाप्रमाणें शाहनवाझखान सफ्वी कोशबेग याला आघाडीस ठेविलें आणि राव

कर्ण बहुरथी ( भोरठे ), नौदर वलद मिर्झा हैदर सफ्वी, रुस्तुमचा नातू मुरादकाम, हरीसिंग राठोड, किलेदारखान, जयराम वलद राजा अनूपसिंग व इतर यांना त्याजबरोबर दिलें. डावी बाजू रुस्तुमखानाबरोबर अहदाद महमंद, राजा रोझ अफ्झूनचा मुलगा राजा बहरोझ, खाजा अब्दुल हादी वलद सफ्दरखान व इतर यांस दिली. मुर्तजाखानाबरोबर शेरखानतरीन, राजा रामदास व वृद्धावस्था आणि आजारीपणा यामुळें धारूर येथें राहिलेल्या सफशिकनखान रिज्वीचे लोक व इतर दिले आणि त्यांसउजवी बाजू संभाळण्यास सांगितलें. या सैन्याची पिछाडी सिपहदारखानाकडे दिली आणि त्याच्या मदतीसाठीं खलीलुल्लाहखानासह तोफखाना, देवीसिंग व सय्यिद लुत्फ अली भकरी यांचे लोक व इतर यांस दिलें.

१७. (पृ. १५५) नंतर धारूर येथून सायाजी (साबाजी? ) व किश्नाजी शर्झेराव यांना कांहीं दक्षिण्यांसह सिराढोण[२२] घेण्यासाठीं त्यानें पाठविलें. हे लोक ता. २६ शव्वालला[२३] एका क्षणांत सिराढोणपाशीं गेले. त्या वेळीं रैहान सोलापुरीच्या माणसांपैकीं अंबर नांवाचा एक मनुष्य त्याचें रक्षण करीत होता व त्यासाठीं तो किल्ल्याबाहेर एका आमराईंत राहिला होता. तो बादशाही सैन्य पाहून कांहीं लोकांसह किल्ल्यांत पळून गेला व राहिलेले लोक बादशाही सैन्याच्या तलवारींना बळी पडले. या सैन्यानें किल्ल्यास वेढा घातला आणि तिसऱ्या दिवशीं किल्ला सर केला. किल्ल्यांतील सर्व सामान ताब्यांत घेऊन सैन्यानें अंबरला खानजहानकडे पाठवून दिलें. त्यानें अंबरास दक्षिणी लोकांकडे परत पाठविलें. नंतर किश्नाजी शर्झेरावास सिराढोण येथें ठेवून स्वतः खानजहान धारासीवच्या[२४] बाजूस गेला. याच वेळीं त्यानें रैहान सोलापुरीचे तीन महाल उद्ध्वस्त केले, तेथें जमा झालेल्या टोळच्यांस कैद केलें आणि पुष्कळ सामानसुमान हस्तगत करून शव्वालच्या २९ तारखेस[२५] तो धारासीव येथें पोहोंचला. तेथील लोक पळून गेले असल्यानें त्यांची मालमत्ता त्यानें लुटली. अब्दुल्लाहखान बहादरचा पुतण्या अबुल बका यास तेथील ठाणेदार करून दुसरे दिवशीं तो सोलापूरपासून सहा कोसांवर असलेल्या काटी[२६] या गांवीं

आला व तेथील गढीस त्यानें वेढा घातला. एका चकमकीनंतर गढी ताब्यांत येऊन तेथील सामग्री हस्तगत झाली. (पृ. १५७) काटी ताब्यांत आल्यावर देवगांव[१७] उद्ध्वस्त केलें व हातीं लागेल तें घेऊन तो साहोरे[१८] येथें गेला. या वेळीं आदिलखानानें रणदौलतखान हबशीच्या हाताखालीं पाठविलेली फौज दिसूं लागली. कांहीं फौजेनें खानजहानच्या फौजेशीं तोंड दिलें व बाकीची पळून गेली (पृ. १५७) जिल्कादच्या ५ तारखेस[१९] बादशाही सैन्य कूच करणार तोंच शत्रू पिछाडीवर चालून आला. तेव्हां आघाडीस असलेला शाहनवाझखान कुमकेस धावून आला व मदतीस आलेल्या सिपहदारखान व रुस्तुमखान यांसह शत्रूवर घसरला. यामुळें दोन कोसांत लढाईची धुमश्चक्री माजून राहिली. खान जहाननें शत्रूची चढाई झालेली पाहून मुर्तजाखानास गोटाचें रक्षण करण्यास सांगितलें, आपण शाहनवाझखानाच्या मदतीस आला व त्यानें अनेकांचा धुव्वा उडविला. या झटापटींत शत्रुपक्षाचा मुख्य रणदौलत जखमी होऊन त्यास लढाईंतून जावें लागलें. तेव्हां खान-जहान धारासीव येथें परत आला व जिल्कादच्या मध्यापर्यंत तेथेंच राहिला. शत्रू पुन्हा चालून येत असल्याची बातमी आल्यावर त्यानें आपलें सामान धारासीवच्या ठाणेदारापाशीं ठेविलें व १४ जिल्कादला[२०] तो शत्रूवर चाल करण्यास निघाला.

१८. (पृ. १५७) सात कोस रस्ता चालल्यावर एक प्रहर दिवसाला तुळजापूर[२१] परगण्याच्या जवळ शत्रूची व त्याची गांठ पडली. रणदौलतखान जखमी असूनही लढाईस उभा राहिला. तसेंच त्याचा बाप फर्हाद हा आदिलखानी सैन्य घेऊन सिपहदारखानावर जाऊन आदळला. सिपहदारखान व खानजहाननें त्याच्या मदतीस पाठविलेलें सैन्य यांनीं त्यांवर हल्ला करून त्यांस एक कोस पाठीमागें रेटलें. दुसरे लोकही दोन प्रहरपर्यंत बादशाही सैन्याशीं लढून नंतर पळून गेले. रसदेच्या टंचाईमुळें बादशाही सैन्य येथून धारासीवकडे परत गेलें. त्यानें निश्चय केला कीं, सामानसुमान सिराढोण येथें ठेवावें, औसा आणि नळदुर्ग[२२] यांमधून पुढें गुलबुर्ग्याकडे जावें व त्या बाजूचा मुलूख उद्ध्वस्त करावा. त्याप्रमाणें व्यवस्था

करून खानजहाननें जिल्कादच्या बावीस तारखेस[३३] ठरविलेलें काम करण्यास सुरवात केली. (पृ. १५९) थोड्याच दिवसांत तो औशापाशीं दोन कोसांवर जाऊन पोहोचला असतां ता. १ जिल्हेजच्या[३४] रात्रीं तीन प्रहरानंतर शत्रू सैन्याच्या तळापाशीं आला व बाण फेकूं लागला. पण खानजहानचें सैन्य लढाईस तयार होतांच शत्रू पळून गेला. दुसरे दिवशीं कूच होण्याच्या सुमारास पुन्हा शत्रूनें सिपहदारखान व देवीसिंग यांवर हल्ला केला; पण लढाईस सुरवात होण्याच्या सुमारास खलीलुल्लाहखान सिपहदारखानाच्या मदतीस गेला. (पृ. १५८) खानजहाननेंही एक तुकडी त्याच्या मदतीस पाठविली. तेव्हां बादशाही सैन्यानें शत्रुसैन्यास उधळून लावलें व दोन कोसपर्यंत त्यांचा पाठलाग करून बहुतेकांची कत्तल केली. इतक्यांत सय्यिद खानजहानही शत्रूवर घसरला व त्यानें त्यास उधळून लावलें. याच वेळीं रुस्तुमखान व शाहनवाझखान यांनींही आपल्यावर चालून आलेल्या शत्रूचा धुव्वा उडविला. सय्यिद खानजहाननें मुलूख उद्ध्वस्त झाला आहे व पावसाळा जवळ आला आहे असें पाहून वाटेंत शत्रू भेटल्यास त्यास मारून काढावें व बादशाह सांगेल तेथें राहावें या इराद्यानें बीडकडे कूच केलें. ता. ११ जिल्हेजला[३५] बादशाही सैन्यानें कूच केल्यावर सिराढोणपासून आठ कोसांवर शत्रुसैन्य पुन्हा बादशाही सैन्याच्या पिछाडीस दिसूं लागलें. तेव्हां बादशाही सैन्याच्या आघाडीस असलेल्या शाहनवाझखानानें खानजहानला विनंति केली कीं, शत्रू युद्धाच्या इच्छेनें पिछाडीवर चालून आला आहे. आज मी पिछाडीस राहतों. खानजहाननें ही गोष्ट कबूल केली. आणखी एक कोस अंतर चालून गेल्यावर शत्रूनें शाहनवाझखानाच्या लोकांवर हल्ला चढविला. एक प्रहर मोठी लढाई झाली. शत्रू लढाई देत आहे असें पाहून खानजहान शाहनवाझखानास येऊन मिळाला. डाव्या बाजूनें खलीलुल्लाहखान, तोफखान्यासह सय्यिद लुत्फ व अली आणि उजव्या बाजूनें मुर्तजाखान व शेरखानतरीन हेही येऊन मिळाले. सर्वांनीं शत्रूस पळवून लाविलें. (पृ. १६०) या वेळीं खेलोजी भोसला व रैहान सोलापुरी यांनीं रुस्तुमखानावर चालून घेतलें; पण सिपहदारखान मदतीला

आला व दोघांनीं या सैन्यास परागंदा केलें. शेवटीं बऱ्याचशा लोकांचा नाश झाल्यावर शत्रूनें पळ काढला व बादशाही सैन्य सिराढोण, वंजरेचा किनारा या मार्गानें धारूरास आलें. (पृ.१६१) इतक्यांत आदिलखान व शाहजहान यांच्यामध्यें तह झाल्यामुळें खानजहान यास हुजूर येण्याबद्दल फर्मान आलें; त्याप्रमाणें तो व रुस्तुमखान, सिपहदारखान, शाहनवाझखान, खलीलुल्लाहखान आणि इतर साथीदार यांसह ता. ५ मोहरमला[३६] बादशाहाकडे गेला.

१९. (पृ. ७६) इतरांप्रमाणें शायिस्तेखानासही बादशाहानें ता. ७ रमजानला[३७] वस्त्रें दिलीं व त्याजबरोबर अल्लाहविर्दीखान, शेख फरीद वलद कुत्बुद्दीनखान, यक्काताझखान, राजा संग्राम, सय्यिद अबुलफतह, सय्यिद अब्दुलवह्हाब, मीर जअ्फर वलद मीर हाज, तसेंच दक्षिण्यांपैकीं सादतखान बीजापूरी, रावतराम, सुरूर-खान, फर्हादखान, मेदिनीराव व खानखानाच्या फौजेपैकीं २००० फौज मिळून आठ हजार फौज देऊन त्यास जुन्नर, नासिक, त्रिंबक, संगमनेर हे किल्ले [ शहाजीच्या ताब्यांतून ] हस्तगत करण्याचा हुकूम दिला. ( पृ. १३९ ) ता. ५ शव्वालला[३८] शायिस्तेखानाकडून लिहून आलें कीं, अहमदखान नियाझी यानें मसीजचा किल्ला साहूच्या लोकांपासून हस्तगत केला. (पृ.१४१) ता. ११ शव्वालला[३९] शायिस्तेखानाकडून पत्र आलें कीं, खबरदुर्ग ( खेड )[४०] येथील निजामशाही गढीदार सालिहबेग यानें त्या गढींत साहूचे जे लोक होते त्या सर्वांना कैद करून भोंवतालच्या प्रदेशासह ती गढी बादशाहाच्या स्वाधीन केली. ( पृ १५१ ) ही हकीकत इतर माण-सांची आहे; पण शायिस्तेखान स्वतः नौरोझच्या पूर्वीं दोन दिवस ( नौरोझ=१२ शव्वाल[४१] ) संगमनेरास आला व त्यानें त्या बाजूचे परगणे शाहूच्या मुलाकडून घेण्यास सुरवात केली. या वेळीं शत्रू नासिककडे गेला आहे असें कळल्यामुळें शायिस्तेखानानें शेख फरीद वलद कुत्बुद्दीनखान यास त्या बाजूची ठाणेदारी देऊन तिकडे, अहमदखान नियाझी यास दिंडोरीकडे[४२] व अहदाद महमंदखान यास अकोल्याकडे[४३] ( अहमदनगर जिल्हा ) मुलूख जप्त करण्यासाठीं व परागंदा झालेल्या रयतेस दिलासा देऊन वस्ती

करविण्यासाठीं पाठविलें. बंडखोर, फरीदखान येत आहे असें पाहून कोंकणांत निघून गेले.

२०. शायिस्तेखानास ही बातमी समजल्यावर त्यानें खानखानाच्या लोकांचा मुख्य बाकिर यास १५०० स्वारांसह जुन्नर परगणा घेण्यास पाठविलें. इतक्यांत त्यास हुकूम आला कीं, संगमनेरची मनाजोगती व्यवस्था झाली आहे व अहमदनगरच्या आसपासचा मुलूख मोकळा आहे; तरी त्यानें तेथें ताबडतोब निघून जावें. या हुकुमाप्रमाणें शायिस्तेखान वाटेस लागतो तोंच त्यास बाकिरच्या लिहिण्यावरून कळून आलें कीं, बाकिर साहूच्या मुलांच्या पाठलागावर कोंकणच्या बाजूस गेला आहे व जुन्नरास फारच थोडे लोक शिल्लक आहेत. तेव्हां त्यानें खानखानाच्या लोकांपैकीं पाचशें लोक सय्यिद अली अकबर याच्या हाताखालीं देऊन त्यास जुन्नरकडे पाठविलें. बंडखोर माहुलीकडे[४४] गेले आहेत असें समजल्यावरून बाकिर तिकडे गेला. या वेळीं साहूचा मुलगा साहू चांभारगोंद्याजवळ असल्यानें त्याजकडे गेला आणि बरोबर लोक घेऊन जुन्नरच्या किल्ल्याकडे–येथें त्याची (साहूची ?) मुलेंमाणसें होतीं–आला. तो जुन्नरजवळ येतांच बादशाही सैन्य गांवांतून बाहेर आलें व लढाईस तोंड लागलें.

२१. शायिस्तेखानास ही बातमी लागतांच त्यानें आपल्या बरोबरचे सातशें लोक या लोकांच्या कुमकेस पाठविले. बंडखोरांनीं जुन्नरच्या लोकांस कुमक पोहोंचू नये म्हणून रस्ता रोखून धरला. तरीही ही कुमक शहरांत (जुन्नरांत) जाऊन पोहोंचली; पण रसद वगैरेंची अडचण पडू लागल्यानें या लोकांनीं शायिस्तेखानाकडे आणखी मदत मागितली. या वेळीं शायिस्तेखानाजवळ–बहुतेक फौज निरनिराळ्या ठिकाणीं पाठविल्यामुळें–फार थोडे लोक शिल्लक होते. तरी त्यानें मोठ्या जलदीनें धावून येऊन शत्रूस परागंदा केलें. तसेंच भिवरेच्या किनाऱ्यापर्यंत पाठलाग करून कित्येकांस कापून काढलें व नंतर तो परत आला. जुन्नरचा किल्ला इतका बळकट होता कीं, तो जवळ असलेल्या लोकांच्या सहाय्यानें घेतां येईल असें त्यास वाटेना. म्हणून त्यानें बाकिरास कोंकणांतून परत

बोलावून त्यास शहराच्या रक्षणास ठेविलें व स्वतःनें थोड्याच अवधींत जुन्नर व संगमनेर हे परगणे बादशाही मुलखांत दाखल केले. नंतर बादशाही हुकुमाप्रमाणें तो ता. २५ जिल्हेजला[४५] ( २५ जिल्हेजच्या हुकुमाप्रमाणें ? ) दरबाराकडे रवाना झाला. (पृ. १८६ ) व ता. २ मोहरमला[४६] त्यानें बादशहाची भेट घेतली.

२२. ( पृ. १३८, ३९ ) [ अल्लाहविर्दीखानास शाहजहाननें शायिस्तेखानाबरोबर दिलें होतें हें वर आलेंच आहे; पण नंतर त्यास दुसऱ्या कामगिरीवर नेमिल्यामुळें तो स्वतंत्रतेनें तें काम करीत आहेसें दिसतें. याची हकीकत बादशाहनाम्यांत ता. २६ रमजान[४७] या तारखेखालीं दिली आहे. तेव्हां यानें आपलें काम ता. २६ पूर्वी सुरू केलें असें म्हणावयास हरकत नाहीं. ] ज्या वेळीं बादशहास समजलें कीं, धरप[४८] ( घोडप ) व चांदा[४९] ( चांदवड ) या बाजूस असलेल्या निजामशाही किल्ल्यांपैकीं सहा किल्ले शहाजीचे लोक, दोन किल्ले भुजबळ नायकवाडी व सहा इतर बंडखोर यांच्या ताब्यांत आहेत व ते धामधूम माजवून आसपासच्या लोकांस त्रास देत आहेत तेव्हां त्यानें अल्लाहविर्दीखानास हुकूम केला कीं, त्यानें शायिस्ते-खानाच्या फौजेपैकीं यक्काताझखानासह दोन हजार फौज घेऊन त्या बाजूस जाऊन ते किल्ले घ्यावे. ( पृ. १३८, १३९ ) हुकुमा प्रमाणें अल्लाहविर्दीखान घोडपला जाण्यासाठीं मार्गस्थ झाल्यावर प्रथम तो चांदवड किल्ल्याच्या पायथ्याशीं आला व किल्ल्यास त्यानें वेढा घातला. मोठ्या शिकस्तीनें त्यानें तो शव्वालच्या १६ तारखेस[५०] हस्तगत केला. तेव्हां आपल्या प्राणांवर बेतलें असें पाहून आसपासचे बंडखोर त्यास शरण आले. यानंतर चांदवडच्या किल्ल्याहूनही उत्तम असलेल्या इंजराही[५१] किल्ल्याचा किल्लेदार कोन्हेरराव हा शरण आला व त्यानें ता. १९ शव्वालला[५२] किल्ला बादशाही लोकांच्या हवाला केला. दुसरे किल्लेदार वश व्हावे म्हणून अल्लाहविर्दीखानानें कोन्हेररावास दोन हजार जात व हजार स्वार एवढ्या मनसबीची तजवीज करून पन्नास हजार रुपये नगदी दिले. येथून तो धोडपच्या किल्लेदाराशीं संबंध ठेवणाऱ्या कांजना[५३] व मांजना या किल्यांना हस्तगत

करण्यासाठीं निघाला व ता. २१ शव्वालला[५४] या किल्ल्यांना वेढा घालण्यांत आला. यक्काताझखानास महादरवाजा, स्वतःचा मुलगा घझ्नफर यास उत्तर, दुसरा मुलगा हसन अली यास दक्षिण व सुरूर खानास पाठ संभाळण्यास सांगून स्वतः जेथून मोर्चेवाल्यास मदत करतां येईल अशा ठिकाणीं थांबला. या सर्वांनीं एकदम जोर केल्यामुळें किल्ल्यावरील लोकांची अतिशय गाळण उडाली. तेव्हां कोन्हेररावानें किल्लेदारांशीं पैगाम बांधून व स्वतःच्या भावास किल्ल्यांत पाठवून त्या किल्लेदारांना अल्लाहविर्दीखानाकडे आणलें आणि अशा रीतीनें ते दोन किल्ले ताब्यांत आले. याच प्रकारानें रवळा, जवळा, अहिवंत, कोल, योसरा, अचलागड[५५] व इतर किल्ले बादशाही मुलुखांत सामील करण्यांत आले. राजहबीर[५६] (राजदेहर) हा किल्ला मात्र, यावर निजामशाहाच्या नात्याचे लोक रहात असल्यानें व किल्लेकऱ्यांनीं तो कसून लढविल्यानें दोन महिने हातीं आला नाहीं. शेवटीं अल्लाहविर्दीखान हा किल्ला घेऊन धोडप किल्ल्यापाशीं गेला व तेथें त्या किल्ल्यास वेढा घालण्याच्या विचारांत तो असतां तेथील किल्लेदार भुजबळराव यानें असमर्थतेमुळें बोलणें लाविलें कीं, जर मला एक लाख रुपये रोख आणि योग्यतेप्रमाणें मनसब व जागीर द्याल तर किल्ला हवालीं करतों. तेव्हां अल्लाहविर्दीखानानें याविषयीं बादशाहाकडे लिहून पाठविलें व स्वतः पावसाळा जवळ आल्यानें तेथेंच राहिला. बादशाहाकडून, किल्ला ताब्यांत दिल्यावर भुजबळरावास एक लाख रुपये रोख, एक हजारी जात व आठशें स्वार इतकी मनसब देण्याविषयीं लिहून आल्यावर ता. २५ मोहरमला[५६] किल्ला अल्लाहविर्दीखानाच्या ताब्यांत आला.

२३. (पृ. १४६–१४८) शाहजहाननें इतरांप्रमाणें खान झमान याचे बरोबर, बहादरखान रोहिला, सय्यिद शुजाअतखान, राव सत्रसाल, राजा बहार(पहाड)सिंग बुंदेला, पृथ्वीराज राठोड, खाजा बरखुर्दार, भीम राठोड, राजा किसनसिंग भिदोरे (=?), भगवानदास बुंदेला, उझबकखान, हकीम खुशहाल, हबीब करांनी, राव लल्लूकचंद, दिलेर हिम्मत, शामसिंग राठोड, मुघल बलद

मिर्झा शाहरुख, मुख्तारखानाचा भाऊ सय्यिद मिर्झा, रावत दयाल-दास झाला, तसेंच दक्षिण्यांच्या कांहीं टोळ्या, मालोजी, कारतलब-खान, जाधवराव पदवी धारण करणारा पतंगराय, आतिशखान हबशी, विठोजी, दत्ताजी वलद बहादरजी, रुस्तुमराव, हाबाजी, बिरबलराव, जगत्सिग आणि इतर थोडे दक्षिणी लोक यांना एक हजार तीरंदाज व तोफची यांसह—एकंदर फौज २० हजार—देऊन आघाडी छत्रसाल व इतर रजपूत यांचेकडे आणि पिछाडी बहादरखान व अफगाणांचा ताफा यांजकडे सोपविली आणि हुकूम केला कीं, खान झमाननें अहमदनगरास जावें व तेथून जवळच असलेला साहूचा वतनी महाल असलेलें चांभारगोंदें व त्याच्या ताब्यांतील कोंकण हे प्रदेश जिकावे आणि हुकूम-होतांच त्या प्रदेशांत असलेला आदिलखानी मुलूख लुटून उद्ध्वस्त करावा. ( पृ. १३६, १३७ ) खान झमान बादशाही आज्ञेप्रमाणें अहमदनगर येथें आला व घासदाण्यासाठीं त्यानें तेथें कांहीं दिवस मुक्काम केला. पुरेशी सामग्री मिळतांच त्यानें आपली आघाडी, डावी बगल, उजवी बगल, पिछाडी या बाजूस बहादरखान, सय्यिद शुजाअतखान, शाहबेगखान व राव सत्रसाल यांस नेमिलें व तो जुन्नरच्या बाजूस रवाना झाला. तो अहमदनगरपासून सहा कोसांवर असलेल्या अकोळनेर गांवीं आला असतां त्यास समजलें कीं, माहुलीचा किल्लेदार मीनाजी भोसले याशीं सल्ला करून तो किल्ला साहूनें आपल्या ताब्यांत घेतला आहे. आणि त्याच्यासह जुन्नरास येऊन पारगावच्या[७] वाटेनें परिंड्यास निघून जावें असा त्यांचा विचार आहे. म्हणून त्यानें अकोळनेराहून कूच केलें व १५ कोस मजल मारून जुन्नरजवळ असलेल्या राजपूर ( राजूरी ) या गांवीं मुक्काम केला. दुसरे दिवशीं सकाळीं १९ कोस मजल मारून पारगांवास आला. साहू पुढें जाण्यासाठीं म्हणून या गांवास आला होता. त्यास फौज आल्याची बातमी समजतांच पारगांवाहून निघून त्यानें पुणें व चाकण या बाजूस जाणारी आडवाट पत्करली. ( पृ. १६० ) कांहीं कालानंतर खान झमान यास समजून आलें कीं, साहू भिवरा उतरून आदिलखानी प्रदेशांतील आपल्या इजाफतीपैकीं

पुणें परगण्यांतील लोहगांवास गेला आहे. आदिलखानी मुलखांत न शिरण्याचा हुकूम असल्यामुळें खान झमाननें ही स्थिती बादशाहास कळविली व त्याचा हुकूम येईपर्यंत तो भीमेच्या कांठीं थांबला.

२४. तेथें असतां त्यानें आसपासच्या मुलखाची आबादानी करण्याचा प्रयत्न केला. बहादरखानास त्याच्या महालापासून वीस कोसांवर असलेल्या अशा या महालाचें साहूच्या धुमाकुळापासून रक्षण करण्यास सांगितलें आणि शाहबेगखानाची चांभारगोंदें घेण्याच्या कामावर नेमणूक करून त्यानें तेथेंच राहावें असें फर्माविलें. हुकुमाप्रमाणें शाहबेगखानानें चांभारगोंद्यास जाऊन तेथील किल्ल्यास वेढा घातला. किल्लेकऱ्यांनीं तीन प्रहरपर्यंत तो किल्ला लढविला; पण शेवटीं ते शरण आले. शाहबेगखानानें किल्लेकऱ्यांस अभय देऊन किल्ला ताब्यांत घेतला. बादशाही हुकूम येईतों आपण जुन्नर सरकार हस्तगत करावें या उद्देशानें भिवरेच्या तीरावरून आतां खान झमान जुन्नरकडे जाऊं लागला. या वेळीं त्यास हुकूम आला कीं, शायिस्तेखानास संगमनेराहून जुन्नरास ताबडतोब जाऊन तो परगणा हस्तगत करण्यास सांगितलें असल्यामुळें खान झमाननें तिकडे जाऊं नये. (पृ. १६१) ज्याप्रमाणें खान जहान व खान दौरान हे परिंडा व काटी या बाजूंनीं आदिलखानी मुलखांत धुमाकूळ घालीत आहेत त्याप्रमाणें त्यानेंही इंदापूरच्या बाजूनें चाल करून साहू व त्याच्या कुमकेस आलेले आदिलखानी लोक यांस तंबी द्यावी. त्याप्रमाणें खानझमाननें आपलें कांहीं सामान व लोक बहादरखानाकडे पाठविले व आपण ता. १८ शव्वालला[८८] आदिलखानी मुलखांत शिरून तो उद्ध्वस्त करूं लागला. २६ शव्वालला[८९] [इडौ = २७ शव्वाल] खान झमान दूदाबाई[९०] [इडौ = दूदबाई] येथें येऊन तेथें त्यानें थोडा मुक्काम केला. शत्रूनें धाडस करून येऊं नये यासाठीं त्यानें आपले पाचशे लोक तेथें ठेविलें आणि आपण घाटावर जाऊं लागला. अर्धी वाट चालून आतो तोंच शत्रू त्यास दिसूं लागला. दबा धरून बसलेल्या बादशाहाच्या लोकांनीं शत्रूवर चाल केली. खान झमानही त्यांवर तुटून पडला व दोन कोसपर्यंत त्यांचा पाठलाग झाला. कित्येकांना जखमी करून व यमसदनास पाठवून तो परत आला.

२५. याच वेळीं खान झमानच्या पिछाडीस असलेल्या सत्रसाल-वर शत्रूनें हल्ला केला. त्यानें शत्रूस मारून काढिलें व परत तो खान झमान यास येऊन मिळाला. या चकमकींत कांहीं रजपूतहि पडले. (पृ. १६२) दुसरे दिवशीं खान झमान लश्करासह घाट उतरला व ७ दिवसांत[६१] कोल्हापूरजवळ जाऊन त्यानें किल्ला व शहर यांस वेढा घातला. किल्लेकऱ्यांनीं किल्ला लढविला; तरीही त्यानें तो हस्तगत केला. या वेळीं त्यास खबर लागली कीं, त्या बाजूचे लोक जवळच्याच एका डोंगरावर एकत्र झाले असून त्यांजबरोबर बायकामुलें व सामानसुमान आहे. तेव्हां खान झमाननें बहादुरखान व शाहबेगखान यांस त्यांना तंबी देण्यासाठीं पाठविलें. त्यांनीं त्यांच्यावर हल्ला करून जवळजवळ २००० लोक कैद केले व अगणित माल हस्तगत केला. नंतर खान झमान कोल्हा-पुराहून किशनगंगेला[६२] आला. तेव्हां साहू व विजापुरी लोक त्याच्याजवळ आले व ३ दिवसपर्यंत लढाई देऊन नंतर ते पळून गेले. तेव्हां खान झमान रजपुतांसह शाहबेगखानास तळावर ठेवून मध्यरात्रीं शत्रूच्या पाठलागास निघाला. (पृ. १६३) व सकाळच्या सुमारास शत्रूजवळ येऊन पोहोंचला. शत्रूनें सामानाची व्यवस्था अगोदरच लावून टाकली होती; यामुळें शत्रूची व त्याची थोडी चकमक होऊन नंतर शत्रू पळून गेला. बादशाही लश्करानें कांहींची कत्तल केली व ज्या सामानाची शत्रू कांहीं व्यवस्था करूं शकला नाहीं असें सामान हस्तगत केलें.

२६. दुसरे दिवशीं बादशाही लश्कराचें कूच होण्याच्या वेळीं शत्रूचें सैन्य बहादुरखान व शुजाअतखान यांवर घसरलें. बादशाही सैन्य शत्रूंपैकीं कांहींना स्वर्गास पाठवीत आहे तोंच, शाहबेगखानानें उजव्या बाजूनें शत्रूवर हल्ला चढविला व त्यास परतविलें. इकडे खान झमा-ननें धावून जाऊन मिरज गारद केली. तेथून ६ दिवसांनीं तो रायबागेस गेला. तोंच शत्रूच्या सैन्यानें त्याचा पाठलाग करण्यास व बाणांनीं जर्जर करण्यास सुरवात केली. तेव्हां बादशाही सैन्यानें मिरजेपासून ८ कोसांवर नदी (कृष्णा) उतरून तिच्या कांठीं मुक्काम केला. येथून रसद मिळविण्यासाठीं एक टोळी बाहेर गेली असतां या वेळीं

शत्रूनें शाहबेगखानावर हल्ला चढविला. (पृ. १६५) खान झमाननें थोड्या लोकांनिशीं व शाहबेगखानानें उलट शत्रूवर हल्ला चढविला. त्यांत शत्रूचा पराभव होऊन दोन कोसपर्यंत त्याचा पाठलाग झाला. या वेळीं चांगला मार बसल्यामुळें भिवरा नदीवर लश्कर येईपर्यंत शत्रू लश्कराभोंवतीं फिरकला नाहीं. भिवरेच्या तीरावर सैन्य आराम करीत असतांना खान झमान यास हुजूरकडे येऊन साहूस शिक्षा करून जुन्नर हस्तगत करण्याविषयींची योजना समजावून घेण्याबद्दल फर्मान आलें. याचें कारण असें होतें कीं, आदिलखान शरण येऊन त्यानें पुढील अटी कबूल केल्या होत्या.[६३] (१) रत्नें, हत्ती, वस्त्रें, सोनें, वगैरे रूपांत वीस लाख रुपये खंडणी द्यावयाची. (२) साहूनें निजामशाही मुलखांतील जुन्नर वगैरे किल्ले बादशाहाच्या ताब्यांत दिल्यास विजापूरकरांनीं त्यास आपल्या नोकरींत (पृ. १६५) घ्यावें; पण तसें न केल्यास तसें करण्यासाठीं विजापूरकरांनीं बादशाहास मदत करावी. हुकुमाप्रमाणें खान झमान आपलें सामान व कुमकी लोक यांस अहमदनगर येथें ठेवून बादशाहाच्या भेटीस गेला. ता. २५ (मोहरम ?) रोजीं[६४] त्याची व बादशाहाची भेट झाली तेव्हां बादशाहानें पोषाक, घोडा वगैरेंनीं त्याचा सन्मान केला व जवळच असलेली जुन्नर व इतर ठिकाणें घेणें आणि साहूस रगडणें या कामावर त्याची योजना करून हकीम खुशहाल यास त्याच्या फौजेची बख्शीगिरी दिली.

२७. (पृ. १७७) दरबारांतून पुन्हा मान पावून बिदा झालेला खान झमान कुमकी व स्वतःचे लोक यांस जाऊन मिळाला. तेव्हां बातमी आली कीं, साहू आदिलशाही नोकरींत गेला नाहीं आणि जुन्नर व इतर किल्ले बादशाही चाकरांच्या ताब्यांत देऊं इच्छीत नाहीं. याच वेळीं आदिलखानानें रणदुल्लाखानास पाठवून सांगितलें कीं, साहू रहात असलेला किल्ला व त्याच्या ताब्यांतील इतर किल्ले घेण्याच्या बाबतींत बादशाही नोकरांशीं एकदिल होऊन त्यांच्या मुख्याच्या शब्दाबाहेर जाऊं नये. खान झमान जुन्नरजवळ धावून आला आणि त्यानें कारतलबखान, रावतसिंग, औरंगखान, सय्यिद, मिर्झा, राणा जगतसिंगाचे हजार स्वार व हजार बंदूकस्वार

यांसह बहादुरखानास तो किल्ला घेण्यावर नेमिलें. नंतर स्वतः पुण्याच्या आसपास असलेल्या साहूचा नायनाट करण्याच्या इरादानें मार्गस्थ झाला. (पृ. २२६) पण घोडनदीच्या कांठीं आल्यावर अतिवृष्टि व तुफान यांमुळें त्यास तेथेंच एक महिना थांबावें लागलें. पाणी कमी झाल्याबरोबर तो नदीपार होऊन इंद्रायणीच्या कांठीं लोहगांवाजवळ येऊन उतरला. लोहगांवापासून १७ कोसांवर असलेल्या लबाड साहूस ही खबर लागतांच त्यानें कोंढाणा व नूरुंद[६५] (मुरुंब–राजगड) या डोंगरांत पलायन केलें (अमल-इ–सालिह खंड २ पृ. १६३ वर अशीच माहिती).

२८. या वेळीं खान झमानची फौज व साहूची फौज यांमध्यें इंद्रायणी, मुळा व मुठा अशा तीन मोठ्या नद्या होत्या व त्या तुफान भरल्या होत्या. याच सुमारास रणदुल्ल्यानें लिहून पाठविलें कीं, मी निजामाच्या ताब्यांतील इतर किल्ल्यांच्या चाव्या ते किल्ले साहूकडून घेऊन आपणांस आणून देतों. तरी माझें पत्र येईपर्यंत आपण तेथून हालूं नये. खान झमाननें रणदुल्ल्याकडे मनुष्य पाठवून पाठलागाच्या बाबतींत त्याचें मत घेतलें व त्याकडून लिहून आल्यावर त्याच्या म्हणण्याप्रमाणें इंद्रायणी उतरून खान झमाननें आपल्या फौजेचे तीन भाग केले. पैकीं एक आपल्यापाशीं ठेवला; दुसरा छत्रसालाच्या हाताखालीं व तिसरा पृथ्वीराज याच्या हाताखालीं देऊन तो बूर[६६] घाटाचा रस्ता चालूं लागला. या वेळीं साहूनें मोठी जलदी केली व कुंभा[६७] घाट उतरून कोकणांत जाऊन तेथें तो दंडाराजपुरी व इतर ठिकाणच्या ठाणेदार वगैरेंच्या आश्रयास गेला; पण त्यांनीं हाकलून दिल्यामुळें तो पुन्हा कुंभा घाटानें वर आला. या वेळीं बादशाही सैन्य त्याच खिंडीनें कोकणांत उतरूं लागलें आणि रणदुल्लाही स्वतः घाटापाशीं आला. तेव्हां साहूनें निराश होऊन माहुलीच्या बाजूस पळ काढला.

२९. (पृ. २२७) खान झमान यास ही बातमी लागली तेव्हां त्याचें सैन्य तळाशीं आलें नव्हतें किंवा रणदुल्लाही जवळ आला नव्हता. तरीहि त्यानें स्वस्थ बसणें बरें नव्हे असें ठरवून त्याचा पाठलाग सुरू केला व दैवयोगें ज्या बाजूस साहू भटकत होता

त्याच बाजूस तो गेला. या वेळीं त्यास बातमी लागली कीं, आपल्या पासून १५ कोसांवर असलेल्या मुरंजन[६८] किल्ल्यावर साहू गेला असून तेथें थोडें थांबून पुढें रवाना व्हावें असा त्याचा विचार आहे. तेव्हां तो त्या किल्ल्यापासून तीन कोसांवर येऊन दाखल झाला. या वेळीं त्याजपाशीं रस्ता कठीण व दलदलीचा असल्यामुळें थोडेच लोक आले होते, तरीही त्यानें गडाच्या पायथ्याशीं जाऊन तोंड किल्ल्याकडे फिरविलें. साहूनें आपलें कांहीं सामानसुमान अगोदरच दुसरीकडे पाठविलें होतें व नंतर स्वतः पळवाटेनें दुसरीकडे जाऊं लागला. तो थोडा मार्ग जातो तोंच, शत्रूनें त्यास घेरलें व त्यांजपैकीं बऱ्याच जणांस कापून काढलें; पण त्यानें पाठविलेल्या सामानसुमानाची जप्ती न करतां त्याचा बारा कोस पाठलाग केला.

३०. प्रदेश दलदलीचा व दाणागोटयाची तीव्र टंचाई यांमुळें बादशाही सैन्य यापेक्षां जास्त हालचाल करूं शकलें नाहीं; पण यामुळें मिळालेल्या फुरसतीचा फायदा घेऊन साहू कांहीं निवडक व कसलेल्या माणसांसह निसटला. मात्र घोडे, सामान, उंट, नगारे, छत्री, पालखी, निशाणें वगैरे निजामाचें सामान बादशाही सैन्याच्या हातीं लागलें. (पृ. २२८) त्या दिवसाची रात्र साहूचेच तंबू उभारून त्यांत त्या सैन्यानें काढली. इकडे एका अहोरात्रांत साहू माहुलीस पोहोचला व प्रथम त्यानें विचार केला कीं, त्रिंबक, त्रिगलवाडी,[६९] या बाजूस जावें; पण रस्त्यांत कदाचित् आपण शत्रूचे हातीं लागूं अशा भीतीनें त्यानें तेथेंच मुक्काम केला आणि निष्ठावान् अशा कांहीं लोकांना जवळ ठेवून बाकीच्यांस रजा दिली. नंतर स्वतः सुरक्षिततेसाठीं दुर्दैवी मुलगा व आवश्यक सामान घेऊन किल्ल्यांत शिरला. खान झमानास माहुलीपासून बारा कोसांवर ही माहिती लागतांच रस्ता कठीण होता तरी एका दिवसांत तो माहुलीच्या पायथ्याशीं आला. किल्ल्याच्या खालीं असलेले पहारेकरी व रसद जमा करण्यासाठीं हिंडणारे लोक यांनीं बादशाही सैन्य दिसतांच पोबारा केला आणि रसद व सामान बादशाही सैन्यास मिळालें. खान झमाननें किल्ल्याच्या थोरल्या दरवाजास मोर्चे लावण्याचें काम पहाडसिंग बुंदेला याजवर सोपविलें व स्वतः

रस्ता धरून बसला. कांहीं दिवसांनीं रणदुल्ला तेथें आला. त्यानें पहिल्या दरवाजापासून सात कोस अंतरावर असलेल्या दुसऱ्या दरवाजास मोर्चे लावले. त्यामुळें निरुपाय होऊन साहूनें बोलणें लाविलें कीं, 'मला बादशाही नोकरींत घेत असल्यास मी किल्ला हवाली करतों.' (पृ. २२९) खानानें जाब दिला कीं, 'सुटका करून घ्यावयाची असल्यास आदिलखानाकडे जा, नाहीं तर तुला प्राणास मुकावें लागेल.' तेव्हां निरुपायानें त्यानें आदिलखानाच्या ताब्यांत जाऊन अहदनामा मिळण्याची आदिलखानास विनंती केली.

३१. अहदनामा आल्यावर त्यांतील आपल्या विरुद्ध असलेल्या अटी पाहून त्यानें त्याप्रमाणें वागण्याचें नाकारलें. पण खान झमानचा जास्त जोर होऊं लागला. त्यामुळें निरुपायानें साहू किल्ल्यावरून खालीं येऊन रणदुल्लाखानास भेटला व त्यानें निजामास त्याच्या स्वाधीन केलें. तसेंच विजापूरच्या नोकरींत शिरण्याचा विचार करून जुन्नर वगैरे किल्ले बादशाही लोकांच्या ताब्यांत देण्याचें ठरविलें. दुसरे दिवशीं त्यानें इतर विनंत्याविषयींचें एक पत्र, आदिलखानाकडून अहदनामा आणणारा अबू सईद व त्याचा वकील यांबरोबर खान झमानकडे पाठविलें; पण खान झमान यास बादशाही हुकूम आलेला नसल्यानें त्यानें अबू सईद यास उत्तर न देतांच निरोप दिला व पत्राची नक्कल स्वतःच्या पत्रासह दरबाराकडे पाठवून दिली. साहूनें आपले कांहीं विश्वासू लोक अबू सईद याजबरोबर देऊन त्यास जुन्नर, त्रिंबक, त्रिंगलवाडी, हरीस,[७०] जिवधन, चवंड (चावंड), हरसरा[७१] हे किल्ले बादशाही लोकांच्या ताब्यांत देण्यासाठीं खान झमानकडे पाठविले. खान झमाननें प्रत्येक किल्ल्याच्या संरक्षणासाठीं आपल्यांपैकीं एक एक मनुष्य आणि कांहीं प्यादे व घोडेस्वार देऊन साहूच्या मनुष्यांबरोबर पाठविले. (पृष्ठ २३०) व हुकूम केला कीं ताबडतोब त्या बाजूस जाऊन किल्ले ताब्यांत घ्या. स्वतः मात्र कांहीं दिवस निजामाचा निकाल लावण्यासाठीं तेथेंच राहिला. विजापूरकडून पत्र आल्यावर रणदुल्लानें निजामास खान झमानच्या स्वाधीन केलें व साहूस

बरोबर घेऊन तो विजापुरास गेला. खान झमान तेथून बादशाह्-झादा औरंगजेब याच्या भेटीसाठीं दौलताबादेस रवाना झाला.[७२]

३२. या स्वारीचें एकच एक कारण होतें आणि तें म्हणजे शहाजीस बुडविणें. वास्तविक फत्तेखान हुसेन निजामशाहासह मुघलांच्या स्वाधीन झाला व हुसैनशाहास मुघलांनीं ग्वालेरच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें तेव्हांच निजामशाहीचा अवतार संपला होता; पण शहाजी स्वस्थ बसणारा नव्हता. त्यानें पूर्वीच हाताशीं धरलेल्या मुलास आतां (श. १५५५ किंवा १६३३ जून) उघडपणें गादीवर बसविलें होतें व नासिक, त्रिंबक, जुन्नर, संगमनेर, वगैरे परगणे व कोंकणापर्यंतचा त्या बाजूचा मुलूख त्यानें मागेंच हस्तगत केला होता; एवढेंच नव्हे तर धोडप व चांदवड या बाजूचे ६ किल्लेही त्यानें आपल्या कब्जांत आणले होते. शिवाय ७।८ किल्ले त्याजशीं मित्रत्वानें वागणाऱ्या लोकांच्या ताब्यांत असून त्यानें त्या लोकांस मुघली अमल न मानण्याबद्दल शिकविलें होतें. तसेंच चांभारगोंदें, पुणें, चाकण, खेड, कोंढाणा, मुरुंबदेव ( राजगड ), वगैरे बाजूचा मुलूखहि त्याच्याच ताब्यांत होता. यामुळें तो निजामशाही बुडविण्याच्या बाबतींत मोठाच अडथळा बनला होता.

३३. तेव्हां शाहजहाननें त्याला बुडवावें या हेतूनेंच ही स्वारी काढली होती. मुक्रमतखानास आदिलशाहाकडे पाठविल्याबद्दल जी हकीकत बादशाहनाम्यांत आहे तीवरून किंवा आदिलशाहाकडे मुक्रमतखानाबरोबर जें पत्र पाठविलें होतें त्यावरून किंवा शाहजहाननें निरनिराळ्या सेनापतींस प्रत्यक्ष जें काम सांगितलें होतें त्यावरून बादशाहाचा हेतू विजापूरकरांस त्रास देण्याचा नसून शहाजीस उखडण्याचा होता हें उघड होत आहे. पण जेव्हां मुक्रमतखानाच्या लिहिण्यावरून दिसून आलें कीं, आदिलशाह आपणांस मदत तर करीत नाहींच; पण उलट आपल्या विरुद्ध असणारांस गुप्त रीतीनें मदत करून आपल्या विरुद्ध लढण्यास उत्तेजन देत आहे, तेव्हां मात्र त्यानें आपल्या सेनापतीस आदिलशाही मुलूख उद्ध्वस्त करण्याचे सख्त हुकूम सोडले. यामुळें लवकरच आदिलशाहानें शाहजहानशीं तह केला व शहाजीचा पाडाव करणें

शाहजहानास सोपें गेलें. तह्यामुळें विजापूरकरांनीं शहाजीविरुद्ध मुघलांस मदत करण्यासाठीं म्हणून रणदुल्लाखानास पाठविलें. पण त्यानें मुघलांना मनापासून मदत केली कीं नाहीं याविषयीं शंका येण्यास जागा आहे. खान झमान शहाजीचा पाठलाग करीत असतां रणदुल्लाखानानें त्यास कांहीं वेळ – 'मी शहाजीकडून गडाच्या किल्ल्या आणून देववितों' असें सांगून–थोपवून धरलें होतें. शहाजी कोंकणांत गेला असतां खान झमानही कोंकणांत उतरला; पण रणदुल्ला घाटावरच रेंगाळत राहिला. खान झमाननें माहुली किल्ल्यास वेढा घातला तरी रणदुल्लाखान माहुलीस येऊन पोहोंचला नव्हता. या गोष्टी काय दर्शवितात ?

३४. या हकीकतीवरून दुसरी एक गोष्ट ध्यानांत येते ती ही कीं, या वेळीं शहाजीस मोठें महत्त्व प्राप्त झालें होतें. शहाजीला विजापूरकरांनीं कां पत्करलें याचा विचार करण्यासारखा आहे. आपलें राज्य वाढावें अशी ज्याप्रमाणें मुघलांना इच्छा होती, त्याचप्रमाणें विजापूरकरांनाहि होती; पण त्यासाठीं निजामशाही बुडणें विजापूरकरांना फारसें फायदेशीर नव्हतें. कारण निजामशाही बुडाल्यानें मुघल व ते यांची हद्द एकमेकांस भिडून रोज मुघलांशीं भांडण्याचा प्रसंग येणार होता. असें होणें म्हणजे शक्तीचा अपव्यय होणार होता. यासाठीं मध्यें कोणाचा तरी प्रदेश –कीं ज्याचें उत्पन्न विजापुरी खजिन्यांत येत नसे– असणें अवश्य होतें. शहाजीचा प्रदेश पुणें, चाकण, वगैरे भागांत असल्यानें ही गोष्ट शहाजी विजापूरकरांकडे असल्यावर आयतीच साधण्यासारखी होती. शिवाय शहाजी विजापूरकरांकडे आल्यानें एक सेनापति या नात्यानें त्याचा मोठा उपयोग विजापूरकरांना होण्यासारखा होता. मुघल व विजापूरकर यांची हद्द एकमेकांजवळ आल्यानें मुघलांची स्वारी आपणांवर केव्हां होईल याची विजापूरकरांना सारखी भीति वाटत असल्यामुळें प्रसंगीं मुघलांशींही दोन हात करण्यास धजावणारा शहाजी विजापूरकरांकडे असणें त्यांना फायद्याचेंच होतें. मुघलांशीं लढण्याचा प्रसंग न आल्यास दक्षिणेंत राज्य वाढविण्याची जी महत्त्वाकांक्षा मुहम्मदशाहानें धरली होती ती फलद्रूप

होण्याच्या कामीं शहाजीचा उपयोग होता. या दृष्टीनेंही विजापूरकरांकडे शहाजीचें राहणें आवश्यक होतें; यामुळेंच तहाच्या अटींमध्यें विजापूरकरांनीं शहाजीस मुघलांनीं आश्रय न देतां आम्हांकडेच द्यावें; एवढेंच नव्हे तर कुत्बशाहानेंही शहाजीस आश्रय देऊं नये असें ठरवून घेतलें होतें.

३५. या उलट मुघलांकडे शहाजीच्या तोलाचे सरदार पुष्कळ असल्यानें त्यांना शहाजीची विशेष गरज नव्हती व त्यानें मुघलांच्या विरुद्ध जाऊन मुघलांस पुष्कळ त्रासहि दिला होता; यामुळें मुघल-विजापूरकर तह होतांना मुघलांनीं शहाजीस आपल्या नोकरींत घेण्याचें नाकारलें. शहाजीची मात्र मुघलांकडे जाण्याची इच्छा होती असें मागें जी हकीकत आली आहे तीवरून दिसतें. मुघलांकडे जाण्यांत त्याचा फायदा काय होता हें नीट समजत नाहीं; पण मुघलांकडून पूर्वीं त्यास जी जागीर मिळाली होती व त्यानें जे किल्ले हस्तगत केले होते व विजापूरकरांनीं दिलेली अथवा त्याच्या ताब्यांत असलेली पुणें-चाकणकडील जागीर ह्या सर्व एकत्र केल्या असतां बराच मोठा सलग प्रदेश त्याच्या ताब्यांत येण्याचा संभव त्यास वाटत असावा. विजापूरकरांकडे गेल्यानें वरील तऱ्हेचा सलग प्रदेश त्याच्या ताब्यांत आला नाहीं ही गोष्ट स्पष्ट आहे. असा सलग प्रदेश ताब्यांत येता तर शिवाजीला स्वतंत्र राज्य स्थापन करण्यास पडले एवढे प्रयास कदाचित् पडले नसते.

३६. असो. तर या स्वारींत शहाजीचा पराजय झाला व निजामशाही स्थापण्याचा त्याचा हेतू सिद्धीस गेला नाहीं. तरी त्याचें वैयक्तिक महत्त्व वाढल्याशिवाय राहिलें नाहीं.

## उपर्युक्त लेखावरील टीपा

१. साहू = शहाजी. २. हे बंडखोर कोण होते ? शहाजीस मिळालेल्या लोकांची यादी शिवभारतांत आहे; पण तींत फक्त आडनांवें आहेत (९।५ – ७). ३. या निजामाचें नांव हुसैन व याचा बाप बुऱ्हान निजामशाह. ४. या मुलाचें नांव मुर्तजा असून त्याचें वय या वेळीं १०।११ वर्षांचें होतें. यास गादीवर बसविल्याचा काळ जेधे शकावलींत श. १५५५

(टीपा पुढें चालू)

भाद्रपद मास असा दिला आहे. बु. स. मध्यें शहाजी २।३ वर्षें मुघलांशीं लढला असें सांगितलें आहे (बु. स. पृ. ४६४). शिवभारतांत मुघल व शहाजी यांच्या मधील लढाईचा काळ ३ वर्षें असा दिला आहे (अध्याय ९।१२). मुहम्मदनाम्यांत फतहखान हा हुसैन निजामशाह यास घेऊन कायमचा मुघलांकडे गेल्यावर शहाजीनें मुरारपंताच्या साहाय्यानें एका निजामशाही मुलास गादीवर बसविलें असें सांगितलें आहे (पृ. ८६). तेव्हां मुहम्मदनाम्याप्रमाणें श. १५५५ च्या आषाढ महिन्यांत मुलाला गादीवर बसविण्याचें ठरून शिवभारत व बु. स. यांशीं जुळती ही माहिती आहे असें होतें. याच्या उलट बादशाहनाम्यांत शाहजहानच्या ७ जुलूस सालीं एकदां शहाजीनें निजामशाही नातलगांपैकीं एकास हातीं धरून बंड उभारलें व नासिक, त्रिंबक, जुन्नर, संगमनेर, वगैरे महाल आपल्या ताब्यांत आणले असें सांगितलें असून त्यानें इतर लोकांनाही मुघली सत्ता झुगारून देण्याचा उपदेश केला; त्यामुळें गाळण्याचा किल्लेदार तो किल्ला शहाजीच्या ताब्यांत देण्याच्या विचारांत होता; पण खान झमाननें किल्लेदारास वश करून तो किल्ला २ रबिलाखर रोजीं (श. १५५४ कार्तिक शुद्ध ४, इ. १६३२ ऑक्टोबर ७) बादशाही सत्तेखालीं आणला असें सांगितलें आहे. येथें निजाम ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत अडकल्यावर म्हणजे जु. ६ जिल्हेज १९, श. १५५५ ज्येष्ठ वद्य ६ या दिवशीं फतहखान-मुघल तह झाल्यावर आषाढांत नवीन निजामशाह गादीवर बसला असें सांगितलें आहे. तेव्हां श. १५५४ किंवा श. १५५५ हें साल धरावयाचें हा प्रश्न आहे. मला वाटतें जेधे शकावलींतील काल बरोबर आहे. कारण गाळणा किल्ला जर श. १५५४ च्या कार्तिकाच्या आरंभींच हस्तगत झाला असें बादशाहनाम्यांत आहे तर मग तत्पूर्वी सुमारें १ महिना (भाद्रपद मासीं) शहाजीनें निजामशाहास हातीं धरून बंड उभारलें असें म्हणण्यास प्रत्यवाय येत नाहीं आणि जेधे शकावलींत निजामशाहावर छत्र धरलें याचा अर्थ अनौपचारिक रीतीनें गादीवर बसविलें असा घेण्यास हरकत नाहीं; कारण विजापूरचा पहिला अली आदिलशाह मिरजेच्या किल्ल्यांत तुरुंगांत असतांनाच त्यावर छत्र धरलें गेलें व नंतर कित्येक दिवसांनीं त्यास विजापूरच्या तख्तावर बसण्याचा योग आला अशी हकीकत हफ्त कुर्सी नांवाच्या एका अप्रकाशित ग्रंथांत आहे. तेव्हां जेधे शकावली व बादशाहनामा यांतील

(टीपा पुढें चालू)

हकीकत आणि बु.स. व मुहम्मदनामा वगैरेंचा मेळ आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ५. असा जरतरचा हुकुम देण्याचें कारण बादशाहानें मुक्रमतखान नांवाच्या एका गृहस्थास १० शाबानच्या सुमारास निष्ठाप्रदर्शन, पेशकश पाठविणें, निजामशाहीचा घेतलेला मुलूख मुघलांस देणें आणि साहू व इतर निजामी यांस आदिलशाही मुलखांतून हाकलून देणें,एवढीं कामें आदिलशाहाकडून करून घेण्यासाठीं पाठविलें होतें; पण त्याचें अनुकूल किंवा प्रतिकूल असें कोणतेंच उत्तर न आल्यानें असाच हुकूम काढणें आवश्यक होतें. पुढें मुक्रमतखानाकडून प्रतिकूल उत्तर आल्यामुळें ता. ८ शव्वालला आदिलशाही मुलूख उद्ध्वस्त करण्याविषयीं हुकूम सोडले आहेत. ६. श. १५५७ माघ शुद्ध ९ = इ. १६३६ फेब्रुवारी ५. ७. नांदेड व कंधार दोन्ही निजामाच्या राज्यांत. ८. श. १५५७ फाल्गुन शुद्ध १० = इ. १६३६ मार्च ६. ९. ता. १२ शव्वाल = श. १५५७ फाल्गुन शुद्ध १४ = इ. १६३६ मार्च १०. १०. निजामचें राज्यांत भालकीजवळ; पहा E. D. VII P54 N २. ११. निजामचें राज्य. १२. येतली बहुधा निजामच्या राज्यांत असावी मोठ्या नकाशांत सांपडत नाहीं. १३. कमलापूर निजामच्या राज्यात असावें. १४. हल्ली निजामच्या राज्यांत असावें. १५. श. १५५८ ज्येष्ठ वद्य ९ = इ. १६३६ जून १७. १६. श. १५५८ ज्येष्ठ वद्य ११ = इ. १६३६ जून १९. १७. श. १५५८ आश्विन शुद्ध ९ = इ. १६३६ सप्टेंबर २८. १८. श. १५५८ कार्तिक शुद्ध १ = इ. १६३६ ऑक्टोबर १९. १९. श. १५५७ फाल्गुन शुद्ध १० = इ. १६३६ मार्च ६. २०. शाहगड कोठें आहे? मोठ्या नकाशांत नाहीं. बहुधा निजामच्या राज्यांत असावा. २१. बीड निजामच्या राज्यांतील बीड जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. २२. बार्शी–आंबेजोगाई रस्त्यावरील ‘कळंब’ गांवापासून पूर्वाग्नेयीस १२ मैल. २३. श. १५५७ फाल्गुन वद्य १२ = इ. १६३६ मार्च २४. २४. निजामच्या राज्यांतील उस्मानाबाद जिल्हयाचें मुख्य ठिकाण. २५. श. १५५८ चैत्र शुद्ध १ = इ. १६३६ मार्च २७. २६. निजामच्या राज्यांतील उस्मानाबाद जिल्हयापैकीं तुळजापूर तालुक्यांत. २७, २८. दोन्ही गांवें काटीच्या जवळच असावींत. २९. श. १५५८ चैत्र शु. ७ = इ. १६३६ एप्रिल २. ३०. श. १५५८ चैत्र वद्य २ = इ. १६३६ एप्रिल ११. ३१. उस्मानाबाद जिल्हयांतील तुळजापूर

(टीपा पुढें चालू)

तालुक्याचें मुख्य ठिकाण. ३२. तुळजापूर तालुक्यांत. ३३. श. १५५८ चैत्र वद्य ९ = इ. १६३६ एप्रिल १९. ३४. श. १५५८ वैशाख शुद्ध ३=इ. १६३६ एप्रिल २७. ३५. श. १५५८ वैशाख शुद्ध १३ = इ. १६३६ मे ७. ३६. श. १५५८ ज्येष्ठ शुद्ध ६ = इ. १६३६ मे ३०. ३७. श. १५५७ माघ शुद्ध ९ = इ. १६३६ फेब्रुवारी ५. ३८. श. १५५७ फाल्गुन शु. ७ = इ. १६३६ मार्च ३. ३९. श. १५५७ फाल्गुन शुद्ध १३ = इ. १६३६ मार्च ९. ४०. पुणें जिल्ह्यांतील खेड तालुक्याचें मुख्य ठिकाण. ४१. श. १५५७ फाल्गुन शुद्ध १४=इ. १६३६ मार्च १०. ४२. नाशिक जिल्ह्यांतील दिंडोरी तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. ४३. अहमदनगर जिल्ह्यांतील अकोलें तालुक्याचें मुख्य ठिकाण. ४४. ठाणें जिल्ह्यांतील एक प्रसिद्ध किल्ला. ४५. श. १५५८ वैशाख वद्य १२ = इ. १६३६ मे २१. ४६. श. १५५८ ज्येष्ठ शु. ३ = इ. १६३६ मे २७. ४७. श. १५५७ माघ वद्य १३ = इ. १६३६ फेब्रुवारी २४. ४८. नाशिक जिल्ह्यांतील चांदवड व कळवण या दोन तालुक्यांच्या हद्दीवर. ४९. नाशिक जिल्ह्यांतील चांदवड. ५०. श. १५५७ फाल्गुन वद्य ३ = इ. १६३६ मार्च १४. ५१. चांदवडच्या वायव्येस ४।५ मैलांवर; इंग्रजी स्पेलिंग Indrai. ५२. श. १५५७ फाल्गुन वद्य ६ = इ. १६३६ मार्च १७. ५३. दोन्ही किल्ले चांदवड व कळवण या दोन तालुक्यांच्या उत्तर व दक्षिण सरहद्दीवर आहेत. ५४. श. १५५७ फाल्गुन वद्य ७ = इ. १६३६ मार्च १९. ५५. हे सर्व किल्ले एका बाजूनें दिंडोरी व चांदवड आणि दुसऱ्या बाजूनें कळवण या तालुक्यांच्या हद्दी ज्या ठिकाणीं एकत्र मिळतात, तेथें असलेल्या डोंगराच्या ओळींत आहेत. मला फक्त योसरा किंवा इलियट डौसनप्रमाणें बोसरा हा किल्ला सापडला नाहीं. कोलबद्दल कोलधेर (Koledhair) लिहिलेलें दिसतें. ५६. १५५८ ज्येष्ठ वद्य ११ = इ. १६३६ जून १९. ५७. बहुधा पारनेर (अहमदनगर जिल्हा) असावें. ५८. श. १५५७ फाल्गुन वद्य ५=इ. १६३६ मार्च १६. ५९. श. १५५७ फाल्गुन वद्य १२ = इ. १६३६ मार्च २४. ६०. हा घाट कोठें आहे हें निश्चित समजत नाहीं. पण मला वाटतें सातारा जिल्ह्याच्या सीमेवर असलेल्या आटपाडी महालाची दक्षिण बाजू व सातारा जिल्ह्यांतील खानापूर तालुक्याची उत्तर बाजू यांच्या सीमेवर

(टीपा पुढें चालू)

हा घाट असावा. हल्लीं या बाजूस भिवघाट, घाट नांद्रें वगैरे गांवें आहेत; एवढेंच नव्हे तर ज्या डोंगराच्या ओळींत हीं गांवें आहेत, त्याच डोंगराच्या टोकास दूदेबाई (Doodebaee)अशा नांवाचें गांवही सापडतें. ६१. इलियट डौसनप्रमाणें आठ दिवसांत. ६२. बहुधा येथें कृष्णा नदीच विवक्षित असावी. ६३. या तहाच्या अटी काय होत्या हें शिवाजी निबंधावली भाग ३, इंग्रजी विभाग, पृष्ठें ९० ते ९५ यांत विस्तारानें सांगितलें आहे; म्हणून त्या अटी येथें देत नाहीं. ६४. श. १५५८ ज्येष्ठ वद्य ११ = इ. १६३६ जून १९. ६५. नूरुंद म्हणजे मुरुंबदेव (नंतरचा राजगड) असावा; पण प्रो. सरकार या ठिकाणीं तोरनद शब्द आहे (सरकारकृत औरंगजेब खंड १ पृ. ४७) असें म्हणतात तें कसें! बादशाहनाम्यांत पृ. २२६ वर जेथें हा शब्द आला आहे, तेथें त्याचा अक्षरविन्यास स्पष्ट नून, वाव, रे, नून, दाल असा आहे; शिवाय तोरण्याचा इतका जुना म्हणजे श. १५५७।५८ च्या सुमाराचा किंवा त्याच्या अगोदरचा उल्लेख अस्सल कागदांत आढळत नाहीं व या मुरुंब-देवाचे १५५७।५८ च्या अगोदरचेहि उल्लेख आहेत. ६६. हा बूर घाट कोठें आहे? बोरघाट असावें. ६७. हा कूंभा घाट भोर संस्थान व कुलाबा जिल्हा यांच्या हद्दीवर कुर्डू किल्ल्याच्या पश्चिम-उत्तरेस सुमारें १ मैलावर आहे. ६८. हा किल्ला माथेरानजवळ आहे. मजजवळच्या नकाशांत (इ. १८५४) प्रबाळ किंवा मुरंजन असें एक गांव माथेरानच्या पश्चिमेस जवळच दिलेलें आहे. ६९. नाशिक जिल्ह्यांत इगतपुरीच्या वायव्येस ८।१० मैलांच्या आंतच. ७०. त्रिंबकच्या नैर्ऋत्येस ५।६ मैल. ७१. हे किल्ले जुन्नरच्या आसपास ८।१० मैलांच्या टापूंत आहेत. ७२. मुघल व विजा-पूरकर यांचा तह होऊन खान झमान शहाजीवर स्वारी करण्यास निघाल्या-पासून ते शहाजी शरण येऊन विजापूरच्या नोकरींत शिरेपर्यंतची हकीकत खान झमानचें शाहजहानच्या १० व्या जुलूसच्या रजब १२ तारखेस आलेल्या (श. १५५८ मार्गशीर्ष शुद्ध १४ = इ. १६३६ डिसेंबर १) पत्रावरून दिलेली आहे. उलट जेधे शकावलींत श. १५५७ युवा संवत्सरांत शहाजी माहुलीस गेला व तेथें मुघल आणि रणदुल्लाखान यांचा वेढा पडला व इतर हकीकत सांगितली आहे; पण या हकीकतीचा व बादशाहनाम्यांतील हकी-कतीचा स्पष्ट विरोध येत आहे. बादशाहनाम्यांत खान झमानची हकीकत

(टीप पुढें चालू)

सांगतांना अनेक ठिकाणीं शहाजीचे उल्लेख आले आहेत. या सर्व उल्लेखांचा विचार केला तर शहाजी श. १५५८ चा पावसाळा संपेतों माहुलीकडे गेलेला दिसत नाहीं. तर मग जेधे शकावलींत दिलेला काल खराकसा मानावयाचा ? या हकीकतींत फक्त माहुली किल्ला तेथील किल्लेदार मीनाजी भोसले याला वश करून आपल्या ताब्यांत घेतला अशी माहिती आहे व ती श. १५५७ तच पडत आहे; पण या माहितीचा अर्थ शहाजी राजे माहुलीस गेले असा करतां येईल काय ?

---

# ३. दर्याखानाचा बंडावा व शहाजीच्या हालचाली

१. श्री. सेतुमाधवराव पगडींना श्री. वा. सी. बेंद्रे यांचें मालोजी व शहाजीमहाराज हें पुस्तक पहात असतां वाकाई सुनोत नांवाच्या एका आईबाप ठाऊक नसलेल्या इंग्रजी प्रकरणाचा मराठी अनुवाद आढळला. त्यांत शाहजहानच्या पहिल्या राज्यवर्षी दर्याखानानें शहाजीचा पराभव करून त्यास परतविल्याचें एक विधान सांपडलें. नंतर शिवभारतांत शहाजी दर्याखानाचा पराभव करून शिवनेरीस गेल्याचें दुसरें विधान मिळालें. या दोन विधानांनीं प्रभावित होऊन त्यांनीं लोकसत्तेच्या ता. १-१०-६७ च्या अंकांत एक लेख लिहिला. त्यांत शिवाजीचा जन्म वाकाई सुनोतच्या आधारें-त्यांत शिवजन्माचा निर्देश नसतांनाच-इ. १६२८ मध्यें घातला. त्यासाठीं शिवभारतांतील शहाजीचा जयप्रसंग म्हणजे वास्तवीक पराभव-प्रसंगच असें धरलें. पण शिवजन्माचा महिना व तिथि हा तपशील वाकाई सुनोतमध्यें नाहीं आणि या दोन गोष्टी तर पाहिजेत; म्हणून शिवभारत व जेधे शकावली यांच्या शिवजन्मविषयक काल-निर्देशांपैकीं शक १५५१, शुक्ल संवत्सर, तसेंच तिथीच्या पुढील वार, नक्षत्र व योग एवढा वस्तुतः पूर्ण सुसंगत असलेला अंश अज्ञानमूलक, काल्पनिक व चुकीचा असा त्यावर भरमसाट आरोप करून व त्या निर्देशाची मनमानेशी मोडतोड करून, पण त्यांतील केवळ महिना, पक्ष व तिथि एवढा तपशील ग्राह्य व अचूक धरून

एका नव्या शिवजन्मतिथीचें अभिनव संशोधन त्यांनीं पुढें मांडलें आणि प्रायः याच सिद्धान्तास पोषक पण चमत्कृतिपूर्ण असा एक लेख नवभारताच्या नोव्हेंबरच्या अंकांत प्रकाशित केला. दरम्यान डॉ. र. वा. रामदास यांनीं 'लोकसत्ते'च्या व मी 'केसरी'च्या दि. २२-१०-६७ च्या अंकांत त्यांना उत्तरें दिलीं. डॉ. अ. रा. कुलकर्णी यांनींहि एक उत्तर तयार केलें आहे; पण तें अजून प्रकाशित व्हावयाचें आहे. आम्हां दोघांच्या उत्तरास प्रत्युत्तर म्हणून त्यांनीं लोकसत्तेच्या दि. ५-११-६७ च्या अंकांत एक व केसरीच्या दि. १९-११-६७ च्या अंकांत एक असे दोन लेख लिहिले. आतां माझ्या या प्रत्युत्तरास प्रतिप्रत्युत्तर म्हणून आणखी दहापांच लेख देखील ते लिहितील अशी माझी खात्री आहे. त्यांच्या या चारहि लेखांत त्यांनीं असें कांहीं लिहिलें आहे कीं, त्यावर मीहि दहापांच लेख लिहून त्यांचें सर्व लिखाण खोडून काढूं शकेन. पण त्यांना वाटेल तें व तेवढें लिहिण्यास सवड मिळते तशी मला मिळत नाहीं. यामुळें येथें मी त्यांच्या कांहीं मुद्द्यांवर लिहून माझ्यापुरता थांबणार आहे.

२. श्री. पगडींनीं त्यांच्या केसरींतील लेखांत मजवर आक्षेप घेतला आहे कीं, 'मी बादशाहनाम्याचा अभ्यास केला असता तर... या बाबतींत मी एवढेंच सांगूं इच्छितों कीं, श्री. पगडींनीं बादशाहनाम्याचें नांवहि कदाचित ऐकलें नसेल अशा वेळीं मी बादशाहनामा वाचला होता; एवढेंच नव्हे तर इ. स. १९३४ मार्चच्या पुरुषार्थाच्या अंकांत शहाजी व निजामशाहीचा अंत असा लेख लिहून त्यांत बादशाहनाम्याच्या या प्रकरणांतील माहितीचा अनुवाद प्रकाशित केला होता. पुढें कै. रा. ब. सरदेसाई यांनीं ता. १८ जुलै १९३४ च्या ज्ञानप्रकाशच्या अंकांत दर्याखानाचा बंडावा व शहाजीच्या हालचाली असा एक बादशाहनाम्यांतील या प्रकरणीं माहिती उद्धृत करणारा लेख लिहिला होता. त्यास उत्तर म्हणून ता. २० ऑगस्ट १९३४ च्या अंकांत मीहि या प्रकरणांतील त्यांच्या माहितींत सुधारणा व भर सुचविणारा लेख लिहिला होता. याबद्दल त्यांनीं पुढें मजवर रागहि धरला होता. तदनंतर मधून

मधून बादशाहनाम्याचा मी माझ्या पद्धतीनें अभ्यास केला. त्यांच्या दृष्टीला मी अभ्यास केला नाहीं असें दिसत आहे. बादशाह-नाम्यांत या प्रकरणीं कांहीं माहिती आली आहे हें मी माझा केसरींतील लेख लिहून दाखवीपर्यंत त्यांना ठाऊक असल्याचें मात्र त्यांच्या पहिल्या लेखावरून तरी दिसत नाहीं. असो. बादशाहनामा शाहजहानच्या कर्तबगारीचा इतिहास सांगणारा ग्रंथ आहे. शहाजीची कर्तबगारी सांगण्यासाठीं नाहीं. त्यांत शहाजीची प्रत्येक हालचाल नोंदली असण्याची अपेक्षा करणेंच योग्य नाहीं.

३. माझ्या केसरीमधील लेखास उत्तर म्हणून लिहिलेल्या लोकसत्तेमधील दुसऱ्या लेखांत श्री. पगडी लिहितात:– 'श्री. खरे जन्मतिथीस पांच पुरावे आहेत असें म्हणतात...तीन जन्मपत्रिका या रजपूत राजांच्या ज्योतिष्यांना दक्षिणेंत सापडलेल्या पत्रिकेच्या नकला असाव्यात असें ओझा यांनीं म्हटलें आहे. तीन पत्रिका म्हणजे तीन पुरावे नाहींत; पुरावा एकच.' कै. ओझा यांनीं वरील विधानें कुठें आणि केव्हां केलीं हें श्री. पगडींनीं दाखविलेलें नाहीं. माझ्या माहितीप्रमाणें कै. ओझा यांस तिसरी जन्मपत्रिका ठाऊक नव्हती. ती डॉ. दशरथशर्मा यांनीं प्रथम उजेडांत आणली. इ. १९३० मध्यें कै. ओझा यांना दोनच जन्मपत्रिका ठाऊक होत्या. त्यांचा एतद्विषयक लेख शिवाजी निबंधावलीच्या पहिल्या खंडांत प्रकाशित झाला आहे. त्यांत त्यांनीं तीन तर राहू द्याच; पण दोन्ही जन्मपत्रिका एकच असें कोठेंहि म्हटलेलें नाहीं. या तीन जन्मपत्रिका निरनिराळ्या रजपूत सरदारांनीं ते निर-निराळ्या काळीं दक्षिणेंत आल्यावेळीं मिळविल्या असल्यामुळें त्यांत व्यक्तीकरणपद्धतींत भेद झाला असला तरी त्या आत्म-विरोधी नाहींतच; पण परस्परविरोधीहि नाहींत. यामुळें जन्म-पत्रिकांचे तीन स्वतंत्र पुरावे आज मी मानतों. शिवाय जन्मपत्रिका स्वतंत्र असल्या किंवा नसल्या तरी तो पुरावा श्री. पगडी त्याज्य कसा ठरवितात हें त्यांनीं दाखवून दिलें नाहीं.

४. श्री. पगडींच्या केसरींतील लेखाचा अर्थ मला जो कळला

तो असा – शहाजी श. १५४९ किंवा इ. १६२८ च्या फेब्रुवारींतच आदिलशाही सोडून निजामशाहींत गेला. सैन्याची जमवाजमव करण्यांत त्याचे साधारणतः मार्च व एप्रिल हे दोन महिने गेले. मेमध्यें त्याची व दर्याखानाची लढाई होऊन दर्याखानानें त्यास खानदेशांतून हाकलून लावलें; तथापि दर्याखान शाहजहानच्या भेटीसाठीं उत्तरेंत गेल्यामुळें शहाजी खानदेशांतच घुटमळत राहिला. पण ऑगस्टच्या शेवटीं दर्याखान पुनः खानदेशांत आलेला पाहून शहाजी तेथून पळाला तो ऑगस्टच्या अखेरीस मावळांतल्या स्वारीवर दाखल झाला. या सर्व हालचालींत तो फक्त ऑगस्टमध्यें बालशिवाजीस पाहूं शकला. त्या वेळीं त्याचें सूर्यावलोकन, उपवेशन व अन्नप्राशन हे संस्कार पार पडले होते.

५. या त्यांच्या प्रमेयांवर अनेक आक्षेप आहेत. शहाजी विजापूर दरबारांत असतां सरलश्कर या नात्यानें इ. १६२८ मार्च ८ चें पत्र लिहितो. हा आधार पक्का धरला तर श्री. पगडींची पुढील सर्व इमारत ढासळते असें माझें मत आहे; पण श्री. बेंद्रयांच्या मालोजी राजे व शहाजीमहाराज या पुस्तकांत इ. १६२८ फेब्रुवारी २२ च्या एका अप्रकाशित पत्राचा निर्देश असून त्यांत शहाजीस सरलश्कर ही पदवी लावलेली नाहीं. यामुळें श्री. बेंद्रे या पत्राच्या आधारें शहाजीनें इ. १६२८ मार्च ८ पूर्वींच निजामशाहींत शिरकाव करून घेतला असें समजतात व आपणांस सोयीचें पडतें म्हणून त्यांची री श्री. पगडी ओढतात. हें अप्रकाशित पत्र संपूर्णतया पुढें आल्याशिवाय त्याच्या आधारावर जुनी इमारत पार मोडून टाकून नवी उभी करणें उचित नाहीं. शिवाय माझ्या तपासांत आढळून आलें आहे कीं, श्री. बेंद्रयांनीं हें पत्र पेशवे दप्तरापैकीं पुणें जमावांतील ज्या क्र. ४७ च्या रुमालांत आहे म्हणून सांगितलें तो रुमाल त्या पत्राचा नाहीं. त्यांतूनहि अप्रकाशित पत्र पूर्णतया सत्य आहे असें धरलें तर पुरावा वादग्रस्त होऊन फार तर दोन मतें होण्याचा संभव; मग प्रत्येक जण आपल्या सोयीनें त्या दोन पत्रांपैकीं एक खरें व एक खोटें असें समजून आपल्या मताचा आग्रह धरील.

६. हीच गत या लेखांत उद्धृत केलेल्या पुढील दोन पत्रांची आहे. हीं दोन पत्रें श्री. पगडींनीं श्री. बेंद्रयांच्या उपर्युक्त पुस्तकांतून उतरलीं आहेत. श्री. बेंद्रयांनीं तीं शिवचरित्रसाहित्य खंड ४ मधून घेतलीं आहेत. पण आधार देतांना श्री. बेंद्रयांचे या लेखांचे क्रमांक चुकले आहेत. त्यांचे क्रमांक ७६२,७६३ नसून ७५२,७५३ आहेत. या दोन्ही पत्रांतील कालनिर्देशांत वर्षाचा उल्लेख नाहीं. तो श. १५५० (इ. १६२८) असावा असें त्या पत्रांचे संपादक कै. शं. ना. जोशी यांनीं धरलें आहे. पण त्याचा आधार श्री. जोशींनीं दिला नाहीं. वादालाच उभे राहिलें म्हणजे श्री. जोशींनीं दिलेल्या तारखा पक्क्या कशावरून हा प्रश्न मी विचारूं शकेन व विचारतोंही. यावर असलेल्या शिक्क्यांचा विचार केला तर तीं पत्रें त्यांच्या मागील क्र. ७४७, ७४८, ७५० च्या अनुरोधानें श. १५४० ते १५४४ (इ. १६१८ ते १६२२) च्या सुमारास कोठें तरी बसविलीं पाहिजेत असें मला वाटतें. अर्थात् या पत्रांचा श्री. पगडींना उपयोग होण्यासारखा नाहीं.

७. राहता राहिल्या दर्याखानाच्या हालचाली. दर्याखान इ. १६२८ मे २५ ते ऑगस्ट ६ पर्यंत शाहजहानच्या (आग्रा किंवा दिल्ली येथील) दरबारांत होता असें श्री. पगडी म्हणतात. त्याला आपल्या लोकांसह दक्षिणेंतून शाहजहानच्या दरबारांत जाण्यास व तेथून दक्षिणेंत येण्यास प्रत्येकी किती दिवस लागले असतील? जातांना तो खानदेशातून गेला व परतला तोंहि खानदेशांतच; तसेंच दर्याखान एकही दिवस न गमावतां फार झपाट्यानें दरबारांत गेला व तितक्याच झपाट्यानें तेथून परतला असें धरलें तरीही प्रत्येकी पंचवीस दिवसांत त्याच्या हातून असें होऊन तो मे महिन्यांत खानदेशांत असणें किंवा आगस्ट महिन्यांत खानदेशांत पोचणें अशक्य आहे. शिवाजी फार झपाट्यानें आग्र्याहून दक्षिणेंत आला असें मी समजतों; तरीही त्याला सुमारें पंचवीस दिवस लागले. दर्याखानाच्या मागें अशी घाई कोणतीच नव्हती. तेव्हां त्यानें इतकी त्वरा केली असेल असें वाटत नाही. तथापि श्री. पगडी शहाजीची खानदेशावरील स्वारी इ. १६२८ च्या मे-

मधील धरतात व तत्पूर्वीचे दोन महिने शहाजीनें पूर्व तयारींत घालविले असें समजतात. तसें असेल तर इ. १६२८ मार्च १२ ला शहाजीला नवजात मुलाचें मुखावलोकन करणें सहज शक्य होतें; पण शहाजी व दर्याखान यांची या वर्षाच्या मे किंवा ऑगस्ट महिन्यांत गाठ पडून व त्यांची लढाई होऊन शहाजीचा पराभव होणें व त्यास खानदेशांतून हाकलून लावणें अशक्यच आहे.

८. दर्याखानानें शहाजीला इ. १६२८ च्या मे महिन्यांत खानदेशांतून हाकलून लावलें असल्यास तो गेला कुठें? तो आपल्या वतनाकडेच आला असला पाहिजे आणि त्यानें या वेळींही बाल-शिवाजीचें मुखावलोकन केलें असणें शक्य आहे. पण दोनतीन महिन्यांच्या बालकाचा अन्नप्राशन संस्कार होऊं शकत नाहीं. म्हणून श्री. पगडी निसर्गतः अशक्य अशी दर्याखान—शहाजी लढाई इ. १६२८ च्या मे महिन्यांत घालतात. तसेंच आत्मविरोधाचा दोष पत्करून दर्याखानानें शहाजीस पराभूत करून हाकलून परतवलें असतां शहाजीस खानदेशांतच रहावयास लावीत आहेत. मला या वेळीं असें काहीं झाल्याचें मुळींच आढळत नाहीं. शिवाजी या वेळीं मुळीं जन्मलाच नव्हता. तसेंच शहाजी-दर्याखान लढाई या वेळीं झालीही नाहीं. ही लढाई झाली असल्यास इ. १६२८ च्या ऑगस्टनंतर केव्हां तरी झाली असेल.

९. श्री. पगडींनीं 'वाकाई सुनोत' (शुद्ध उच्चार वाकअ-वकायअ-इ-सनवात) मधील शाहजहानच्या पहिल्या वर्षीं (इ. १६२८ फेब्रुवारी ४ ते १६२९ जानेवारी १७) दर्याखानानें शहाजीचा पराभव केला असें सांगितलें आहे तें पक्कें गृहीत धरलें. तसेंच शिवभारतांत शहाजीनें दर्याखानाचा पराभव करून परतल्यावर बालशिवाजीचें मुखावलोकन केलें असें जें सांगितलें आहे तें दर्याखानानें केलेल्या शहाजीच्या पराभवास उद्देशूनच लिहिलें आहे; अर्थात् शिवभारतकारानें शहाजीविषयीं उघड उघड खोटी माहिती दिली असेंहि पक्कें मानलें. हा प्रसंग घडल्यावर शहाजीनें शिवाजीचें मुखावलोकन केलें; तेव्हां ही हकीगत शाहजहानच्या पहिल्या राज्यवर्षाच्या प्रारंभींच्या दोनतीन महिन्यांत घडली असें

त्यांनीं ठाम ठरविलें. आणि बहुतेक बखरींतील शिवजन्माचा श. १५४९ मधील वैशाख शुद्ध २, ३, ५ किंवा १५ हा दिवस आयता या वर्षांतील वैशाखांत पडत असतांहि आपणांस सोयीचा नाहीं म्हणून तो घेण्याचें टाळलें. अर्थात् हा सर्व त्यांच्या कल्पनेचा खेळ आहे. त्यांच्या या नवीन कल्पनेशीं जुळेल असा एकहि जन्मदिवस मराठी साधनांत उपलब्ध नाहीं. तथापि जेधे शकावली शके १५५१ चैत्रामध्यें इब्राहीम आदिल मेला, मुहम्मद आदिल गादीवर आला, खवासखान प्रधान झाला आणि मुरार जगदेव कारभारी बनला अशा चार घटना घडल्याचें सांगते. याचा अर्थ कसा लावतां येतो हें न पाहतांच त्यांपैकीं इब्राहीम आदिलचा मृत्यु ही पहिली घटना शक १५५१ ऐवजीं १५४९ सालीं झाली असल्यानें, शिवाजीचा जन्म शकावलींत स्पष्टपणें शके १५५१ शुक्ल संवत्सर या वर्षीं झाला असल्याचें नमूद असलें तरीही तें चुकीचें किंवा अंदाजीं आहे असें समजून शक १५४९ प्रभव संवत्सर या सालीं तो झाला असें चुकीचें गृहीत धरलें. अशी मनमानेशी मोडतोड करून पुन्हा जेधे शकावलींतील फाल्गून वद्य ३ हा तपशील मात्र अचूक आहे असें धरून शिवजन्माचा काल शक १५४९ फाल्गून वद्य ३ म्हणजे इ. १६२८ मार्च १२ हा निश्चितच ठरवून टाकला. पण जेधे शकावलींत श. १५५१ व त्याशीं जुळता शुक्ल संवत्सर सांगून फाल्गून वद्य ३ ही तिथि दिली आहे आणि तीपुढें या तिथीशीं सर्व परींनीं सुसंगत शुक्रवार, हस्त नक्षत्र आणि गंडयोग असा तपशील दिला आहे तो श. १५४९ फाल्गून वद्य ३ या दिवसाशीं जुळत नसल्यामुळें तो टाकून दिला.

१०. यायोगें आपण काय करीत आहों हें त्यांच्या ध्यानांत तरी आलें कीं नाहीं कोण जाणें. बहुधा आलें नसावें. शकावलीकारानें श. १५५१ शुक्ल संवत्सर हें साल देण्यांत चूक केली; फाल्गून वद्य ३ एवढें अचूक दिलें आणि पुढील तपशील पुन्हा चुकला असा त्यांच्या या गृहीत धरण्याचा अर्थ होतो. शकावलीकारास एवढा आटापिटा करण्याचें कारण काय याचा त्यांच्या या चुकीच्या गृहीत कृत्यामुळें उलगडा होणें अशक्य आहे. एक तर शकावलीकारानें

मूर्खपणानें कांहीं तरी लिहिलें असें मानावें लागेल किंवा हेच कांहीं तरी घोडचूक करीत आहेत असें समजावें लागेल. शकावलीकार मूर्ख होता असें एकदां गृहीत धरलें म्हणजे मग त्यानें दिलेला फाल्गून महिना व वद्य ३ ही तिथि तरी अचूक आहे असें समजण्यास आधार काय? आपल्या सिद्धान्तास सोयीची पडते म्हणून कालाच्या अचूक तपशिलांतील एकच तुकडा घेऊन उरलेला टाकून देणें उचित नाहीं. वास्तवीक शकावलीकारानें शिवजन्म ही स्वयंपूर्ण एकमेव घटना शक १५५१ शुक्ल संवत्सर फाल्गून वद्य ३ शुक्रवार, हस्त नक्षत्र, गंड योग असतांना झाली असें सांगितलें असून हा सर्व योग केवळ शक१५५१ मध्येंच तंतोतंत जुळून येतो. शक १५४८, १५४९ व १५५० यांपैकीं कोणत्याही वर्षीं जुळून येत नाहीं हें लक्षांत ठेविलें म्हणजे या बाबतींतील श्री. पगडींचें लिखाण किती उथळ व तर्कशून्य आहे हें दिसून येईल. एकमेव घटनेचा अचूक कालनिर्देश करणाऱ्या तपशिलाची अशी मोडतोड करणें केव्हांहि तर्कशुद्ध ठरणार नाहीं! एक तर तो संपूर्ण काल ग्राह्य धरला पाहिजे किंवा त्याचा पूर्णतया त्याग केला पाहिजे.

११. शिवभारतांतील शिवजन्मकालविषयक निर्देशाची त्यांनीं अशीच मनमानेशी मोडतोड केली आहे. त्यानें कालनिर्देशांत जेवढा तपशील दिला आहे तो इतर पुराव्यांशीं तंतोतंत जुळत असतां त्यानें अधिक तपशील कां दिला नाहीं असें विचारून दिलेल्या तपशिलांतील कांहीं भाग चूक व कांहीं अचूक अशी कल्पना ते करतात. शिवभारतकार पक्का शिवकालीन व शिवाजीच्या जवळिकेंत असल्यामुळें त्याच्या हातून चूक व्हावयाची नाहीं हें त्यांस उमगत नाहीं,

१२. बादशाहनाम्याच्या आधारानें श्री. पगडी म्हणतात कीं, इ. १६३० मध्यें शहाजी-दर्याखानाची लढाई होण्याची शक्यताच नाहीं. आणि त्यामुळें बादशाहनाम्यांत तिचा उल्लेखही नाहीं; पण येथेंच बादशाहनामा व आमची विचारसरणी यांत भेद होत आहे. आपला सासरा लखूजी जाधवराव याचा निजामशाही दरबारांत खून झाल्यावर शहाजीनें निजामशाही सोडली व मोगलांस जाऊन

मिळाला याविषयीं दुमत नाहीं. पण हा खून केव्हां झाला याविषयीं मतभेद आहेत. जेधे शकावलीप्रमाणें हा खून श. १५५१ श्रावण शु. १५ (इ. १६२९ जुलै २४) रोजीं झाला. बादशाहनाम्यांत हा खून केव्हां झाला त्याची तारीख दिलेली नाहीं; पण खुनाची हकीगत देऊन तो झाल्यावर त्या प्रसंगांतून वाचलेले त्याचे भाऊबंद व नातेवाईक दौलताबादेहून सिंदखेड या आपल्या गावीं पळाले. पुढें त्यांनीं बादशाहास अर्ज केल्यावरून शाहजहाननें त्यांस मनसब व रोख रक्कम दिली. ही हकीकत बादशाहनाम्यांत शाहजहानच्या तिसऱ्या राज्यवर्षांतील जिल्हेज महिन्याच्या सव्वीस तारखेच्या नोंदीनंतर स्वतंत्र प्रकरण म्हणून आली आहे. तेव्हां जाधवरावाचा खून या तारखेनंतरच झाला असें समजण्याचें कारण नाहीं. खून पूर्वीच केव्हां तरी झाला; पण मनसब इत्यादि या तारखेनंतर मिळालें असण्याचा संभव. पूर्ण खात्री नाहीं.

१३. श्री. पगडी यांच्या पहिल्या लेखांत शहाजी मोगलांना इ. १६२९ च्या नोव्हेंबरमध्यें मिळाला असें ते म्हणतात. म्हणजे जाधवरावाचा खून यापूर्वीं झाला असें ते समजतात. नवभारतांतील लेखांतही त्यांनीं तसें मान्यच केलें आहे. पण आतां मात्र ते आपली पगडी फिरवून शहाजी मोगलांना इ. १६३० नोव्हेंबरच्या दुसऱ्या आठवड्यांत मिळाला असें प्रतिपादतात. त्यासाठीं त्यांना जाधवरावाचा खूनहि आतां एक वर्षानें पुढें ढकलावा लागला आहे. नाहींपेक्षा शहाजी सुमारें सव्वा वर्ष माशा मारीत घरीं बसला होता असेंच धरावें लागणार. पण मी जाधवरावाच्या खुनाचा जेधे शकावलींत दिलेला इ. १६२९ जुलै २४ हा काल प्रमाण धरीत असल्यानें श्री. पगडींच्या म्हणण्याप्रमाणें या कालापुढील ३–४ महिन्यांत तो निजामशाहाची बाजू सोडून मुघलांस मिळाला असें मी समजतों व इ. १६३० च्या अखेरीपर्यंत मुघल सुभेदाराच्या हाताखालीं त्यानें सांगितलेलीं कामें करीत राहिला असें म्हणतों. या अवधींत शहाजीची दर्याखानाशीं झटापट होऊन तींत उत्तरोक्ताचा पराभव झाला असला पाहिजे. परमानंद या लढाईचा निर्देश करीत आहे. बादशाहनामा मराठ्यांचे सर्व पराक्रम सांगतोच असें नाहीं

असें मानून मी या प्रश्नाचा निकाल करतों. येथें मला हेंही सांगावयाचें आहे कीं, श्री. पगडींनीं आपल्या केसरींतील लेखानें त्यांचा लोकसत्तेंतील पहिला व नवभारतांतील एकमेव अशा दोन लेखांवर विलक्षण बोळा फासला आहे.

१४. या ठिकाणीं मी पुन्हा एकदां सांगतों कीं, आमचे शिवजन्मतिथीचे जेधे शकावली, शिवभारत व तीन जन्मपत्रिका असे पांच स्वतंत्र पुरावे आहेत. ते सर्व पक्के समकालीन किंवा समकालीनांस अत्यंत जवळचे व अत्यंत विश्वास्य आहेत. बादशाहनामा किंवा इतर मुसलमानी ग्रंथ यांचे पुरावे पारिस्थितिक आहेत. त्यांच्या निकषावर मी आमचे पुरावे घासण्यास व त्यांची मोडतोड करून ते स्वीकारण्यास तयार नाहीं. मी आमचे पुरावे व फार्सी ग्रंथ यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करीन. तें जमलें तर ठीकच; नाहीं तर फार्सी ग्रंथ अचूक माहिती सांगत नाहींत असेंच गृहीत धरीन.

१५. शेवटीं मला सांगावेसें वाटतें कीं, श्री. पगडींचें आजवरचें सर्व ऐतिहासिक लिखाण मी पाहिलें आहे; तें सर्व अशास्त्रीय, भोंगळ, धरसोडीचें, परस्परविरोधी, फाफटपसाऱ्याचें, फार्सी साधनांस अवास्तव महत्त्व देणारें, राईचा पर्वत करणारें, अपुऱ्या अभ्यासावर आधारलेलें, पुराव्यांचा सर्वंकष विचार न करणारें, संशोधनयुक्त अभ्यासाच्या प्रगतीस निरुपयोगी, विपरीत ज्ञान फैलावणारें इत्यादि अनेक दोषांनीं परिप्लुत असें आहे. त्यांना आपल्या प्रत्येक लिखाणास अति त्वरित प्रसिद्धि मिळावी याबद्दल उतावीळी झालेली दिसते. या उतावीळीच्या पोटीं हे दोष घडत आहेत अशी माझी कल्पना आहे. त्यांना फार्सी येत नाहीं असें कोण म्हणेल? पण पुराव्यांचा तौलनिक विचार करून ते वापरणें त्यांना जमत नाहीं असें माझें स्वच्छ मत झालें आहे. अशा गृहस्थांबरोबर वादविवाद करून कांहीं निष्पन्न होईल असेंहि वाटत नाहीं. म्हणून हा वाद माझ्यापुरता मी थांबविला आहे.

---

# ४. मुसलमानी-पोर्तुगीज अमलांतील मराठी समाज

१. सुमारें ६ महिन्यांपूर्वीं प्रसिद्ध इतिहासव्यासंगी व विद्वान गृहस्थ श्री. द. वि. आपटे यांनीं संपादन केलेलें 'मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास' हें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. हें पुस्तक वाचीत असतां विशेषतः त्यांत प्रकाशित झालेल्या फर्मानांच्या अनुषंगानें अनेक विचार माझ्या मनांत आले. त्यांपकीं कांहीं येथें मांडणें आवश्यक आहे.

२. हीं फर्मानें एका हिंदू घराण्याला मिळालेलीं आहेत हेंही ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. दक्षिणेंतील बहमनी किंवा तीपासून उद्भवलेल्या पांच शाह्या यांचे वृत्तांत सांगणारे व उत्तरकालीन असे फिरिश्ता, तबातबा, शीराझी, वगैरे इतिहासकार व त्यांचे ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांतून वरील शाह्यांचा कमीअधिक विस्तृत असा इतिहास कथन केलेला आहे. या कथनांत मुसलमान शाह्यां-शीं झगडा करणारे हिंदू राजे, त्यांचीं राज्यें व क्वचित् त्यांचे सरदार यांचे नामनिर्देश आलेले आहेत. मुसलमानी शाह्यांच्या बाजूनें काम करणारे मुसलमान मुत्सद्दी व सरदार यांचीं नांवें व कामें यांचेंही तपशीलवार वर्णन आलें आहे. पण या सर्व हकीकतींत हिंदू मुत्सद्यांचीं व सरदारांचीं नांवें प्रायः येऊं नयेत हें आश्चर्य होय. इ. १३४७ ते १५६४ म्हणजे मुसलमानी अमदा-नीस पक्की सुरुवात झाल्यापासून ते राक्षसतागडीच्या (तालिकोट) लढाईपर्यंतच्या इतिहासांत पाचपंचवीस तरी हिंदू व्यक्तींचीं नांवें आलीं आहेत कीं नाहींत याविषयीं संशय येतो. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्या काळांत मुसलमानी राज्यांत हिंदू नोकर नव्हते. घोरपड्यांना मिळालेलीं फर्मानें व त्यांतून त्यांजविषयीं केलेले उल्लेख हे नमुना म्हणून धरले तर घोरपड्यांसारखीं आण-खीही कित्येक ब्राह्मण वा मराठे घराणीं त्या काळीं कामगिरी करीत असलीं पाहिजेत असा कयास होतो.

३. तर मग इतर घराण्यांचे उल्लेख इतिहासांतून कां आले नाहींत? यास उत्तर असें – एक तर या इतिहासलेखकांना

इतिहासाची यथातथ्य माहिती होती असें दिसत नाहीं. गादीवर आलेल्या राजांची एकमेकांशीं नातीं कोणतीं हेंही ज्यांना माहीत नव्हतें, त्यांना निरनिराळ्या प्रसंगांचे तपशील कसचे ठाऊक असणार? शिवाय ते इतिहासकार पूर्वग्रहदूषित नव्हते असेंही समजण्याचें कारण नाहीं. हिंदूविषयींच्या द्वेषानेंही त्यांनीं कित्येक मातबर गृहस्थांचा उल्लेख करण्याचें टाळलें असेल. यामुळें घोरपड्यांइतकीं मान्यतेस चढलेलीं दुसरी हिंदू घराणीं त्या काळीं किती होतीं हें आज निश्चयानें सांगतां येणें कठीण झालें आहे.

४. त्या काळीं दक्षिणेंत व उत्तरेंत दोन्हीकडे जरी मुसलमानी अधिराज्यें होतीं तरी दोहोंमध्यें महत्त्वाचे फरक होते. उत्तरेंत मुसलमानी सत्तांशीं विरोध करणाऱ्या राजपूत राज्यांखेरीज इतर हिंदू राज्यें फारशीं नव्हतीं. उलट दक्षिणेमध्यें मुसलमानी सत्तांशीं विरोध करणारें विजयनगरचें बलिष्ठ राज्य व त्याचे तमीळ वगैरे प्रांतांतील मांडलीक, तेलंगण, ओडीसा, येथील सारी राज्यें हिंदू होतीं व तीं सर्व आपआपल्या परीनें मुसलमानी सुलतानांशीं झगडत. त्यामुळें येथील मुसलमानी सत्तांस मोठमोठीं सैन्यें जय्यत तयार ठेवावीं लागत. उत्तरेंत खुश्कीच्या मार्गांनीं नोकरीसाठीं मुहम्मदी प्रवाह येत असे. पण तो तिकडील शाह्यांमध्यें आटून जाई. दक्षिणेपर्यंत प्रायः पोहचूं शकत नसे. तुर्की, इराणी, हबशी, वगैरे लोक समुद्रलंघन करून दक्षिणेंत येत. पण मागणीच्या मानानें अपुरे पडत. यामुळें येथील मुसलमानी सत्तांना हिंदूंची गरज उत्तरेंतील सत्तांच्या मानानें जास्त भासे. विशेषतः बहमनी राज्याचीं पांच शकलें झाल्यावर आपसांतील स्पर्धेमुळें येथील हिंदूंचीं गरज पांचही शाह्यांना जास्त जास्तच भासूं लागली. तसेंच येथें असलेल्या उमरावांत दक्षिणी, हिंदुस्थानी व परदेशी असे राजकीय आणि शिया व सुन्नी असे धार्मिक भेद पडून ते एवढे विकोपास जात कीं, एकमेकांच्या कत्तली, घरादारांच्या जाळपोळी, मालमत्तेची लुटालूट व स्त्रियांची बेअब्रू या गोष्टी झाल्याशिवाय रहात नसत. या भांडणांत दोन्ही पक्षास हिंदू सामान्यतः असत. पण दक्षिणी पक्षांतच विशेषतः अधिक असत.

५. पण उत्तरेंतील व दक्षिणेंतील राजकीय परिस्थितींत आणखीही एक महत्त्वाचा भेद होता. दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांत जुलूम झाल्यास त्यास कंटाळून किंवा नशीब काढण्यास म्हणून कोणाही हिंदूला नजीकच्या हिंदू राज्यांत जाणें जेवढें सोपें होतें, तेवढें उत्तरेंतील लोकांस खास नव्हतें. उत्तरेंतून येऊन दक्षिणेंतील हिंदू राजांच्या पदरीं राहिलेले असे लोक क्वचितच असतील. उलट राक्षसतागडीच्या लढाईंतील दोन्ही बाजूंच्या सैन्यांचे तपशील पाहिले तर ज्याप्रमाणें मुसलमानांच्या बाजूस मराठे वीर होते त्याप्रमाणें विजयनगरकरांचे बाजूनेंही मराठे शिपाई लढले असें म्हणतां येतें. हे लोक वरील दोन कारणांपैकीं कोणत्या तरी कारणानें गेले असले पाहिजेत हें उघड आहे.

६. मात्र वरील विवेचनावरून कोणी अशी कल्पना केली कीं, मुसलमानी अमदानींत हिंदू जनतेवर जुलूम होत नव्हता तर ती मात्र सत्यास धरून आहे असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. येथील मुसलमानी सुलतानांकडून राज्यांत स्थिरस्थावर असतां, जाणून-बुजून किंवा अजाणता, लहरीनें अथवा अन्य कारणांनीं हिंदूंवर जुलूम झाला आहे. देवळें पाडणें, मूर्ती फोडणें, जबरदस्तीनें किंवा प्रलोभनानें बाटविणें इत्यादी धर्मभावना दुखविणारीं कृत्यें घडलीं आहेत. व्यक्तिरचित अशा मुसलमानी तवारिखांमधून आलेले हिंदूं-वरील जुलूमांचे उल्लेख कदाचित् तल्लेखकांनीं पूर्वग्रहदूषित होऊन अतिशयोक्तीच्या रूपानें केले असण्याचा संभव आहे असें गृहीत धरलें तरी अस्सल कागदांतून किंवा शिलालेखांतून जे उल्लेख आलेले आहेत, त्यांचा खरेपणा नाकारतां येणार नाहीं. उदाहरणाच पाहिजे असेल तर पुणें जिल्ह्यांतील घोडें येथील जामे मशिदींतील लेखाचें देतां येईल. या लेखांत परमेश्वराचा प्रसाद मिळावा म्हणून ३३ देवळें पाडून मशीद बांधल्याचें नमूद आहे. अनेक ठिकाणचे दर्गे व मशिदी म्हणजे मुसलमानी पेहराव चढविलेलीं हिंदू देवळेंच होत असेंही सहज दाखवितां येईल. कांहीं ठिकाणीं हिंदू देवळें अर्धवट पडलेलीं दिसून येतात. हल्लीं उपयोगांत असलेल्या कित्येक हिंदू देवळांतील मूर्तींचीं तोंडें, डोकीं, नाकें, कान हींच तेवढीं फोडलेलीं

दिसतात. कागदोंपत्रींही तशा तऱ्हेचे अनेक उल्लेख आलेले आहेत. तेव्हां हीं कृत्यें मुसलमानांनीं सहेतुक केलीं हें उघड आहे. सत्ताधारी मुसलमानांनीं धार्मिक जूलूम केला यांत मुळींच शंका नाहीं. मात्र तो वरील कारणांमुळें उत्तरेच्या मानानें सौम्य स्वरूपाचा असावा. पोर्तुगीज येथें सत्ताधारी बनल्यावर त्यांनींही असा कांहीं जुलूम केला कीं, कोण अधिक जुलमी याविषयीं संभ्रम निर्माण व्हावा.

७. तथापि त्या काळीं दक्षिणेंतील मुसलमान शाह्यांच्या नोकरींत असलेल्या हिंदू लोकांची विशेषतः मातबर सरदारांचीं मनस्थिती कशी होती हें पाहण्यासारखें आहे. त्यांना आपल्या धार्मिक किंवा सामाजिक चालीरीती अथवा उत्सव यांचें जाहीर व सामुदायिक प्रदर्शन व्हावें असें वाटत असलें तरी तें करतां न आल्यास त्याची खंत वाटत होती किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं. पण तत्कालीन हिंदू लोक आपले नित्यनैमित्तिक, धार्मिक अथवा सामाजिक कार्यक्रम व्यक्तिशः मुकाट्यानें अमलांत आणण्यास मिळाले असतां त्यांतच समाधान मानीत असावे. मुसलमानी अधिराज्यांत गरजेप्रमाणें अशा गोष्टींना कमीअधिक सवलती मिळत अथवा त्यांकडे दुर्लक्ष होई. विशेषतः नोकरींत असलेल्या लोकांच्या बाबतींत धार्मिक सहिष्णुता दाखविली जाई. विशेषतः वेंकटाध्वरीनें आपल्या विश्वगुणादर्शचंपूंत अथवा रामदासांनीं महाराष्ट्रांतील परिस्थितीचें जें वर्णन केलें आहे तें वस्तुस्थितिनिदर्शक मानलें–तसें मानण्यास कांहीं अडचण आहे असें वाटत नाहीं – तर त्याकाळीं राजकारणी हिंदू लोक, नित्यनैमित्तिक धार्मिक कृत्यें निष्ठेनें आचरीत असत कीं नाहीं याची मोठीच शंका आहे. त्याबद्दलचा ध्यास तरी त्यांच्या मनास लागत नसावा असें वाटतें. तेव्हां धर्मरक्षणाच्या हेतूनें हिंदू लोक मुसलमानी शाह्यांतून नोकरी करीत होते असें मुळींच म्हणवत नाहीं.

८. मग येथील हिंदू कोणते हेतू मनांत ठेवून मुसलमानी नोकरी करीत ? माझ्या मतें त्यांचे हेतू मुख्यतः तीन असावेत. एक हेतू असा कीं, मुसलमान सरदारांप्रमाणें आपणही मोठे पराक्रम करून जागिरी व इनामें मिळवावीं. दुसरा हेतू असा कीं,

प्रत्यक्ष सुलतान बनतां आलें नाहीं तरी त्याचे खालोखाल राज्यातील पहिल्या दुर्जाचे जे मुसलमानी अमीर—उमराव त्यांच्या मांडीस मांडी लावून बसण्याचा मानमरातब मिळवावा व त्यांच्यासारखेच ऐषआरामांत पण तालेवारीनें रहावें. आपल्या कुलांत मानमरातबासंबंधीं ज्या कल्पना चालत आल्या असतील त्या पाळाव्या किंवा नवीन उत्पन्न करून त्यांस चिकटून रहावें हा तिसरा हेतू असे. हिंदू सरदारांना हे तीनही हेतू साध्य करून घेणें बहमनी अमदानींत बरेंच कठीण गेलें असेल. पण बहमनी सल्तनत मोडून तिचीं पांच राज्यें झालीं व राज्यवृद्धीकरितां तीं आपसांत झगडूं लागलीं. भांडणें रंगांत येऊंलागल्यावर येथील हिंदू सरदारांना आपली कर्तबगारी दाखविण्यास अधिक सवड मिळूं लागली. तिचा फायदा घेऊन पुष्कळ मराठे सरदारांनीं व ब्राह्मण मुत्सद्यांनीं मानाचीं स्थानें मिळविलीं. माधवराव नांवाचा ब्राह्मण गृहस्थ अहमदनगरच्या निजामशाही तोफखान्याचा मुख्य बनला; तर शेषे घराण्यांतील कांहीं इसम विजापूरच्या शाही कुतुबखान्याचे अधिकारी बनले. चतुर साबाजी, शहाजी, घोरपडे, मुरार जगदेव वगैरेंस निरनिराळ्या सलतनतींत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें होतें हें सर्वांस ठाऊक आहेच.

९. या मोठमोठ्या इज्जतदार लोकांनीं अनुकूल प्रसंगीं सुलतानाकडे कोणत्या गोष्टींची याचना केली हें पाहण्यासारखें आहे. घोरपडे कुलांतील लोकांनीं अनेक प्रसंगीं महत्त्वाची कामगिरी केल्यामुळें त्यांस मोठी जागीर मिळाली हें [illegible]जीकच आहे. पण त्यांनीं आदिलशाही सुलतानांकडे मागणी केली ती, [illegible]पणांस जमिनीपर्यंत लवून मुजरा करण्यांत अपमानास्पद वाटतें तरी तेवढें आपणांस माफ करावें अशी. याप्रमाणें माफी मिळाली तेव्हां त्यांस समाधान वाटलें असावें. म्हसवड येथील मान्यांच्या संबंधीं अशीच आख्यायिका आहे. त्यांच्या कुलांत कोणास लवून मुजरा करावयाचा नाहीं असा प्रघात. विजापूरच्या सुलतानानें परीक्षा पाहण्यासाठीं माने दरबारांत येण्याच्या सुमारास वाटेवर अशा तऱ्हेनें तलवार बांधली कीं, ते वाकून न आले तर मान कापलीच

जावी. मान्यांच्या पूर्वजानें मान कापून घेण्याचें पत्करलें. पण बहाद्दर वाकला नाहीं ! तात्पर्य, ऐश्वर्याच्या इच्छेप्रमाणें कुलांतील चालू असलेल्या ब्रीदाच्या गोष्टी सांभाळणें हाही तत्कालीन मुसलमानी नोकरींतील हिंदूंचा हेतू असे. या तीन हेतूशिवाय आणखी एखादा महत्त्वाचा हेतू त्यांचे ठिकाणीं होता असें वाटत नाहीं.

१०. तात्पर्य, मुसलमानी अमदानींत येथें हिंदू लोकांवर अनुकूल कालीं हेतुपूर्वक व कदाचित् लहरीमुळें जुलूम होत असे. पण प्रतिस्पर्धी हिंदू राज्य जवळच असल्यामुळें व आपसांतील अनेक तऱ्हेच्या भांडणांमुळें दक्षिणेंतील मुसलमानांनीं केलेला जुलूम उत्तरेच्या मानानें सौम्य होता किंवा भासला. तत्कालीन हिंदूंचीं आपलीं नित्यनैमित्तिक कर्में व्यक्तिशः करावयास सापडलीं म्हणजे पुरे अशी भावना होती. कर्तबगारीच्या जोरावर मोठें स्थान प्राप्त करून घ्यावें व नंतर आपले कुलाचार पाळले गेले म्हणजे आपलें ध्येय आपण गांठलें असें त्यांस वाटे. यामुळें होणारा जुलूम त्यांच्या मतें सह्य होता.

---

## ५. शिवाजी व खोपडे घराणें

१. शिवकालांत शिवाजीला सहाय्य अथवा विरोध करणारीं म्हणून जीं घराणीं आज समजलीं जातात त्यांमध्यें देशमुख घराणीं प्रमुख होत. त्या वेळीं त्यांजकडे निरनिराळ्या प्रदेशांची सरदेशमुखी आणि कित्येक स्थळें व गावें इनाम म्हणून चालत. हीं घराणीं त्या त्या प्रांतीं बलिष्ठ होऊन त्यांमध्यें भाऊबंदकीचीं भांडणें वंशपरंपरेनें चालत. अशा भांडणांचा परिणाम त्या घराण्यामध्यें दोन फळ्या पडून त्यांपैकीं एकीनें एका राजसत्तेचा आश्रय करावा तर दुसरीनें तद्विरुद्ध राजकीय सत्तेचा आश्रय करावा असा होई. देशमुख म्हटले म्हणजे त्यांना मुल्की व लष्करी अशी दोन्ही प्रकारची चाकरी करावी लागे. त्या चाकऱ्यांविषयीं अनेक प्रकारचे हुकूम त्यांचेकडे येत. मोठमोठ्या शाह्यांचे दप्तरखाने जरी नामशेष झालेले आढळतात, तरी त्या शाह्यांकडून अशा देशमूख

वगैरे लोकांना जे हुकूम आले ते मात्र पुष्कळ मोठ्या प्रमाणांत आज अस्तित्वांत आहेत. असे कागद कोणत्याना कोणत्या कारणांनी उजेडांत येतात तेव्हां त्यांची तत्कालीन परिस्थिती समजण्यास फार मदत होते.

२. खोपडे घराणें अशाच प्रकारचें एक होय. सदर घराण्यांतील शिवसमकालीन पुरूष केदारजी व खंडोजी खोपडे हे होत. भाऊबंदकीच्या भांडणांची मजल त्यांच्या पूर्वजांच्या बाबतींत एवढी तीव्रतेला गेली होती कीं, तीपायों एकमेकांनीं एकमेकांच्या घरांतील माणसांचे खूनही केले होते ! केदारजीचें घराणें विजापूरकरांशीं निष्ठेनें वागत असल्यामुळें खंडोजीस त्यांचा आश्रय मिळणें शक्य नव्हतें. म्हणून तो कांहीं काळ शिवाजीच्या आश्रयानें राहिला. अशा दोन पुरुषांसंबंधीं पर्यायानें दोन घराण्यांविषयीं जी माहिती मला नुकत्याच मिळालेल्या कागदांत आढळली ती शिवाजीचा संबंध ध्यानांत घेऊन येथें देतों.

३. मिळालेल्या कागदांपैकीं राजकीय दृष्ट्या महत्त्वाचा पहिला कागद श. १५७० (इ. १६४८) च्या श्रावण वद्य अमावास्येचा असून त्यांत केदारजी खोपड्यास कोंढाण्याच्या बाजूची मसलत सिद्धीस नेण्यासाठीं नियुक्त केलेल्या फतहखान खुदावंदखान या विजापुरी सरदाराला मदत करण्याबद्दल फर्माविलें आहे. कोंढाण्याची मसलत म्हणजे कोंढाणा किल्ला व त्या भोवतालचा प्रदेश शिवाजीनें यापूर्वींच हस्तगत केला होता तो परत सर करणें ही होय. हा हुकूम व श. १५६६ (इ. १६४४) चे जेध्यांस आलेलें फर्मान यांचा विचार केला तर शिवाजी व त्याच्या पित्याचा मुतालीक दादाजी कोंडदेव यांची सर्व हालचाल सिंहगडाच्या बाजूस चालली होती हें उघड होतें. श. १५७२ (इ. १६५०) च्या एका फर्मानाच्या नकलेंत रोहिड्याचा हवालदार शंकराजी बनाजी यास फर्माविलें आहे कीं, त्यानें केदारजीचा भाऊबंद खंडोजी ह्यास तो जेथें असेल तेथें शिक्षा करावी. याचें कारण काय तर केदारजी विजापुरी दरबाराशीं निष्ठेनें वागत असतां खंडोजी मात्र त्यास हरप्रकारें त्रास देत होता; एवढेंच नव्हे तर त्यानें केदारजीच्या आईस जिवें मारून

चिरंजीव शहाजी राजे यांच्या हिरडस मावळाचा आश्रय केला होता. या बाबतींत शहाजीनें शिवाजीस ताकिदीचें (खंडोजीस आश्रय न द्यावा) असें, पत्र घातलें होतें असेंही या फर्मानाच्या नकलेंत नमूद आहे. श. १५७७ (इ. १६५५) च्या एका अस्सल कागदांत खंडोजी खोपडे हरामखोरी करतो व केदारजी विलायतीच्या मामूरीची कांहीं खटपट करीत नाहीं याबद्दल त्यास दोष देऊन त्याची देशमुखी काढून घेण्याची धमकी दिली आहे. याच सुमारास केदारजी खोपड्यानें विजापूरच्या दरबारास एक अर्जी पाठवून तींत खंडोजी खोपडे व त्यावेळचा बहुधा रोहिड्याचा हवालदार सीदी हसन यांनीं भोसल्याचा मुलगा शिवाजी याची खास मदत घेऊन आपली कशी धुळदाण उडविली आहे, शिवाजीपाशीं चार हजार शिपाई तर आपल्यापाशीं दहावीस प्यादे असल्यानें आपण त्याचा प्रतिकार करण्यास कसे असमर्थ आहों आणि खंडोजीनें जरी हुजुराकडे आपली कैफियत सादर करण्यासाठीं माणसें पाठविलीं असलीं तरी त्याची हकीकत कशी खोटी आहे याविषयीं लिहिलें आहे.

४. केदारजी व खंडोजी खोपडे यांच्या भाऊबंदकीच्या या भांडणांत शिवाजीनें खंडोजी खोपड्याचा पक्ष घेतला होता ही गोष्ट जेधे करीण्यावरून (शिवचरित्रप्रदीप पृ. ४५) स्पष्ट होते. खंडोजी खोपडे शिवाजीचा पक्ष सोडून अफजलखानास कां मिळाला याचा नीटसा उलगडा होत नाहीं. पण शिवाजीकडे राहून वतनी भांडणांत आपला कायमचा फायदा होण्याचा रंग न दिसल्यामुळें त्यानें शिवाजीची बाजू सोडली असावी असें वाटतें. कांहीं कां असे ना अफजलखानप्रसंगीं तो त्यास मिळाला होता हें जेधे शकावलीवरून स्पष्ट होत असून त्याच्या पक्षत्यागानें चिडून जाऊन शिवाजीनें अफजलप्रसंगानंतर त्याचा एक हात व एक पाय तोडविला. पण त्याची वतनदारी मात्र त्याजकडे चालू ठेविली असें जेधे करीण्यावरून उघड होतें. अफजलप्रसंगानंतर सुमारें तीन महिन्यांनीं पाठविलेल्या एका फर्मानाच्या नकलेंत आपणांस इच्छित इनामें मिळाल्यास आपण सलाबतखानाच्या (सीदी जौहरच्या) बरो-

बर पादशाही मसलत करण्यास तयार आहों अशी विनंती केदारजीनें केल्यावरून पादशाहानें त्यास इनामें दिलीं अशी हकीकत आहे. श. १५८२ (इ. १६६०) च्या चैत्रामधील कागदांत केदारजी खोपडे व इतर देशमूख यांस गनिमाचे म्हणजे शिवाचे लोक सांपडतील तेथून त्यांस पकडून हुजूर पाठवावे व त्यांची चीजवस्तु सापडेल ती त्यांनीं बेशक घ्यावी असें फर्माविलें आहे.

५ पण सर्वांत महत्वाचा कागद म्हणजे शिवाजीनें केदारजी खोपड्यास दिलेला कौलनामा. हा श. १५८३ (इ. १६५९) च्या भाद्रपदांतील असून त्यांतील महत्वाचा मजकूर असाः—' जे वरुती अफजल साहेबाचे तरफस आला होता ते वरुती तुम्ही येक वजा समजोन गनिमास मिळाले. तयावरी गनिमाचा अमल बरतरफ जाळा. याकरिता तुम्हा शक अंदेशा धरून ताा मजकुरास न येऊन आपल्या हकाबदल गांवगनास आजार देत आहा. तरी त्यामधे तुम्ही आपला काये फायेदा समजला आहा. साहेबासी गैर रुजू असावे आणि आपल्या हकास खलल करून घ्यावे हे अकल तुम्हास कोणे दिधली आहे? साहेबांची मेहरबानी तुम्हावरी बहूत आहे. काही शक न धरणे इत्यादी. या पत्रावरून शिवाजी देशमुखांस आपले पक्षांत ओढण्याचा कसा प्रयत्न करी हें चांगलें स्पष्ट होतें.

६. यानंतरचे दोन-तीन मुघली कागद आहेत. त्यांचा इत्यर्थ एवढाच कीं, खोपडे देशमुखांनीं स्वतःचे ताब्यांतील विलायतीच्या आबादानीवर नजर ठेवावी. म्हणजे त्यांचें इनाम त्यांजकडे चालू राहील. सारांश, खोपडे घराण्यांतील एका शाखेचे जे कागद मला पहावयास मिळाले व त्यांचें सार म्हणून जो मजकूर वर दिला आहे त्यावरून असें वाटतें कीं, या घराण्यांत शिवकालीन मराठी इतिहासावर प्रकाश पाडणारे बरेच महत्त्वाचे फार्सी-मराठी कागद अजूनही सांपडावे.

---

# ६. शिवाजीची कर्नाटकावरील एक स्वारी

१. ऐतिहासिक फार्सी साहित्य तृतीय खंड लेखांक १८ स लिहिलेल्या खुलाशाच्या टीपेंत तीन फार्सी फर्मानांच्या आधारानें मी असें दाखवून दिलें आहे कीं, श. १५७८ कार्तिक वद्य १३ (इ. १६५६ नोव्हेंबर ४) ते श. १५७८ माघ शुद्ध १ (इ. १६५७ जानेवारी ५) या दोन दिवसांच्या दरम्यान केव्हां तरी शिवाजी महाराजांच्या सैन्यानें कर्नाटकांत धारवाड जिल्हा व म्हैसूर संस्थान यांच्या सरहद्दीवर असलेल्या मासूर गावापर्यंत धडक मारली होती. पण ह्या स्वारींत शिवाजी महाराजांच्या सैन्याचा पराभव होऊन त्यास माघार घ्यावी लागली.

२. शिवचरित्रप्रदीप पृ. ८३ वर हनगंडीकर देसायांच्या संग्रहांतील एक पत्र प्रसिद्ध झालें आहे. हें पत्र श. १५८१ आश्विन शुद्ध १ (इ. १६५९ सप्टेंबर ७) या तारखेचें असून यांत 'परगणे मजकूरचे (तेरदाळ) विलायतीस शिवजी तसवीस देतो त्यास कृष्ण गौडा देसाई (हनगंडी देसायांचा पूर्वज) बहुत मशाकत करून हशम घोडा राऊत ठेवून गनिमास घेरा केले' असें सांगितलें असून कृष्णगौडाच्या या कामगिरीबद्दल त्यास कांहीं इनाम दिल्याचें नमूद आहे. ही स्वारी केव्हां झाली असेल ? श. १५८१ मार्गशीर्ष शु. ७ (इ. १६५९ नोव्हेंबर १०) रोजीं शिवाजी-अफजल भेट होऊन अफजलखान मारला गेला. श. १५८१ आषाढ शुद्ध ६ (इ. १६५९ जून) रोजीं अफजलखानास शिवाजीचा समूळ नाश करण्यासाठीं पाठविलें आहे, तुम्ही त्यास साहाय्य करा अशा आशयाचें फर्मान कान्होजी जेध्यास पाठविलें गेलें. फर्मान पोंचल्यावर तें घेऊन जेधे राजगडास महाराजांच्याकडे गेला. त्यापूर्वीं वैशाखांत (एप्रिल) याच प्रकरणाविषयीं मावळांतील इतर देशमुखांस अशाच प्रकारचीं फर्मानें आल्यामुळें त्यांपैकीं खंडोजी खोपडे बेशक अफजलखानाकडे गेला. तेव्हां महाराज श. १५८० च्या अखेरीस किंवा श. १५८१ च्या आरंभीं तेरदाळच्या

स्वारीवरून परत आले असले पाहिजेत (शिवचरित्रप्रदीप पृ. १९, २०).

३. ही स्वारी केव्हां सुरू झाली, हिचें वास्तव आधिपत्य कोणाकडे होतें, या स्वारीचें फलित काय या विषयीं तपशीलवार माहिती मिळत नाहीं; म्हणून मी या ठिकाणीं हींविषयीं अधिक न लिहितां या स्वारीपूर्वीं श. १५८० (इ. १६५८) च्या पावसाळ्यांत शिवाजी महाराजांनीं कर्नाटकांत केलेल्या आणखी एका स्वारीविषयीं माहिती देणार आहे. ही नवी स्वारी कांहीं फार्सी फर्मानें व एक मराठी पत्र यांवरून सिद्ध होत आहे. कशी तें येथें थोडक्यांत दाखवितों.

४. ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड ३ रा लेखांक ७९ हें एक हि. १०६८ जमादिलावल १९ (श. १५७९ माघ वद्य ५, इ. १६५८ फेब्रुवारी १२) या तारखेचें व गदगच्या देसायांस धाडलेलें आदिलशाही फर्मान असून यांत एका प्रांताची सुभेदारी देऊन पाठविलेल्या अफ्जलखानाच्या ताबेदारींत राहून चाकरी करण्याविषयीं त्यांस फर्माविलें आहे. फर्मान जागजागीं फाटलें असल्यानें अफ्जलखानास कोणत्या प्रांताची सुभेदारी देऊन कोठें पाठविलें याचा नीट बोध होत नाहीं. फक्त गदगच्या देसायांना मदतीस जाण्याविषयीं सांगण्यांत आलें असल्यानें अफ्जलखानाची नेमणूक कोठें तरी कर्नाटकांत झाली असावी येवढी कल्पना चाटून जाते.

५. सुमारें दोन वर्षांपूर्वीं मंचर-जुन्नर (पुणें) येथील श्री. कृष्ण गोपाळ घाटपांडे हे कित्येक जुने फार्सी व मराठी कागदपत्र घेऊन मंडळाकडे आले. त्यांत हि. १०६८ शाबान २२ (श. १५८० वैशाख वद्य १०, इ. १६५८ मे १६) या एकाच तारखेचीं तीन आदिलशाही फर्मानें आढळलीं. पहिलें फर्मान फार्सी व कानडी अशा दोन भाषांत असून कोनेटी नायकास धाडलें आहे. यांत अफ्जलखानास लश्करासह त्या (कोनेटी नायकाच्या) बाजूस नेमलें असून महाराज शहाजी भोसलेही त्याच बाजूस आहे. तेव्हां खान व महाराज यांच्या आज्ञेंत राहून राज्याची चाकरी करावी

आणि गरजगो (गरजेप्रमाणें बोलणारे) लोकांकडे लक्ष देऊं नये असें फर्माविलें आहे. यांत ती बाजू कोणती याचा खुलासा नाहीं आणि कोनेटी नायक कोण याचाही पत्ता लागत नाहीं. दुसरें फर्मान-ही फार्सी व कानडी अशा दोन भाषांत असून म्हैसूरचा राजा नरसराज यास धाडलें आहे याचा आशय सामान्यतः वरच्या सारखाच आहे. पण यांत अफ्जलखानास लश्करासह कर्नाटक तर्फेस नेमल्याचा स्पष्ट निर्देश आहे. यांत आलेला नरसराज म्हणजे म्हैसूरचा प्रसिद्ध राजा कंठीरव नरस ओडेयर हा असून याचा काल श. १५६० ते १५८१ (इ. १६३८ ते १६५९) हा असल्यानें कालाचा उत्तम मेळ बसतो. तिसरें फर्मान केवळ फार्सी भाषेंत असून मीर्झा मुराद अली बेग यास धाडलें आहे. या फर्मा-नांत शहाजी भोसले व मीर्झा या दोघांनींही राज्याची एकनिष्ठेनें सेवा करावी, आपसांत भांडूंही नये आणि राज्यसेवेंत अंतरही पडूं देऊं नये असें फर्माविलें आहे. उपर्युक्त मीर्झा मुराद अली बेग याची अधिक माहिती मिळत नसली तरी यावरून येवढें स्पष्ट दिसत आहे कीं, अफ्जलखानाच्या या कर्नाटकांतील स्वारींत शहा-जीचें व त्याचें बनलें नसावें, दोघांत कांहीं तरी भांडण उत्पन्न झालें असावें आणि बहुधा मिर्झा मुराद अली बेग ह्यानें शहाजीशीं राज्याचें नुकसान होईल एवढी अटीतटीची कलागत उत्पन्न केली असावी.

६. नेमकें काय झालें असेल तें समजण्यास साधन नाहीं. पण इ. १९४५ मेच्या सह्याद्रि मासिकाच्या अंकांत २९५ ते २९८ पृष्ठांत मी कांहीं आदिलशाही फार्सी फर्मानांचीं भाषांतरें प्रसि-द्धिलीं आहेत. त्यांतील क्र. १२ चें फर्मान येथें उपयोगी पडण्या-सारखें आहे. या फर्मानाची तारीख हि. १०६८ रमजान ४ (श. १५८० ज्येष्ठ शुद्ध ५, इ. १६५८ मे २७) अशी असून शहाजी भोसल्यास धाडलें आहे. म्हणजे हें फर्मान उपर्युक्त ३ फर्मानांच्या नंतर केवळ अकरा दिवसांनींच पाठविलें आहे. यांत शिवाजी भोसल्याचा राज्यद्रोह, उन्मत्तपणा, कसूरी व गुन्हे यांचा दोष आपल्या माथीं मारला जाईल कीं काय या विचारानें शहाजी भयभीत झाल्यामुळें त्यास आश्वासन देण्यांत आलें आहे कीं,

शिवाजीच्या कोणत्याही कृत्याबद्दल त्यास जबाबदार धरलें जाणार नाहीं. त्याच्या जागीरींत कोणतीही कपात तर होणार नाहींच; उलट अधिक कृपा होईल. यावरून येवढें स्पष्ट होतें कीं, शिवाजी महाराजांच्या हालचालीचा हेतू व रूप यांची विजापुरी सत्तेस स्पष्ट कल्पना आली होती आणि शहाजीस शांत ठेवण्याचा व शक्य तर त्याजकडून चाकरी घेण्याचा प्रयत्न चालू होता. येवढी सर्व माहिती मिळाली तरी अफ्जलखानाची कर्नाटकांतील ही स्वारी कोणाविरुद्ध होती याचा अजून पत्ताच नाहीं. तो एका मराठी पत्राच्या साहचानें लागतो. तो असा —

७. हें पत्र शुहूर १०५९ मोहरम १३ (श. १५८० आश्विन शुद्ध १५, इ. १६५८ आक्टोबर १) या तारखेचें असून यांत एका शिवेच्या वादामध्यें दिव्याचा निर्णय घेतला असतां दिव्य करण्याचें नाकारलें अशी फिर्याद घेऊन एक पक्ष पुरंदरास शिवाजी महाराजांकडे आला व त्यानें आपली फिर्याद गुदरली. फिर्यादीचें काम पुढें चालावयाचें तों 'साहेब करणाटक प्रांती मसलतीस गेले. त्या प्रांतीहून आलियावर जो निवाडा करणे तो करतील तोपरियंत' इत्यादि गोष्टी नमूद आहेत. याचा अर्थ असा कीं, शिवाजी महाराज श. १५८० मध्यें मसलतीस (स्वारीवर) जे एकदां कर्नाटकांत गेले ते आश्विन शुद्ध पूर्णिमेपर्यंत परत आले नव्हते. या पत्रांत ते मसलतीस केव्हां गेले हें नमूद नाहीं. पण चारपांच महिन्यांपूर्वी अर्थात वैशाख किंवा मे महिन्यांत गेले असें समजण्यांत कांहींच धोका दिसत नाहीं. म्हणजे उपर्युक्त फर्मानांत अफ्जलखानास कर्नाटकांत पाठविलें तें मुख्यतः शिवाजी महाराजांवर पाठविलें असावें. आणि ही स्वारी शिवाजी महाराजांवर असल्यामुळें शहाजीची स्थिति अडचणीची झाली असली पाहिजे. कदाचित् हा महाराजांचा शहाजीच्या म्हैसूर संस्थानांतील बसवापट्टण वगैरे भागांत असलेल्या जागीरीशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न असावा. पण त्या बाजूचे कागद मिळे तों फार तर्क करणें उचित नाहीं (७५३).

८. या स्वारीचा तपशील थोडक्यांत असा— (१) श. १५७९ माघ वद्य ५ चें गदगच्या देसायांना अफ्जलखानास मदत करा असें

फर्मान (२, ३). श. १५८० वैशाख वद्य १० ला अफजलखानास सैन्यासह त्या बाजूस (कर्नाटकांत) नेमिलें आहे, शहाजी तिकडे आहेच, तुम्ही मदत करावी अशीं कोनेटी नायक व कंठीरव नरस ओडेयर यांस फर्मानें. (४) श. १५८० वैशाख वद्य १० चें तूं व शहाजी यांनीं न भांडतां एकनिष्ठेनें सेवा करावी असें मीर्झा मुराद अली वेग यास फर्मान. (५) श. १५८० ज्येष्ठ शु. ५ ला शिवाजीच्या कृत्याची जबाबदारी शहाजीवर नाहीं असें त्यास आश्वासन. (६) शिवाजी कर्नाटकाच्या मोहिमेवर गेला होता तो श. १५८० आश्विन शु. १५ पावेतों परतला नव्हता.

---

## ७. शिवाजी व अफ्जलखान

१. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात असा एक वाक्प्रचार मराठींत आहे. शिवाजीचे स्वभावविशेष लहानपणींच दिसूं लागले होते. तो वीस वर्षांचा होण्यापूर्वींच त्यानें फलटणच्या निंबाळकर राजास पकडून सोडलें व पळवून लाविलें होतें; घोरपड्यांची रग जिरविली होती; जावळी जिंकून तेथें चंद्ररावाची स्थापना केली होती आणि सिंहगडादि किल्ले काबीज केले होते. या गोष्टी होतात न होतात तोंच शहाजी कैदेंत पडला आणि शिवाजीवर फतहखानादि विजापुरी सरदार चालून आले. खळद–बेलसरच्या लढाईंत शिवाजीनें त्यांस चांगला मार देऊन फजीत केलें तरी शहाजीच्या सुटकेसाठीं त्याच्याच सांगण्यावरून सिंहगड विजापुरकरांस द्यावा लागला. ही गोष्ट श. १५७१ (इ. १६४९)त घडली. पण पुढील दहा वर्षांत शिवाजीनें सिंहगड, जावळी, कल्याण, भिवंडी, इत्यादि अनेक गड व स्थानें आपल्या ताब्यांत आणलीं. नगर आदिकरून मुघली प्रदेश पादाक्रांत केला. जंजिऱ्याच्या सिद्दीस कैदेंत टाकलें, विजापुरी प्रदेशांत कधीं तेरदाळ-जमखंडीपर्यंत तर कधीं हरिहर-मासूरपर्यंत स्वाऱ्या करून विजापुरकरांस अचंभित केलें व तो बापाचेंही ऐकत नाहीं असा

समज झाला. अशा तऱ्हेनें त्याच्या आक्रमक हालचालींचें पाऊल रोजच्या रोज पुढेंच पडूं लागल्यामुळें त्याचा बंदोबस्त करणें आवश्यक होऊन बसलें. श.१५७८(इ. १६५६) च्या आगेमागें विजापूरचा मुहम्मद आदिलशाह अर्धांगाच्या दुखण्यानें आजारी पडल्यामुळें दरबारी लोकांच्या आपसांतील भांडणांस ऊत आला. म्हणून शिवाजीच्या आक्रमक हालचालींकडे आवश्यक तितकें लक्ष देण्यास अवसर मिळाला नाहीं. मुहम्मद मरून दुसरा अली गादीवर येतांच विजापूरच्या दरबारानें पहिलें कांहीं करावयाचें ठरविलें असेल तर तें शिवाजीस नेस्तनाबूद करणें हें होय. कारण शिवाजीनें आपल्या हालचालींनीं तशी परिस्थितीच उत्पन्न केली होती.

२. या कामीं अफजलखानाची नेमणूक झाली ती विजापूरकरांच्या दृष्टीनें अनेक कारणांनीं योग्य अशीच होती. तो शिवाजीचा आनुवंशिक हाडवैरीच होता म्हणा ना. तो जात्या दगाबाज, क्रूर, हिंदुद्वेष्टा, मूर्तिभंजक तर होताच; पण शिवाजीनें जावळी घेऊन चंद्ररावाला तिथें स्थापिलें असतां त्यास काढून लावण्यासाठीं यानेंच जावळीवर स्वारी केली होती. शहाजीला पकडण्यांत यानेंच पुढाकार घेतला होता. शिवाजीचा थोरला भाऊ संभाजी, याच्याच कारवाईमुळें कनकगिरीच्या लढाईंत मारला गेला होता. सुमारें दहा वर्षें हा वाई परगण्याचा हवालदार असल्यामुळें यास त्या बाजूची खडान् खडा माहिती होती. शिवाजीनें स्वारी केलेला तेरदाळ वगैरे प्रदेश याच्याच ताब्यांत होता. यामुळें याच्या रोमरोमांत शिवाजीद्वेष भरला होता असें म्हटलें तर त्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं.

३. अफजलखानास आज्ञा झाली होती तिचें स्वरूप काय होतें? शिवाजीचा संपूर्णतया नाश करण्यास सांगितलें होतें कीं त्यास वश करण्याचा हुकूम होता? मावळांतील जेधे, खोपडे इत्यादि देशमुखांस बादशाही फर्मानें आलीं होतीं त्यांत शिवाजीचा हर उपायानें समूळ नाश करावा अशी स्पष्ट आज्ञा होती. अली आदिलशाहाचा इतिहास सांगतांना समकालीन ग्रंथकारांनी त्यास शिवाजीचा समूळ उच्छेद करावयाचा स्पष्ट हुकूम दिलेला होता

ही गोष्ट अनेक दृष्टांतांनीं स्पष्ट केली आहे. युरोपी व्यापाऱ्यांना बातमी लागली होती तीही शिवाजीचा संपूर्णतया नाश करण्याचा हुकूम झाल्याचीच होती. तो विजापुराहून निघाला तो विजापूरचा रवळनाथ, पंढरपूरचा विठोबा, तुळजापूरची भवानी यांचा विध्वंस करीत आला. वाटेंत बजाजी निंबाळकर हातीं लागला तो हत्तीच्या पायाखालीं तुडविलाच जावयाचा. पण साठ हजार होन खंडणी दिल्यावर त्याची कशीबशी सुटका झाली.

४. येथें एका वस्तुस्थितीचा खुलासा केला पाहिजे. या प्रकरणांत विजापूरकरांचा सपशेल पराभव झाला असल्यामुळें अफजलखानास शिवाजीचा संपूर्ण नाश करण्यासाठीं पाठविलें होतें; पण त्यांत तोच मूर्ख मेला या एका विधानाखेरीज काय काय झालें याचा तपशील विजापुरी मुसलमानी साधनग्रंथांत मिळत नाहीं. पुढील घटनांविषयीं जी कांहीं माहिती मिळते ती केवळ मराठी व संस्कृत साधनांत आली आहे. काटेकोर न्यायाच्या भाषेंत बोलावयाचें तर भेट कशी झाली, तींत दुसऱ्यास ठार मारण्याच्या प्रयत्नास प्रथम सुरवात कोणी केली, अर्थात् आक्रमक कोण व संरक्षक हालचाल करणारा कोण, इत्यादि तपशिलाबाबत अफजलखानाच्या बाजूचा पुरावाच मिळत नाहीं. यामुळें शिवाजीच्या बाजूचा पुरावा पाहूनच निर्णय देणें भाग पडत आहे. अफजलखानाच्या बाजूचा पुरावा भविष्यांत कधीं काळीं उपलब्ध झाला तर इतिहासाभ्यासी त्याचा अवश्य विचार करील. पण तशी परिस्थिति आज नाहीं.

५. महाराष्ट्रांतील देशमुखांना शिवाजीविरुद्ध अफजलखानास सर्व तऱ्हेनें साह्य करण्याविषयीं निक्षून फर्मानें आल्यामुळें त्यांच्या मनाची एकच तारांबळ उडाली. शिवाजी निदान सह्याद्रीलगतच्या मावळां-खोऱ्यांत सर्वबलिष्ठ झाला होता; म्हणून देशमुखांनीं केवळ फर्मानें आल्यामुळें त्याशीं वैर करण्यास प्रवृत्त होणें म्हणजे रोजचा हाणा-मारीचा प्रसंग येणार होता. तो त्यांस परवडणारा नव्हता. उलट फर्मानाची अवज्ञा करण्याचेंही धाडस त्यांच्यानें होत नव्हतें. अशा स्थितींत त्यांना चटकन् कांहींच निश्चय करतां येईना. भोर जव-ळच्या अंबाडयाचे देशमूख खोपडे केदारजी व खंडोजी यांमध्यें

भाऊबंदकीचें भांडण होतें. त्यांत खंडोजीचा उणा पक्ष असूनही शहाजी-शिवाजींच्या आश्रयानें तो केदारजीशीं भांडत होता. हा उपकार स्मरून निदान अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तरी त्यानें शिवाजीला सोडून अफ्जलखानाकडे जावयास नको होतें. पण हा संधिसाधु व पाजी मनुष्य फर्मानें येतांच तात्काल अफ्जलखानाकडे चालता झाला आणि केदारजीनेंही तोच मार्ग पत्करला.

६. कारीचा कान्होजी जेधे अधिक विचारी होता येवढेंच नव्हे तर शिवाजीचा व त्याचा घरोबाही होता. तेव्हां तो फर्मान घेऊन शिवाजीकडे काय करावें हें विचारण्यासाठीं गेला. शिवाजीला केदारजी – खंडोजी खोपड्यांचा राग आलाच होता; तेव्हां त्यानें राग व प्रलोभन-दर्शन या भावनांनीं कान्होजीस सांगितलें कीं, खोपडे गेले तसे तुम्हीही जा अफ्जलखानाकडे. पण जेध्यास हा सल्ला पसंत पडला नाहीं. तो शिवाजीकडेच राहिला. हा प्रसंग जेधे शकावलींत अगदीं थोडक्यांत पण रोचक पद्धतीनें मांडला आहे तो असा – 'कान्होजी नाईक जेधे यास मावळच्या देशमुखा-बराबरी फरमान आला होता तो घेऊन व आपले पाच जण पुत्र घेऊन राजश्री स्वामीच्या दर्शनास राजगडास गेले. राजश्री स्वामीस परवाना दाखविला. तेव्हां राजश्री स्वामी बोलले की, तुमचे शेजारी केदारजो व खंडोजी खोपडे देशमूख तर्फ उतरोली हे अफ्जलखाना-कडे गेले; तुम्ही पातशाही हुकूम मोडून राहिले म्हणजे वतनास अपाये होईल. जिवावरी गोष्ट येऊन संकट पडेल. याकरिता तुम्हीही जाणे. त्यावरी कान्होजी नाईक बोलिले की, महाराजानी (शहाजीनें) आपली क्रिया घेऊन तुमचे हाती दिल्ही तेच क्रिया व इमान आपला शाबूत आहे. वतन साहेबाच्या पायावरी ठेविले. आपण व आपले लेक साहेबापुढेस खस्त होऊन. तेव्हा जे होणे ते होईल. जेध्यांप्रमाणें बांदल, शिलिमकर, पासलकर, मारणे, ढमाले, मरळ, डोहोर इत्यादि देशमुखांपुढें असाच प्रश्न उत्पन्न झाला होता. तेव्हां त्यांनीं जेध्यांचें अनुकरण करून ते शिवाजीच्या पक्षांतच राहिले. उलट खोपड्यांप्रमाणें विशषतः देशावरचे बहुतेक देशमूख अफ्जलखानास मिळाले.

७. असें असतां शिवाजी-अफ्जलखान भेट व्हावी हा बूट कसा निघाला ? ही मागणी शिवाजीनें केली नव्हती. ही मागणी अफ्जलखानानेंच आपण होऊन केली होती. शिवभारतांत अफ्जलखानानें शिवाजीस संधि करण्याविषयीं आणि बळकाविलेला आदिलशाही व मुघली मुलूख परत देण्याविषयीं आवाहन केलें आहे; तर बखरींत शिवाजीचा संधि करण्यांत लाभ कसा आहे याचें वर्णन आहे. ही मागणी शुद्ध दगाबाजीची होती असें म्हणावयास हरकत नाहीं. मागें एकदां कर्नाटक जिंकीत असतां अफ्जलखानानें शिऱ्याच्या नायकास संधि करण्यासाठीं भेटीस बोलाविलें आणि भेटींत ठार केलें अशी हकीकत विजापुरी समकालीन फार्सी इतिहास मुहम्मदनामा यांत नमूद केलें आहे. हाच डाव येथें खेळून शिवाजीचा निकाल करावा असा अफ्जलखानानें बेत केला. म्हणून वाह्यतः मालकाच्या हुकुमाविरुद्ध त्यानें हा बूट काढलासें दिसतें.

८. ही भेट वाई प्रांतींच प्रतापगडापाशीं व्हावी अशी योजना कां केली ? एक तर या प्रसंगापूर्वीं सुमारें दहा वर्षें अफ्जलखान वाई प्रांताचा अधिकारी असल्यानें त्यास या प्रांताची चांगली माहिती होती. आणि दुसरें असें कीं, शिवाजीनें जावळी घेतली तेव्हां तेथून हाकलला गेलेला प्रतापराव मोरे हा अफ्जलखानाबरोबर असून शिवाजीचा उच्छेद झाल्यावर जावळीचा प्रदेश सहजच आपणांस मिळेल अशा हेतूनें त्यानें वाई प्रांतीं जाण्याबद्दल व भेट होण्याबद्दल आग्रह केला असावा. शिवाजीकडून आपलें कांहीं वाकडें होईल असें अफ्जलखानाच्या मनांत आलें असेल कीं नाहीं याविषयीं शंकाच आहे. तथापि कांहीं बरें वाईट झाल्यास माघारी येण्यास तो प्रदेश माहितीमुळें अनुकूल होता अशी कल्पना अफ्जलखानाच्या मनास शिवून गेली नसेलच असें म्हणतां यावयाचें नाहीं. वाई प्रांतांत भेटीचा बनाव घडवून आणल्यामुळेंच त्याचें कांहीं सैन्य जिवंत परतलें.

९. एकदां भेटीचा प्रसंग निश्चित झाल्यावर ती कोठें व्हावी हा महत्त्वाचा मुद्दा नव्हता. दोघांनाही सोयीची अशी प्रतापगडाच्या

माचीवर जागा मुकरर करण्यांत आली. अफजलखानाचें सैन्य प्रतापगडाच्या पूर्वेस महाबळेश्वराचा डोंगर पाठीशीं घालून पसरलें होतें; तर शिवाजीचें सैन्य प्रतापगडाचा डोंगर पाठीशीं घालून पांगलें होतें. अफजलखानाचा वकील कृष्णाजी भास्कर आणि शिवाजीचा वकील पंताजी गोपिनाथ यांनीं भेट कशी व्हावी, बरोबर माणसें किती असावीं, इत्यादि तपशील ठरविला. त्याचें तात्पर्य असें–प्रत्येकानें स्वतःबरोबर आपला एक वकील व दहा अंगरक्षक घ्यावे. पण प्रत्यक्ष भेटीच्या ठिकाणीं फक्त वकील असावे. अंगरक्षकांनीं बरेंच दूर रहावें. वकिलानें थोडें जवळ असावें. वकिलास भेट कशी होत आहे हें दिसेल अशी व्यवस्था केली असावी.

१०. या भेटींत दोहोंपैकीं कुणा तरी एकाचा निकाल लागणार हें ठरलेलेंच होतें. अफजलखानानें भेटींत दग्यानें शिऱ्याच्या नायकास मारल्यामुळें तो या बनावास कांहींसा सरावलेला होता. शिवाजीचें तसें नव्हतें. शिवाजीला भवानीचा, मी साह्य करणार असा साक्षात्कार झाला असला तरी या भेटींत खात्रीनें काय होईल याविषयीं त्याच्या मनांतील संशयनिवृत्ति झाली नव्हती असें दिसतें. यामुळें त्यानें दोन्ही प्रकारांनीं तयारी केली होती. म्हणजे असें कीं, या भेटींत आपण स्वतःच मेलों तर आपलीं मुलेंबाळें, राज्यांतील लहानमोठे नोकरचाकर व सैन्य यांनीं काय करावयाचें हें जसें त्यानें ठरवून दिलें होतें, तसें अफजलखान मेला तर त्यांनीं काय करावयाचें हेंही ठरवून ठेविलें होतें. म्हणून त्यानें आपल्या सैन्याची विशिष्ट तऱ्हेनें मांडणी केल्याचेंही शिवभारतांत सांगितलें आहे.

११. ठरल्याप्रमाणें श. १५८१ मार्गशीर्ष शुद्ध ७ मध्याह्न (इ. १६५९ नोव्हेंबर १०) या वेळीं दोघेही बरोबर वकील व अंगरक्षक शिपाई घेऊन आले. अफजलखान व शिवाजी एकमेकांस आलिंगन देण्यासाठीं पुढें आले. अफजलखानानें शिवाजीचें डोकें आपल्या डाव्या काखेंत दाबून उजव्या हातानें त्याच्या डाव्या बरगडीवर तलवार चालविण्याचा प्रयत्न केला. पण शिवाजीच्या हें लक्षांत येतांच त्यानें अंग मुरडून आपली तलवार खानाच्या पोटांत खुप-

सली व त्याचीं आंतडींच बाहेर काढलीं. तीं दाबून धरून खानानें किंकाळी फोडली तोंच धाडकन् तो जमिनीवर पडला. किंकाळी ऐकतांच वकील कृष्णाजी भास्कर शिवाजीवर धावून आला. पण शिवाजीनें पट्ट्याचा वार करतांच तो ठार पडला. नंतर शिवाजीनें खानाचे दोन तुकडे केले. येवढें होतें न होतें तोंच दोन्ही बाजूंचे अंगरक्षक धावून आले. पैकीं अफ्जलखानाकडील बडा सय्यद यास शिवाजीकडील जिवा महाल्यानें ठार केलें आणि इतरांना शिवाजीकडील इतरांनीं ठार केलें. अशा रीतीनें अफजलखानाचा निकाल लागलेला समजतांच पूर्वीं योजून ठेविल्याप्रमाणें शिवाजीच्या सैन्यानें अफजलखानाच्या सैन्यावर हल्ला चढविला. अफजलखान मेल्यामुळें त्याचें सैन्य वास्तविक गलितधैर्य झालें होतें. तथापि मुसेखान, हसनखान, याकूतखान, अंकुशखान, फाजिलखान इत्यादि सरदारांनीं प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. पण तो तात्काळ मोडून काढण्यांत आल्यामुळें प्रतापराव मोऱ्यानें दाखविलेल्या चोरवाटेनें हे सरदार पळून गेले आणि ६५ हत्ती, ४००० घोडे, १२०० उंट, कापडाची २००० ओझीं, दहा लक्ष मोहरा, होन, जवाहीर व इतर अगणित मालमत्ता शिवाजीच्या हातीं लागली. शिवाय दहा पाच मातबर लोक कैदी म्हणून सापडले.

१२. या स्वारीची फलश्रुति काय झाली ? पहिली गोष्ट ही सिद्ध झाली कीं, विजापूरकरांची सैन्ययोजना, धूर्तता इत्यादि बाबतींत जेवढी तयारी होती तीहून कांकणभर जास्तच शिवाजीची तयारी होती. शिवाजी अगदींच लेचापेचा शत्रू नाहीं हें केवळ विजापूरकरांनाच नव्हे तर मोगलांनाहि कळून चुकलें. मराठे सरदार, इनामदार, देशमुखादि वतनदार यांच्याही हें लक्षांत आलें कीं, शिवाजी ही अशी एक सत्ता आहे कीं, जिच्या आश्रयास गेलें असतां आपलें नुकसान न होतां फायदा होण्याचीही शक्यता आहे. यामुळें त्यास यापुढें स्वजनांचा फार विरोध झाला नाही. ही लढाई मारल्यामुळें झालेल्या विजयाचा फायदा घेऊन शिवाजीस सबंध कृष्णाकोयना खोरीं तात्पुरतीं कां होईना आपल्या सत्तेखालीं आणण्याची

संधि मिळाली व तिचा त्यानें भरपूर फायदा घेतला आणि त्यांतील कांहीं प्रदेश त्यानें कायम आपल्या सत्तेखालीं आणला.

१३. शिवाजी-अफजलखान प्रसंगाबाबत कांहीं गैरसमज अजूनही सुशिक्षित पण इतिहासाचा नीट अभ्यास न केलेल्या लोकांत प्रचलित आहे. तो म्हणजे शिवाजीनें अफजलखानास दग्यानें मारिलें. पण वर मी जी हकीकत दिली आहे तीवरून स्पष्ट होईल कीं, शिवाजीची प्रत्येक हालचाल संरक्षक स्वरूपाची होती. अफजलखान शिवाजीचा पूर्ण नायनाट करण्यासाठीं आदिलशाही हुकुमानें आपण होऊन आला होता. भेटीचा घाट त्यानेंच घडवून आणला होता. भेटींत शिवाजीस मारण्याचा प्रथम प्रयत्न अफजलखानानेंच केला. शिवाजीनें कांहीं केलें असेल तर प्रत्येक वेळीं त्यानें आपल्या अक्कलहुशारीनें संरक्षक स्वरूपाच्या पण अशा कांहीं हालचाली केल्या कीं, त्यामुळें अफजलखानाचाच संपूर्ण नाश झाला. पण यांत शिवाजीकड कोणताही दोष येतो असें इतिहासाभ्यासी मनुष्याला तरी वाटणार नाहीं.

१४. या प्रसंगाच्या अनुषंगानें आणखी एक मुद्दा मला स्पष्ट करावासा वाटतो. अनेक लोक शिवाजीच्या कार्यास हिंदु-मुसलमान तंट्याचें स्वरूप देऊं इच्छितात. पण मला तें तेवढें खरें वाटत नाहीं. शिवाजी हिंदू होता. उलट विजापूरकर, मुघल, सिद्दी वगैरे मुसलमान होते. सध्याच्या मानानें त्या वेळीं सर्वच समाजांच्या धर्मभावना अधिक तीव्र होत्या. विशेषतः मुसलमान राज्यकर्ते असल्यामुळें ते आपला धर्मवेडेपणा वारंवार व वेळीं अवेळीं प्रकट करीत. तत्कालीन हिंदु अगोदर धर्मवेडे कधींच नव्हते; त्यांतून ते जित असल्यामुळें त्यांच्या धर्मभावना उच्छृंखल कधींच झाल्या नाहींत. पण ज्यांच्या पूर्वजांचीं हाडें येथेंच पडलीं व ज्यांच्या वंशजांचीं हाडें येथेंच पडणार होतीं, अशा बहुसंख्य लोकांवर धर्म, भाषा व संस्कृति यांनीं सर्वस्वी भिन्न असलेले परकी व अल्पसंख्य लोक जुलमानें राज्य करीत होते. यांत मुसलमान होते तसे ख्रिस्ती पोर्तुगीजहि होते. तेव्हां शिवाजीचा लढा, मुघल, विजापूरकर, पोर्तुगीज इत्यादि धर्मानें मुसलमान किंवा ख्रिस्ती होते म्हणून

त्यांशीं नसून ते परके, अल्पसंख्य, जुलमी, येथील नैसर्गिक बहुसंख्य रहिवाशांचा धर्म, संस्कृति, भाषा व अभ्युदयनिश्रेयस यांवर सातत्यानें आघात करणारे होते म्हणून होता. हा धर्माकरतां लढा असता तर शिवाजी मुसलमान व ख्रिस्ती यांस आपल्या नोकरींत घेता ना. पण त्याच्या नोकरींत ज्या अर्थी दोन्ही धर्मांचे लोक होते, त्याअर्थी शिवाजीला आपला लढा केवळ धार्मिक आहे असें वाटत नव्हतें. संपूर्ण मराठी सत्तेचा इतिहास पाहिला तरी त्यांत मराठ्यांची 'यतो धर्मस्ततो जयः' ही भावना नसून यतो जयस्ततो धर्मः–प्रथम राजकीय जय व नंतर धर्म–ही भावना होतीसें दिसतें. आता हें खरें कीं, एकदां येथील सत्ता नैसर्गिक बहुसंख्याकांच्या हातीं गेली म्हणजे ते जागृत व स्वाभिमानी असतील तर त्यांचा राजकीय, धार्मिक, सामाजिक, भाषिक इत्यादि सर्व प्रकारचा अभ्युदय व्हावयाचा हें ठरलेलेंच होतें. त्याप्रमाणें मराठी राज्य झाल्यावर त्यांचा अभ्युदय झालाही. तथापि येथील मुसलमान व ख्रिस्ती पोर्तुगीज सत्ताधारी ज्याप्रमाणें आपल्या राजकीय सत्तेखालीं असणाऱ्या लोकांवर धार्मिक, सांस्कृतिक, भाषिक, जुलूम करीत तसा शिवाजीनेंच काय पण कोणाही मराठी सत्ताधाऱ्यानें केला नाहीं. या दृष्टीनें पाहिलें तर शिवाजीनें स्थापिलेलें मराठी राज्य मुसलमानी किंवा पोर्तुगीज सत्तेपेक्षां हजारों पटींनीं उत्तम होतें याविषयीं मुळींच शंका नाहीं.

---

## ८. शिवगुणसंकीर्तन

१. तीनशे वर्षांपूर्वीं महाराष्ट्रावर पोर्तुगीज, मुघल व आदिलशाही राज्यें होतीं. शिवाजी महाराजांनीं त्या ठिकाणीं मराठी राज्याची स्थापना केली व लोकांना परकी अमलाच्या पकडींतून सोडविलें. यामुळें आपण महाराजांची महापुरुषांत गणना करतों. अशा महापुरुषांत कोणते गुणावगुण होते हें पाहणें उद्‌बोधक होईल. आतां याचा विचार दोन तीन भूमिकांवरून करतां येण्यासारखा आहे. हिंदू व

मराठे हे महाराजांकडे केव्हांही अभिमानपूर्ण दृष्टीनें पाहणार. त्याप्रमाणें तत्कालीन लोकांनीं त्यांकडे कदाचित् तसें पाहिलेंही असेल. पण तत्कालीन मुसलमानी राजांची व लोकांची स्थिती निराळी होती. विजापूर व दिल्ली येथील मुसलमान राजांशीं लढून महाराजांनीं आपलें राज्य प्रस्थापित केलें. यामुळें तत्कालीन राज्यकर्तें व मुसलमानी धर्माचे अभिमानी असे लेखक यांची शिवाजीकडें पाहण्याची दृष्टी खात्रीनें वेगळी असली पाहिजे. याशिवाय महाराजांकडे आणखी एका निराळयाच दृष्टीनें पाहणारा वर्ग होता. तो म्हणजे डच, इंग्रज वगैरे परदेशी व्यापारी लोकांचा.या तीन वर्गांपैकीं प्रत्येकाचे हितसंबंध निरनिराळे असल्यानें त्यांनीं शिवाजीविषयीं निरनिराळ्या व परस्परांविरुद्ध कल्पना केल्या आहेत. महाराजांच्या स्वभावचित्राच्या या सर्व कल्पना एकत्र केल्यास महाराजांचें स्वभावचित्र सर्वांगपरिपूर्ण रेखाटलें जाण्याचा बराच संभव आहे. सध्या मी येथें महाराजांच्या स्वतःच्या पत्रांतून त्यांच्या स्वभावाचें जें प्रतिबिंब उमटलें आहे तें दिग्दर्शित करण्याचा थोडासा प्रयत्न करीत आहे.

२. शिवाजी महाराजांचें अगदीं पहिलें पत्र श. १५६७ चें म्हणजे त्यांचें वय सारें १६ वर्षांचें असतांनाचें आहे. खेडेबारें तर्फेतील रांझे गांवचा मोकदम (पाटील) बाबाजी भिकाजी गुजर यानें कांहीं बदअमल म्हणजे स्त्रीविषयक ग़ैरवर्तणूक केली. याबद्दल महाराजांनीं त्यास आपल्या समोर बोलावून चौकशी केली. त्या चौकशींत त्यानें खरोखरीच गैरवर्तणूक केली होती असें सिद्ध झाल्यामुळें महाराजांनीं त्याचे हातपाय तोडविले व त्याची मोकदमी जप्त केली. पण सोनजी गुजर नांवाच्या बाबाजीच्या एका भाऊबंदानें बाबाजीस आपल्या हवाली (सांभाळण्यासाठीं) करण्याबद्दल विनंती केली. बाबाजीस मूल-बाळ कांहीं नव्हतें. तेव्हां शिवाजीनें कांहीं दंड घेऊन बाबाजी व रांझे गांवची मोकदमी सोनजीच्या हवाली केली अशी या पत्रांत हकीकत सांगितली आहे. दुसऱ्या एका प्रसंगींही अशीच शिक्षा केलेली दिसते. श. १५९३ च्या गुंजण मावळच्या देशमुखाला धाडलेलें एक आश्वासन पत्र उपलब्ध आहे. त्यांत महा-

राज स्वतःच म्हणतात, ‘ तुम्ही पेशजी साहेबाशी इमाने रुजुवातीने चाकरी करीत होतेस. साहेबांची मेहेरबानी तुम्हावरी होती. यैसियासि दादाजी यशवंतराऊ सिवतरकर याथे किती एक बेसंगपणाची वर्तणूक केली. याबदल साहेबी त्यावरी निकर करून डोले काढून गडावरील अदबखाना घातले (ले. १४६०). येथेंही बेसंगपणाच्या वर्तणुकीबद्दल महाराजांनीं गुन्हेगारांस चांगलें प्रायश्चित्त दिलेलें दिसतें. त्या वेळीं हातपाय तोडणें किंवा डोळे काढणें असल्या शिक्षा प्रचारांत होत्या. महाराजांनींही त्या शिक्षा द्यावयास कमी केलें नाहीं.

महाराजांच्या याच गुणाचें आणखी एक उदाहरण असें– पंताजी पंडित नावाचे एक गृहस्थ भोर जवळच्या आंबवडें गांवीं रहात होते. रायाजी देशमूख नावाचा एक मनुष्य एका बाजाराचे दिवशीं त्यांजकडे गेला असतां दोघांची कळावती जाली. ते वक्ती त्या पोराने कमअकली करून त्यांची बेअदबी केली.... पंडित बहूत थोर मनुष्य आहेत. तुम्ही लहान लोकी त्यांसी बेअदबी केली...या उपरी तुम्ही पंडितापाशी जाउनू बजीद होउनू आपला गुन्हा माफ करुनू घेणे. त्याचा बयेदा वारिला नाही म्हणजे साहेब तमाम रजपुतांचे पायी बेडिया घालुनूं गळां तोग घालुनू किले राजगडावरी ठेवुनू धोंडे वाहबितील अशी तंबी रायाजी देशमूख यास शिवाजीनें दिली आहे. या उदारणांतही महाराजांची जरब कशी होती हें दिसून येतें (ले. २६६३).

३. वर दिलेल्या उदाहरणांवरून कदाचित् कोणाचो अशी कल्पना होईल कीं, शिवाजी महाराज निर्दय असले पाहिजेत. पण वस्तुस्थिती अगदीं उलट होती हें पुढील दोन उदाहरणांवरून दिसून येईल. श. १५८४ चें साल. शायिस्तेखान पुण्याच्या बाजूस आला होता. त्याच्या सैन्यानें पुणें प्रांतांत धुमाकूळ मार्जविला होता. या धुमाकुळाची झळ रोहिडखोऱ्यासलागण्याच्या बेतात होती. महाराजांना रयतेची काळजी घेणें जरूर पडलें. महाराजांचें सी. आय्. डी. खातें आपल्या कामांत तरबेज होतें. महाराजांनीं रोहिडखोऱ्याचा देशमूख सर्जेराव जेधे यास हूकूम पाठविला. त्यांत ते लिहितात कीं, मोगल तपियात धावणीस येताती म्हणौन जासुदानी समाचार आणिला. तरी तुम्हास

रोखा अहडताच तुम्ही तमाम आपले तपियात गावचा गाव ताकिदी करून लेकरे-बाळे समेत तमाम रयेती लोकास घाटाखाले बांका जागा असेल तेथे पाठवणे. कामास हैगै न करणे. ऐशियासी तुम्हापासून अंतर पडलियावरी मोगल जे बांद धरून नेतील त्याचे पाप तुमचे माथा बैसेल. ऐसे समजोन गावचा गाव हिंडोनू रातीचा दिवस करुनू लोकाची माणसे घाटाखाली जागा असेल तेथे पाठविणे. या कामास एक घडीचाही दिरंग न करणे (ले. ९०५).यावरून शिवाजी महाराज आपल्या प्रजाजनांची किती काळजी घेत हें उघड दिसून येतें. या-शिवाय आणखीही एका पत्रानें हीच वस्तुस्थिती उघड होते. हें पत्र श. १५९३ च्या वैशाख पोर्णिमेचें आहे. चिपळुणास नेहमीपेक्षा लौकर लश्कराची छावणी पडली व त्याही अगोदर बरेच दिवस महाराजांचें सैन्य त्या बाजूस वावरत होतें. त्यामुळें त्या बाजूच्या सुभ्यातील रसद वगैरे जिन्नस प्रायः सरून गेले. छावणी पडल्यामुळें सैन्याचो व्यवस्था करणें महाराजांस भाग होतें. त्याप्रमाणें त्याची व्यवस्था लावलीही. अर्थात् ती अगदीं काटेकोर व जुजबी होती. त्यामुळें सैनिकांपासून रयतेस त्रास होण्याचा संभव फार होता. तसा त्रास होऊं नये एवढ्यासाठीं महाराजांनीं छावणीच्या अधिकाऱ्यास पत्र घातलें. त्यांत ते म्हणतात—जैसी तैसी पागेचा बेगमी केली आहे. त्यास तुम्ही मनास ऐसा दाणा, रातीब, गवत,मागाल; असेल तोवरी धुंदी करून चाराल. नाहीसे जाले म्हणजे मग काही पडत्या पावसात मिळणार नाही. उपास पडतील, घोडी मरायास लागतील, म्हणजे घोडी तुम्हीच मारली ऐसे होईल. व विलातीस तसवीस देऊ लागाल; ऐशास लोक जातील, कोण्ही कुणब्याचे येथील दाणे आणील, कोण्ही गवत, कोण्ही फाटे, कोण्ही भाजी, कोण्ही पाले, ऐसे करू लागलेत म्हणजे जे कुणबी घर धरून जीव मात्र घेऊन राहिले आहेत तेही जाऊ लागतील. कितेक उपाशी मराया लागतील. म्हणजे त्याला ऐसे होईल की मोगल मुलकात आले त्याहूनही अधिक तुम्ही. एवढा तळतळाट होईल. तेव्हा रयतेची व घोडियाची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हे तुम्ही बरे जाणून सिपाही हो अगर पावखलक हो बहूत यादी धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेंत

अगर मुलकात गावोगाव राहिले असाल त्यानी रयतेस काडीचा अजार द्यावया गरज नाही. ज्याला जे पाहिजे, दाणा हो अगर गुरें-ढोरें वागवीत असाल त्यास गवत हो, अगर फाटे, भाजीपाले व वरकड विकाया येईल ने रास घ्यावे, बाजारात जावे, रास विकत आणावे. कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती अगर कोण्हास कलागती करावयाची गरज नाही (ले. १३९२). यांत रयतेविषयीं किती काळजी व्यक्त होते हें काय निराळें सांगण्याची गरज आहे?

४. महाराजांच्या अंगीं दिसून येणारा दुसरा मोठा गुण म्हणजे अत्यंत सावधपणा हा होय. श. १५७६ (इ. १६५४) च्या सुमारास चांबळी (पुणें) येथील सरनाईक घराण्यापैकीं निळकंठराव पदवी धारण करणारे एक गृहस्थ होते. शहाजीचा व त्यांचा अतिशय स्नेह-संबंध होता. शहाजीस पुण्याकडील प्रांत तैनातीस मिळाला असतां पुरंदरचे किल्लेदार म्हणून हे गृहस्थ शहाजीशीं अगदीं विश्वासानें वागले असल्यामुळें शहाजीचा त्यांजवर लोभ होता. असे हे गृहस्थ वारल्यामुळें शहाजी व शिवाजी या दोघांनींही त्यांच्या मुलांना सांत्वनपर पत्रें लिहिणें भाग. त्याप्रमाणें दोघांनींही पत्रें लिहिलीं. शहाजीनें लिहिलें की, 'राजश्री राऊ गोसावी जैसे काही चालत होते, तेच रीतीने तुम्ही वर्तणे, तेणेकरून तुमचे ऊर्जित आहे' (ले. ६४०). महाराज मात्र सावधपणानें लिहितात कीं, 'जोपर्येत तुम्ही आम्हासी इमाने वर्ताल तोपर्येत आम्हीही तुम्हासी इमाने वर्तोन. तुम्हापासून इमानात अंतर पडलेया आमचाही इमान नाही.' दुसरा प्रसंग कान्होजी जेध्यांविषयीं आहे. श. १५६८ च्या सुमारास जुना चंद्रराव पदवी धारण करणारा मोरे मेल्यावर विजापूर दरबाराच्या मतानें इतर गैर वारसांनीं त्याची जागीर बळकावण्यास सुरवात केली. त्या काळीं अफजलखान वाईचा सुभेदार असल्यानें या गोष्टीचें पारिपत्य करणें त्यास जरूर. याच कामासाठीं त्यानें कान्होजी नाईक जेध्यास बोलाविलें. कान्होजी नाइकांनीं महा-राजांस सल्ला विचारला. महाराजांना अफजलखानाची पूर्ण-माहिती होती. ते लिहितात, 'गेले तरी पाहिजे आमा खासा अगर पुत्र पाठवायचे जाले तरी त्याचा बोलभाक बरवे रीती घेऊन मग

जाणे; दगा होये ऐसे न करणे. एक भले माणूस दरम्यान घेऊन मग जाणे ...हरएक बहाणा करून तुम्ही राहाणे (ले. ५५८). यांत सावधपणा नाहीं असें कोण म्हणेल ?

५. महाराजांचें घरोब्यांतील माणसांवरचें प्रेम पहाण्यासारखें आहे. अफ्जलखान महाराजांवर चालून आला असतां महाराजांनीं नाइकजी राजे पांढरे याच्या मध्यस्थीनें बजाजी नाइकाचा बचाव केला हें प्रसिद्ध आहे (ले. १७९७). पण बजाजी नायक बोलून चालून नातेवाईक होता. त्याबद्दल महाराजांनीं खटपट केली यांत विशेष नाहीं. ही आस्था इतर घराण्यांतील माणसांविषयीं दिसते. विठोजी हैबतराव सिलिबकर हा प्रथम महाराजांच्या विरुद्ध होता. महाराजांशीं दोन हात करण्याचीही त्याची ईर्ष्या होती. पण महाराजांपुढें तें चालणें शक्य दिसेना. विजापूरकरांची बाजूही सोडवेना. अशा स्थितींत त्यानें बरेच दिवस घालविले. पुढें महाराजांशीं त्यानें सुरक्षिततेचें आश्वासन मागितलें व महाराजांनीं तें दिलें (ले. १२०८). आपलेपणा उत्पन्न झाल्यावर मग काय विचारता ? महाराजांनीं त्यास सर्व प्रकारें उचलून धरिलें. महाराजांचा सेनापती गोमाजी नायक पाणसंबळ याच्या मुलास विठोजीनें आपली मुलगी दिली. लग्नाकरितां जिजाबाईनें सर्वांना आपल्याकडेच (हुजूर) बोलाविलें. पण विठोजीनें सांप्रत रोजीचे खावयास नाही आणि लग्नसिधी कैसी होईल अशी विवंचना प्रकट केली. जिजाबाईनें ताबडतोब २५ होन रोख व ५०० माणसांची जेवण्याची सामग्री बक्षीस देऊन लग्न सिद्ध करणें म्हणून सांगितलें (ले. १२४४).

६. असें असलें तरी घरोब्यांतील माणसेंही आपलें काम योग्य तऱ्हेनें करीत नसतील किंवा अयोग्य वर्तन करीत असतील तर महाराजांनीं त्यांना बोलण्याचें कमी केलें नाहीं. याचें उत्तम उदाहरण जेध्यांविषयींच आहे. कान्होजी जेध्याचा मुलगा बाजी जेधे हा रजा घेऊन घरीं गेला तो बरेच दिवस आला नाहीं. म्हणून महाराजांनीं त्यास येण्याबद्दल हुकूम पाठविला. त्याप्रमाणें बाजी येणार तों घरामध्यें दुखापती झाली व तो आला नाहीं. ही गोष्ट महा-

राजांस त्यानें कळविली. पण महाराजांस त्याच्या प्रामाणिकपणा-विषयीं कदाचित थोडी शंका आली असावी. म्हणून महाराज लिहि-तात–'बहुत दिवस राहिल्यावरती सबनीस जागा धरतील. येणेकरून तुमचा काय सरफा आहे. याउपरी सत्वर स्वार होऊन येणे.' यावरून घरोब्यांतील माणसांनाही महाराज जागे करण्यास सोडीत नसत हें उघड आहे (ले. ९०१ व ९०४). पण याहीपेक्षां उत्तम उदाहरण याच बाजीसंबंधांत आपणांस मिळण्यासारखें आहे. बाजी व शिवाजी हे दोघेही कान्होजीचे मुलगे. त्यांच्या वाटण्या कान्हो-जीनें आपल्या हयातींत करून दिल्या होत्या. पुढें या वाटण्यां-विषयीं भांडण उत्पन्न झालें. सर्व शेतांवर व घरांवर आपलाच हक्क आहे असें समजून बाजी, शिवाजीस वाटणीप्रमाणें त्याकडे आलेली जमीनही करूं देईना. ही तक्रार महाराजांच्या कानांपर्यंत गेली. महाराजांनीं बाजीची कानउघाडणी केली. ते लिहितात — 'त्याचा–तुमचा निवाडा होऊन गेला असता मागुते कथला कराया काये गरज आहे ? सेतेही द्याना, घरही द्याना, म्हणजे हे गोष्टी कैसी चाली पाहते ? इत:किया उपरी सेताविषयी कथला न करणे ......कथलियांत फाइदा नाही (ले. १२६१). महाराजांना घरो-ब्यांतील माणसांनींही अन्याय केलेला खपत नसे हें यावरून उत्तम दिसत आहे.

७. नोकरांच्या बाबतींत तर महाराजांचें वर्तन फारच कडक होतें असें वाटतें. थोडासाही हलगर्जीपणा, अळंटळं, जबरदस्ती हीं त्यांस मुळींच खपत नसत. मग तो नोकर ब्राह्मण असो कीं आणखी एखाद्या जातीचा असो. त्याला समजाविण्यास ते कधीं चुकत नसत. श. १५९० च्या सुमाराची गोष्ट. बाबाजी राम व मुकुंद कान्हो हे दोघेहो पुणे परगण्याचे देशपांडे. त्यांच्या वाटण्या झाल्या असतां बाबाजी राम मुकुंद कान्होस त्याच्या वाटणीचें काम करूं देईना. मुकुंद कोन्होनें महाराजांकडे तक्रार केली. महाराज बाबाजी रामास लिहितात– 'याचे तक्सिमेचा कारबार यासी न द्या आणि अवघा कारबार आपणच करावा तरी हे कोण गोष्टी ? ... नवे कचाट करून कारबारास खलेल करणे हे गैरमाकूल गोष्टी. मुकुंद

कान्होच्या कारबारास बजबज घालावयासी गरज नाही हे समजोन वर्तणूक करणे. नवे खलेल सर्वथा न करणे. ते कांहीं चालणार नाही. यावरून नोकरांनीं केलेले अन्याय महाराजांना खपत नसत हें उघड आहे. याच बाबतींत जिजाबाईनेंही बजाविलें आहे कीं, 'नसते कथले केल्या, चिरंजीव काही कोन्हाचा मुल्हाजा करणार नाहीत' (ले. १२३२, १२३४ व १२३८).

८. ही झाली एका देशपांड्याविषयीं गोष्ट. देशपांडे हे आनुवांशिक अधिकारी असल्यामुळें असल्या अधिकाऱ्यांवर वेतनी नोकरांप्रमाणें महाराजांची सत्ता कदाचित् पाहिजे तशी चालत नसेल; पण महाराजांनीं आपल्या हयातींत वेतन देऊन नेमलेल्या नोकरांची गोष्ट तशी नव्हती. त्यांस महाराज क्वचित्‌ही बेशिस्त वर्तन करूं देत नसत. केल्यास त्याची योग्य कान–उघाडणी झाल्याशिवाय रहात नसे. याचें उत्तम उदाहरण आपल्यापाशीं आहे. यांतील प्रसंग श. १५९६ च्या सुमाराचा आहे. दंडाराजपुरीवर आपला ताबा असावा असें महाराजांना वाटे. पण तें बंदर मुघलांतर्फे सीदी अंबरच्या ताब्यांत होतें. त्याच्या हातून तें लौकर हस्तगत होण्याचें चिन्ह दिसेना. म्हणून महाराजांनीं राजपुरीजवळच पद्मदुर्ग नांवाचा निराळा किल्ला बांधला. त्या किल्यावरून सीदीशीं कायमचें युद्ध चालू ठेवण्याचा बेत करून त्याप्रमाणें महाराजांनीं त्या कामावर दौलतखान व दर्यासारंग यांची नेमणूक केली आणि त्यांना लागणारी साधनसामग्री व द्रव्य प्रभावळीचा ब्राह्मण सुभेदार जिवाजी विनायक यानें पुरवावें असा मोरोपंतांनीं हुकूम दिला. परंतु या सुभेदारानें जरूर त्या गोष्टी पुरविण्यांत कसूर केली. अर्थात दौलतखान व दर्यासारंग यांनीं महाराजांकडे तक्रार केली. महाराजांनीं जिवाजी विनायकास धाडलेलें पत्र पाहण्यासारखें आहे. महाराज म्हणतात— 'दौलतखान व दर्यासारंग यांसी . . . तुम्हीं कांहीं पावलें नाहीं म्हणोन कळों आलें. त्यावरून अजब वाटलें कीं, ऐसे नादान थोडे असतील . . . पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील आणि तुम्ही ऐवज न पाठवून आरमार खोळंबून पाडाल ! एवढी हरामखोरी तुम्ही कराल ! हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय ? न

कळे कीं, हाली हबसियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील. त्याकरितां ऐसी बुद्धी केली असेल. तरी ऐशा चाकरास ठीकेठीक केले पाहिजेत. ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो ? गनिमाचे चाकर गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल ( ले. १७१८). हा हुकूम म्हणजे महाराजांच्या कडक शिस्तीचा नमुना आहे. यापूर्वी उल्लेखिलेल्या मौंजे हळवर्णच्या (दळवटणें) छावणीच्या अधिकाऱ्यांना पाठविलेल्या पत्रांत शेवटीं महाराज म्हणतात, 'ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल, त्यास मराठियाची तो इज्जत वाचणार नाहीं, मग रोजगार कैचा ? खळक समजों जास्ती केल्यावेगळें सोडणार नाहीं.' यांतही तोच कडकपणा दृष्टीस पडतो.

९. शिवाजी महाराज प्रत्येक गोष्टीचा निकाल स्वतः लावीत असें दाखवितां येईल. यांत त्यांचा काय हेतू असावा ? लहान सहान भांडणें स्वतः तोडण्यानें त्यांजवर कामाचा भार जास्त पडत असला पाहिजे हें उघड आहे. कदाचित ताबडतोब शेवटचा न्याय्य निकाल लावून गुन्हेगारांस चांगली जरब बसावी हाही हेतू असेल. महाराजांनीं गुन्हेगारास आपल्या समोर पाठवून देण्याविषयीं अनेक ठिकाणीं लिहिल्याचें सापडतें. पण मी दोनच उदाहरणें देतों. पुणें जिल्ह्यांत सुपें खुर्द नांवाचें गांव आहे. या गांवाची पाटीलकी, कांहीं कारणानें चांबळीचे सरनाईक, काटकर व एक धनगर यांमध्यें विभागली गेली. पण जगथाप आडनांवाच्या गृहस्थानें यांच्याशीं 'पाटीलकी आमची' असा दावा शक १५९७ च्या सुमारास सांगण्यास सुरवात केली व त्या बाजूच्या सुभेदारास सांगून त्या धनगराचीं माणसें तुरुंगांत डांबून टाकविलीं. ही गोष्ट महाराजांच्या कानावर गेली. महाराजांनीं जगथापास पत्र घातलेंच; पण सुभेदार राघो बल्लाळ यासही पत्र घातलें. त्यांत महाराज म्हणतात– जगथापांनीं तुम्हांस सांगोन धनगराचीं माणसें धरून ठेविलीं. खराडे खोटे जाहले तैसेच हे जगथाप...तुम्ही जगथापाच्या बोले धनगराचीं माणसें बंदीं घातली हा कोण इन्साफ ?' ...धनगराचीं माणसें . . . सोडून देणें ... जगथापाचा निवाडा

हुजूर होईल. जगथापाच्या पत्रांतही महाराजांनीं त्यास, खराडे खोटे जाहले तेसे तुम्ही आहा; वाद हुजूर सांगणें; काटकराचा आणि तुमचा निवाडा होईल असेंच बजाविलें आहे (ले. १८३१ व १८३२). असेंच दुसरेंही एक उदाहरण आहे. पालघर येथें महाराजांचें कांहीं सैन्य होतें. त्यावर सूर्याजी दुंदुसकर नांवाचा अधिकारी होता. त्याच्या नोकराच्या बायकोनें रायगडावर इमारतीच्या बांधकामावर असतां कांहीं वाईट वर्तणूक केली. याबद्दल पालघर ज्या भागांत होतें त्या भागाचा अधिकारी नरहर बाबाजी यानें सूर्याजीस दंड करून व तो वसूल करण्यासाठीं त्याच्या घरीं शिपाई बसवून त्याला त्रास देण्यास सुरुवात केली. महाराजांना ही गोष्ट खपली नाहीं. त्यांनीं लागलीच कळविलें कीं, नरहरी बाबाजी यानें दुंदुसकराचे घरीं मोकळदार बसवून तसवीस लाविलियाचें कळलें; तरी ज्याचा चाकर तोच चाकराचा धनी येथें आहे. सारी हकीकत लेहून पाठविणें व तोशीस न लावणें (ले. १७५५). या दोन्ही उदाहरणांवरून हें उघड होत आहे कीं, आपल्या अधिकाऱ्यांनीं स्वतःच्याच अधिकारांत एखादी जबरदस्ती करावी ही गोष्ट महाराजांस बिलकुल खपत नसे. याच गोष्टीची व महाराजांच्या जरबेची जीं इतर उदाहरणें आहेत, त्यांवरून असें वाटतें कीं, महाराजांच्या बोलण्यांत एक सहजोत्पन्न सामर्थ्य असे. त्यामुळें त्यांच्या बोलण्याचा लोकांवर परिणाम होऊन लोक जबरदस्ती किंवा अन्याय करावयास भीत असावेत.

१०. तत्कालीन भल्याबुऱ्या धार्मिक समजुतींतून महाराज सुटले होते असें म्हणतां येत नाहीं. त्यांनीं अनेक देवस्थानांचीं पूर्वीचीं उत्पन्नें यथासांग चालू ठेविलीं; येवढेंच नव्हे तर अनेक देवस्थानांना व साधु पुरुषांना नवीन नेमणुकाही करून दिल्याचे दाखले आहेत (ले. १४५५, १९३५). पण याहीपेक्षां मौजेची अशी हकीकत महाराजांच्या एका पत्रांत दृष्टीस पडते. श. १५९३ तील तो प्रसंग आहे. प्रभावळी किंवा प्रभानवल्ली सुभ्याच्या सबनिसीचें काम एका ब्राह्मणाकडे होतें. त्याचें व बापूजी नलावडा नांवाच्या एका शिपायाचें कांहीं कामावरून भांडण होऊन त्या

शिपायानें त्या ब्राह्मण सबनिसावर तलवारीचा वार केला. पण लागलीच आपण ही चूक केली व तिचे परिणाम आपणांस भोगावे लागणार हें लक्षांत येऊन त्यानें त्याच वेळीं आपल्या पोटांत सुरी खुपसून घेऊन जीव दिला. ही गोष्ट प्रभावळीच्या सुभेदारानें बरेच दिवस महाराजांना कळविली नाहीं. याबद्दल व लोकांना शिरजोर होऊं दिल्याबद्दल महाराज सुभेदारास लिहितात– 'मराठा होऊन ब्राह्मणावरी तलवार केली याचा नतीजा तोच पावला . . . ब्राह्मणास दटावतील त्याची खबर घेणें जरुरीचें आहे (ले. १४०८). यावरून महाराजांस ब्राह्मणांविषयी विशेषतः कामसू ब्राह्मणांविषयीं आदर वाटत होता हें उघड आहे. मात्र हा आदर आंधळा नव्हता हें पूर्वीच्या एका पत्रानें व प्रस्तुतच्या पत्रांतील साहेब त्यास दस्त करून हुजुर आणवितील या शब्दांवरून उघड होत आहे.

११. महाराजांच्या ठिकाणीं धार्मिक भावना चांगली वसत असली तरी इतर बाबतींत मात्र ते अत्यंत व्यवहारी होते हेंही सहज दिसून येणारें आहे. औरंगजेबातर्फे जयसिंग महाराजांवर चालून आला असतां आपलें त्याजपुढें कांहीं चालणार नाहीं हें ओळखून महाराजांनीं बादशाहापाशीं बनेल तसा तह करण्याचें ठरविलें. त्या वेळीं ती गोष्ट आपल्या मनांतील भावनांशीं किती विरुद्ध आहे याचा यत्किंचित् विचार न करतां त्यांनीं अतिशय दीनपणाचीं पत्रें औरंगजेबास लिहिलीं. आपल्या हेतूंच्या पूर्तीकरतां या वेळीं हाच मार्ग स्वीकारणें योग्य असें वाटतांच त्यांनीं तो बिनदिक्कत पत्करला. त्यांनीं बाजी घोरपड्याचा मुलगा मालोजी घोरपडे यास श. १५९८ च्या शेवटीं लिहिलेल्या पत्रावरूनही महाराज भावनावश होत नसत ही गोष्ट सिद्ध होते. या सुमारास विजापूरच्या गादीवर सिकंदर नांवाचा एक अल्पवयीन मुलगा असून खरी राजसत्ता बहलोलखान नांवाचा एक पठाण किंवा अफगाण बळकावून बसला होता. त्यानें दक्षिणी लोकांचें राज्यकारभारांतून उच्चाटण केलें होतें. एवढेंच नव्हे तर सुलतानाला जवळजवळ कैदेंतच ठेविलें होतें. तेव्हां महाराज व कुत्बशाह यांनीं खानास तंबी देण्याचा विचार केला. घोरपड्यांच्या कुलानें आदिलशाही सल्तनतीची एकनिष्ठेनें सेवा

केल्याबद्दल ख्याति होती. या एकनिष्ठेमुळें त्या कुलाला आदिलशाहींत मान्यताही मोठी होती. अशा कुलांतील कर्ता पुरूष आपल्या बाजूस येईल तर फार मोठें काम होईल या बुद्धीनें कुत्बशाह व महाराज या दोघांनींही मालोजीस पत्रें लिहिलीं. महाराज आपल्या पत्रांत सरळ व्यावहारिक उपदेश करतात- ऐशियास तुम्ही कदाचित् असा विचार कराल की, आदिलशाहीचे आपण दोन पिढीचे वजीर आणि आता विजापुराकडून कुतुबशाहीत राजे यांचे बोलें कैसे जावे ? तरी जे समई खवासखान धरिला, विजापूरचा कोट पठाणे घेतला, विजापूरचा बादशाहा धाकटा आहे त्याला कैदेत ठेविले तेच समई बादशाही बुडाली. विजापूर पठाणाचे हातास गेले; आता आदिलशाही कैची आणि उगीच तुम्ही तेथे आपली आदिलशाही आहे म्हणोन गुंतून राहिले आहा (ले. १९०१). यांत व्यावहारिकता नाहीं हें सांगण्याची कोणाची छाती आहे?

१२. महाराजांनीं संरक्षणाची याचना करणाऱ्या अनेकांना संरक्षणाखालीं घेऊन त्यांचा दुवा संपादन केला होता. कांहीं वेळेला संरक्षण देण्यांत महाराजांचा कांहीं हेतू साध्य होत असे. तर कित्येकदां हें संरक्षण निर्हेतुक कर्तव्य म्हणून केलेलें दिसतें. श.१५७३ तील एक पत्र पाहण्यासारखें आहे. बोरवाडीचा पाटील व चंद्रराव मोरे घराणें यांमध्यें श. १५६६ च्या सुमारास बरेपणा होता. पण श. १५७० च्या आगेमागें जुना चंद्रराव मरून नवीन कारभार पाहूं लागला. या नव्या चंद्ररावाचें व पाटलाचें भांडण होऊन पाटलाचें बीरवाडीखालील अधिकारीपण चंद्ररावानें आपल्याच घशांत घातलें व पाटलास कामावरून हाकून लाविलें. तेव्हां बीरवाडीचा पाटील महाराजांकडे दाद मागण्यास आला. महाराजांनीं कामाचे वेळीं दहा नोकरांसहीत चाकरी करण्यास येण्याचे अटीवर बीरवाडीच्या पाटलास चंद्ररावानें उपटलेलें अधिकारीपण परत दिलें (ले. ६१५). यांत कदाचित् महाराजांचा चंद्ररावाच्या विरुद्ध असलेल्या लोकांना आपल्या बाजूस वळवून घेण्याचा उद्देश असेल. पण सर्वत्र तोच उद्देश त्यांनीं धरला असें म्हणतां येत नाहीं. गुंजणमावळच्या देशमुखाचें उदाहरण थोडें वेगळें आहे. या घराण्यांतील

पुरूष कधीं शिवाजीकडे तर कधीं आदिलशाहींत चाकरी करीत असलेले सांपडतात. अशाच पद्धतीनें त्यांनीं कधीं महाराजांविरुद्ध वर्तन केल्यामुळें महाराज आपणांस छळणार असें त्यांना वाटलें. त्यामुळें देशमूख मंडळी हवालदिल झाली. महाराजांस ही गोष्ट समजली. तेव्हां महाराजांनीं त्यांस अभयपत्र लिहिलें. त्यांत महाराज म्हणतात –‘ कितेक गोष्टीकरिता शकजादे आहा. तरी तुम्हास साहेब घरिच्या लेकरासारखे जाणिती. तुमचे वाईट करावे असे मनावर कधी धरणार नाहीत. कोणेही गोष्टोचा शक न धरणे तुमचे हजार गुन्हे माफ आहेती’ (ले. ७०८). यावरून शिवाजी महाराज संरक्षणाची इच्छा करणारास निर्हेतुक संरक्षण देत हें उघड आहे. वाई परगण्याचे देशमुखांनाही महाराजांनीं याचनेप्रमाणें अभय दिलें आहे. तेथील प्रसंग मात्र निराळा आहे. तत्कालीन वाई परगण्याचा देशमूख केशवजी पिसाळ हा महाराजांच्या अनुमतीनें वागत असे. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा दत्ताजी हाही महाराजांच्या अनुमतीनें वागत असे. असें असतां त्या परगण्याचे आदिलशाही अधिकारी दत्ताजीच्या भाऊबंदांच्या नादीं लागून दत्ताजीस देशमुखीचें काम करूं देईनात. तेव्हां दत्ताजीनें महाराजांकडे विनंती केली कीं, एक तर आपण वाईच्या अधिकाऱ्यांकडे हेजीब पाठवून माझ्या भाऊबंदांस सहाय्य करून माझ्या देशमुखीच्या कामांत अडथळा न आणण्याबद्दल त्यांचें मन वळवावें किंवा तसें होत नसेल तर मला आपल्या मुलखांत राहून व १०।२० स्वार जवळ बाळगून स्वतःच्या हिमतीवर भाऊबंदांचा नक्षा उतरविण्याची मुभा दिली पाहिजे. महाराजांनीं दत्ताजीस अभय देऊन दोन्ही गोष्टींची तयारी दाखविली. पहिल्या गोष्टीचें विशेष महत्त्व नाहीं. पण दत्ताजीस दुसऱ्या गोष्टीविषयीं कबुली दिली यांत महाराजांचा स्वभाव व्यक्त होत आहे ( ले. १२६३).

१३. मी शिवाजी महाराजांच्या स्वतःच्या पत्रांतून त्यांच्या ठिकाणचे कोणते गुण व्यक्त होतात याचें कांहींसें दिग्दर्शन वर केलें. याच्या पुढची पायरी म्हणजे महाराजांचे तत्कालीन नोकर, महाराजांच्या सत्तेखालची हिंदु-मुसलमान प्रजा, मुसलमानी राज्यांतील

बादशाह किंवा सुलतान आणि हिंदु-मुसलमान प्रजा यांनीं आपसांत किंवा महाराजांस लिहिलेल्या पत्रांतून महाराजांविषयीं कशा प्रकारचे उद्गार काढले आहेत हें पहावयाचें. हें बघण्याचें फल काय मिळालें हें थोडक्यांत पुढें देत आहे.

१४. ज्यावरून शिवाजी महाराजांच्या स्वभावधर्माची माहिती होईल अशी त्यांच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांचीं पत्रें फारशीं उपलब्ध नाहींत. एका पत्रांत ही माहिती मिळूं शकते. पण असें पत्र बहुधा एकच श. १५९२ (इ. १६७०) च्या सुमाराचें आहे. यांत महाराज व निळोपंत मुजुमदार यांमध्यें झालेले ठराव आहेत. मोरोपंत पेशवे मुलुखगिरीचा उद्योग करितात व त्यामुळें महाराज त्यांवर खूष असतात. हें पाहून आपणही मुलुखाची अर्थव्यवस्था पाहण्याचें सोडून देऊन मुलुखगिरी करावी अशी निळोपंतांस ईर्ष्या उत्पन्न झाली. निळोपंतांनीं महाराजांस तशी विनंती केली. महाराजांनीं मुलुखगिरी व वतनीचें काम हीं दोन्ही आपण सारखींच मानतों व तुम्हांसही तुमच्या कामगिरीबद्दल योग्य बक्षीस मिळेल असें सांगून त्यांचें समाधान केलें.

१५. याच पत्रांत निळोपंतांनीं महाराजांस 'आपण खुतूत गैरमाकूल सहसा वर्तणार नाहीं. कारभारामुळें दहा लोकांसीं बरें वाईट बोलावें लागत आहे. एकादियानें लटकेंच कांहीं सांगितलें तरी ते गोष्टींची बरी चौकशी करावी; सांगितल्यावरूनच मनांत गैरमेहेरबानी न धरावी अशी विनंती केली आहे. या विनंतीवरून असें दिसतें कीं, महाराज एखाद्यानें खरें-खोटें सांगितल्यामुळें तेवढ्यावरूनच एखाद्यावर गैरमेहेरबानी करीत असत. त्या गोष्टीविषयीं पुरती पूर्वचौकशी करण्याची खबरदारी घेत नसत. निदान निळोपंतांस तरी तशा प्रकारचा अनुभव आला असावा आणि म्हणूनच त्यांनीं ठरावांत तसें स्पष्ट कलम घातलें आहे (ले. १३२९).

१६. शिवाजी महाराजांच्या अमलाखालच्या लोकांचें महाराजांविषयीं कशा प्रकारचे उद्गार आहेत हें पाहणेंही उद्बोधक झालें असतें. पण तशा प्रकारचीं पत्रेंही उपलब्ध नाहींत. दोन पत्रांतून 'महाराज धर्मपरायण पुण्यउदधि आहेती' अशा प्रकारचे

उद्गार महाराजांविषयीं काढलेले आहेत. पण दोन्ही पत्रांत ज्या ठिकाणीं हे शब्द आले आहेत, तो भाग महाराजांकडे केलेल्या विनंतींतला असल्यामुळें या उद्गारांचें महत्त्व कमी होतें. वृत्तिवान् ब्राह्मणांनीं इतर हिंदु सरदारांना संबोधतांनाही अशा प्रकारचे शब्द वापरले आहेत. उदाहरणार्थ एका पत्रांत नाइकजी राजे खराडे यांस 'महाराज धर्मपरायण देऊब्राह्मणाचे भगत आहा' असें म्हटलें आहे. यावरून या उल्लेखानें महाराजांच्या ठिकाणचा एखादा उत्कट गुण दिसतो असें म्हणतां येत नाहीं. त्या वेळीं सर्वच लोक सामान्यतः धार्मिक प्रवृत्तीचे असल्यामुळें, महाराजही धार्मिक प्रवृत्तीचे असतील (ले. ७१८, १२०९, १६६७).

१७. हिंदू धर्माचे अभिमानी मराठे व इतर लोक हे सोडून देऊन, मुसलमानी अमलाखालचे असे हिंदू लोक व सामान्यतः सर्व मुसलमानी राज्यकर्ते व त्यांची मुसलमान प्रजा यांनीं शिवाजी-महाराजांविषयीं जे उद्गार काढले आहेत त्यांकडे पाहिलें तर त्यांत महाराजांचे उत्तम गुण निदर्शनास येतील असे उद्गार फारसे नाहींत असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. मुसलमानी अमलाखालच्या हिंदूंनीं महाराजांचा उद्योग स्तुत्य म्हणून समजावयास पाहिजे होता. त्या वेळीं धर्माचें प्राबल्य फार असल्यामुळें हिंदू राज्यांत हिंदूंना जास्त सुख होईल, निदान मुसलमानी राज्यांत जसें दुःख भोगावें लागत होतें, तसें दुःख भोगावें लागणार नाहीं हें तरी त्यांस समजावयास पाहिजे होतें. पण ही गोष्ट त्यांस उमगलेली दिसत नाहीं. महाराजांच्या राज्यस्थापनेच्या प्रयत्नास त्यांनीं फित-रत म्हणजे बंडावाच म्हटल्याचें आढळतें. येवढेंच नव्हे तर क्वचित् आपण होऊन आपल्या मनानेंच कित्येकांनीं शिवाजी महाराजांशीं विरोध केलेला आढळतो. उदाहरणार्थ शिवचरित्रप्रदीप पृष्ठ ८४।८५ पहा. यांत महाराजांच्या उद्योगास 'शिवाजीची फितरत' म्हटलें असून, त्यांच्या विरुद्ध लढल्याची हकीकतही या पत्रांतून आहे. मंगळवेढ्याकडील एका पत्रांत शिवाजी महाराजांच्या उपक्रमास शिवाजीची धुंद असें म्हटलें आहे (१३१२). अशा प्रकारचे इत-रत्र जे उल्लेख आहेत, त्यांवरून असें वाटतें कीं, महाराजांच्या उद्यो-

गाविषयीं सामान्य लोकांना यथातथ्य कल्पनाच आलेली नव्हती.

१८. महाराजांच्या मुसलमानी विरोधकांचे मुख्य दोन भाग होते. एक विजापूरकर व दुसरे मुघल. गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीचा व महाराजांचा प्रथम प्रथम संबंध आला नव्हता. महाराजांच्या उत्तर आयुष्यांत जो आला तोही विरोधी नव्हता. पहिल्या दोन सत्ता व महाराज यांचे मात्र बरे–वाईट हर्षामर्षाचे प्रसंग येत होते. यामुळें बादशाही फर्मानें किंवा दुय्यम प्रतीच्या अधिकाऱ्यांनीं लिहिलेले कागद यांमध्यें महाराजांसंबंधीं बरेवाईट उद्‌गार आले असलेच पाहिजेत. पण दुःखाची गोष्ट ही कीं, अशा प्रकारचे उद्‌गार असलेले कागद मूळ स्वरूपांत फारसे उपलब्ध नाहींत. जे आहेत त्यांतही महाराजांस विशेष विशेषणांचा आहेर केलेला दिसत नाहीं. उदाहरणार्थ अफजलखान प्रसंगाचीं २ फर्मानें उपलब्ध आहेत. पैकीं एक अफजलखानाच्या वधापूर्वीं अली आदिलशाहानें शिवाजी महाराजांचा नायनाट करण्याच्या बाबतींत कान्होजी जेध्यास लिहिलेलें आहे. पण त्यांत शिवाजी महाराजांस फक्त 'सिवाए' या एकवचनी नांवानें संबोधिलें असून, कोतह अन्देशी वगैरे सामान्य विशेषणें, ज्यांवरून तो मूर्ख होता एवढेंच ठरेल अशीं लाविलीं आहेत (साधनचिकित्सा पृ. २८७–८८).

१९. याच सुमाराचें म्हणजे अफजलवधानंतर ३ महिन्यांनीं लिहिलेलें एक फर्मान आहे. त्यांत विठोजी हैबतराव सिलिंबकर याच्यातर्फें रोहिडा किल्याचा देसाई सय्यिद अब्दुल्लाह बिन सय्यिद मुहम्मद यानें बादशाहाला विनंती केली आहे. तींत महाराजांस 'सीवा' असा शब्द व 'मलऊन' असें विशेषण लावलें आहे. मलऊन याचा अर्थ शापित, बहिष्कृत, निर्वासित असा आहे. या शब्दावरून महाराजांविषयी विशेष असें सांगितलें जात नाहीं हें उघड आहे (त्रैमा. व. ११ अं. ४; शिचसा खं. ४, ले. ६८८).

२०. याशिवाय मुधोळकर घोरपड्यांचे फर्मानांतही महाराजांचा उल्लेख आला आहे. या फर्मानांतून शिवाजी महाराज व बाजी घोरपडे यांचें युद्ध होऊन बाजी घोरपडे मारला गेल्याचें सांगितलें असून, त्यांत महाराजांविषयीं नुसतें 'राव शिवाजी राजह भोंसलह'

असें म्हटलें आहे. गुणावगुणनिदर्शक एकही विशेषण लावलेलें नाहीं. मुधोळकरांच्या संग्रहांत एकाच प्रकारचीं सहा फर्मानें आहेत. तेव्हां इतरांतही तेंच सांपडणार हें उघड आहे (मुधोळच्या घोरपडे घराण्याचा इतिहास परिशिष्ट अ, ले. १४-१९).विजापूरच्या दुय्यम अधिकाऱ्यांनीही लिहिलेलीं कांहीं पत्रें उपलब्ध आहेत. उदाहरणार्थ अफजलखानानें लिहिलेल्या कांहीं पत्रांत शिवाजी महाराजांचा उल्लेख आहे; पण त्यांतही महाराजांचे गुणावगुण दिग्दर्शित करणारे उद्‌गार नाहींत. सामान्यतः सिवजी किंवा सिवाजी भोसले असेच उल्लेख आहेत (ले. ७८० व ७८२).

२१. महाराजांचे दुसरे मोठे शत्रू म्हणजे मोगल. त्या वेळचा मोगल बादशाह औरंगजेब याचा व महाराजांचा झालेला पत्रव्यवहार मूळ फार्सी रूपांतही आज उपलब्ध आहे. त्या पत्रांतील भाषा फार भारदस्त व अलंकारिक असली तरी त्यांतून महाराजांविषयीं औरंगजेबाची कल्पना काय होती हें अजमावतां येत नाही. या विषयीं एकच उदाहरण सांगतो. या पत्रांतून महाराजांस मुतीअ-उल-इस्लाम म्हणजे मुसलमानी धर्माचे रक्षक असें विशेषण लावलेलें आहे. महाराज अन्यधर्मीयांना त्रास देत नसत, तरी हें विशेषण लावण्याएवढें मुसलमानी धर्मास अनुकूल वर्तन ते करीत असतील असें वाटत नाहीं. तेव्हां अशा प्रकारचीं विशेषणें अर्थवादात्मक म्हणून बाद धरलीं पाहिजेत.दरबारी भाषा कशी असते हें फारतर असल्या विशेषणां-वरून समजून येण्यासारखें आहे(प्रभात मासिक : छत्रपतीशीं दिल्ली-पतीचा पत्रव्यवहार क्र.६,७,८,१०).एकंदरींत औरंगजेबास शिवाजी महाराजांविषयीं काय वाटत होतें हें समजण्यास पत्रांचें साधन जरी नसलें, तरी सामान्यतः महाराज म्हणजे काफिर ही भावना मात्र एका पत्रांत व्यक्त झालेली आहे. हें पत्र म्हणजे औरंगजेबाने महाराजांच्या मृत्यूनंतर २ वर्षांनीं विजापुरी उमराव सर्जेखान यास धाडलेलें फर्मान आहे. यात बादशाहानें सर्जेखानास बादशाही सरदार खान जहान बहादर यास मदत करण्यास सांगितलें आहे. खानजहानला दक्षिणेंत पाठविण्याचें कारण 'काफिरे हरबी' यानें विजापूरकरांचा जो मुलूख घेतला होता तो परत मिळविणें हें

होतें. 'काफिरे हरबी म्हणजे 'लुटारू काफिर' हे शब्द महाराजांस उद्देशून आहेत हें उघड आहे. कारण महाराज जरी या वेळीं हयात नव्हते व संभाजी महाराज गादीवर आले होते, तरी त्यांच्या कर्तबगारीची ओळख लोकांना व्हावयाची होती (फरामीनुस्सलातीन ले. ६० व ६१). औरंगजेबाच्या हाताखालच्या सरदारांपैकीं जयसिंग व त्यांचा गुमास्ता यांचीं दोन तीन पत्रें शिवाजी महाराजांविषयीं एक दोन गोष्टी सांगतात. जयसिंगाचा गुमास्ता उदयराज हा, महाराजांनीं जयसिंगामार्फत औरंगजेबाशीं सल्ला करण्याविषयीं जी वाटाघाट चालविली होती तीसंबंधांत म्हणतो, 'बादशाही सत्तेला शरण जाण्याबद्दल तो उघड बोलत आहे. परंतु त्याचे मनांत काय आहे हें कोण जाणणार ?' या उद्‌गारांचा अभिप्राय असा आहे कीं, महाराज कोणत्या हेतूनें कोणती गोष्ट करीत, हें इतरांना समजणें फार कठीण असे. त्यांचें धोरण अत्यंत गूढ व सामान्य लोकांच्या आकलनशक्तीच्या बाहेरचें असें; ते एखाद्या गोष्टीची बतावणी इतक्या सफाईनें करीत कीं, त्यांच्या बेताचा पत्ता न लागून लोक त्यांच्या जाळ्यांत सांपडत. अशाच प्रकारचा अभिप्राय युरोपियन विशेषतः इंग्रज व्यापाऱ्यांचा असून त्याविषयीं आणखी विवेचन युरोपीयांचे अभिप्राय सांगतांना करूं (ले. ११४५).

२२. जयसिंगानें याच प्रसंगांत एक पत्र औरंगजेबाचा दिवाण जाफरखान यास लिहिलें असून त्यांत 'महाराज अगदीं हीन घराण्यांतील व नीच जातकुळींतील (जयसिंगाच्या मानानें) असल्यामुळें, त्याची मुलगी मी आपल्या जनानखान्यांतही ठेवणार नाहीं; मग मी आपल्या मुलास ती कसची करतों असा अभिप्राय प्रकट केला असून मी त्याची मुलगी करण्याचें जर आमिष दाखविलें, तर तो हीनकुलत्वामुळें माझ्या मुलाशीं लग्न करण्यास तयार होऊन माझ्या जाळ्यांत सांपडेल अशी कल्पना केली आहे. जयसिंगानें महाराजांविषयीं केलेली कल्पना कितपत वास्तविक होती हें, जयसिंगानें सुचविलेली युक्ति प्रत्यक्ष अमलांत आणली गेली नाहीं म्हणून समजण्यास साधन नाहीं. पण महाराज इतके सहज फसले असते असें वाटत नाहीं (ले. ११५२). शिवाजी महाराजांचा उल्लेख

असलेलें व जें कुतुबशाही असण्याची शक्यता आहे असें एक फर्मान आहे. फर्मानांत कुतुबशाहानें बाजी घोरपडे याचा मुलगा मालोजी यास कुतुबशाहीची नोकरी करण्यास येण्याबद्दल विचारलें आहे. असें विचारण्याचें कारण सांगतांना विजापूरच्या बादशाहीचा अधिकार बळकाविणाऱ्या अफगाणास आम्ही व शिवाजी राजे तंबी देणार असल्याचें सांगितलें आहे. या फर्मानांत महाराजांविषयीं 'इज्जत दस्तगाह शिवाजीराजह भोंसलह' असे शब्द वापरले आहेत. या शब्दांवरूनही महाराजांविषयीं विशेष असें कांहीं समजत नाही हें उघड आहे (भा. इ. सं. मं. त्रै. व. ११, अं. ३). दुसऱ्या एका ठिकाणीं शिवाजी महाराजांचा उल्लेख आला आहे. हा उल्लेख हिंदुस्थानांतल्या कोणीही मुसलमान बादशाहानें केलेला नाहीं. तो इराणच्या बादशहाचा आहे. हें पत्र इराणचा बादशाह सुलैमान सफ्वी यानें औरंगजेबास श. १५९० च्या सुमारास लिहिलें आहे. यांत औरंगजेबास नीट वागण्याबद्दल समज देण्यांत आली आहे. ती देतांना त्यानें महाराजांच्या उद्योगाचा उल्लेख केला आहे. त्यांत तो महाराजांना 'सीवा नाम काफिर' व 'बंडखोरांचा मुख्य' असें म्हणत आहे. या पत्राला औरंगजेबानें घातलेलें उत्तरही प्रसिद्ध आहे. त्यांत औरंगजेबानें महाराजांच्या उद्योगाची क्षुद्रता वर्णन केली आहे. महाराजांचा उल्लेख केवळ सीवा येवढाच केला आहे (इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमिशन प्रोसिडिंग्ज ऑफ मीटिंग्ज व्हाल्यूम २, पृ. ९ व १४).

२३. वरील एकत्रित केलेल्या उल्लेखांवरून वाचकांस दिसून येईल कीं, उपलब्ध मराठी व फार्सी पत्रें शिवाजी महाराजांच्या गुणवर्णनाच्या बाबतींत विशेष मदत करूं शकत नाहींत. खरें बोलावयाचें तर गेल्या ५०।६० वर्षांत अनेक ऐतिहासिक कागदपत्रें व पुस्तकें जरी प्रसिद्ध झालीं आहेत, तरी फार्सी कागदपत्रें–विशेषतः शिवकालीन–प्रसिद्ध करण्याची कोणी खटपट केल्याचें दिसत नाहीं. पेशवाईत फार्सीची अतिशय गरज लागत असल्यानें महाराष्ट्रांत फार्सी जाणणारे होते. पण पेशवाई बुडाल्यावर फार्सीची गरज न राहिल्यामुळें, महाराष्ट्रियांनीं फार्सी शिकणें सोडून दिलें

इतिहाससंशोधनास सुरवात होऊन कित्येक वर्षें झालीं; पण प्रख्यात संशोधकांपैकीं कोणीही फार्सीकडे लक्ष देऊन त्या भाषेंतील कागदपत्र प्रसिद्ध करण्याची विशेष आस्था दाखविली नाहीं हें मात्र आश्चर्य आहे. सारांश, फार्सी अस्सल कागदपत्रें शिवाजी महाराजांच्या गुणदोषांविषयीं महत्त्वाची माहिती देत नसलीं, तरी तत्कालीन मुसलमान ग्रंथकारांचे ग्रंथ बारकाईनें चाळून पाहिल्यास कांहीं माहिती मिळण्याचा संभव आहे.

## ९. शिवाजी महाराज व युरोपीय व्यापारी

१. शिवकालांत हिंदुस्थानांत मुख्यतः पोर्तुगीज, इंग्रज, डच व फ्रेंच हे युरोपीय लोक व्यापारासाठीं आले होते. यांपैकीं पोर्तुगीज लोकांनीं कोकणांतील कांहीं प्रदेश हस्तगत करून तेथें आपलें राज्यही प्रस्थापित केलें होतें. डच व इंग्रज हे पोर्तुगीजांच्या मानानें उशिरा हिंदुस्थानांत आल्यामुळें त्यांनीं अजून प्रदेश हस्तगत केला नव्हता. निरनिराळ्या ठिकाणीं वखारी घालून मुख्यतः आपल्या व्यापाराचा जम बसविणें व तदनुषंगानें प्रदेश हस्तगत करून ख्रिस्ती धर्माचा प्रसार सहज झाल्यास करणें हे दोन हेतू मनांत धरून ते वागत होते. महाराजांच्या कारकिर्दीच्या अखेरीस या दोघांनींही पश्चिम किनाऱ्यावर आपली सत्ता थोड्याबहुत अंशानें प्रस्थापित केली. या युरोपीय लोकांमध्यें चौकसपणा, आधिभौतिक ऐश्वर्याची आकांक्षा, अनेकांनीं एकत्र मिळून काम करणें, शिस्त वगैरे गुणांचा विकास नुकताच होऊं लागला होता. यामुळे त्यांच्यापैकीं इकडे आलेल्या लोकांनीं अनेक बाबींवर आपले अभिप्राय नमूद केले आहेत. त्यांतूनही शिवाजी महाराजांचा उदय व त्यांची दक्षिणेंत व्यापाराचें बस्तान बसविण्याची खटपट या गोष्टी एकाच वेळीं होत असल्यानें महाराज व त्यांचे नोकर आणि हे युरोपीय लोक यांच्या गांठी पडून अनेक वेळां हर्षामर्षाचे प्रसंग घडून आले. या प्रसंगांच्या पत्रव्यवहारांत या लोकांनीं इकडील लोक, महाराज, त्यांचे नोकर, तसेंच एकंदरींत मराठे लोक इत्यादींविषयीं बरे-वाईट

अभिप्राय प्रकट करून ठेविले आहेत. हे अभिप्राय सर्वस्वी प्रामाणिक आहेत असें म्हणतां येणार नाहीं. कारण महाराजांच्या एखाद्या कृतीनें त्यांच्या हितसंबंधांत व्यत्यय आला किंवा त्यांच्या हितसंबंधांचें चांगलें रक्षण झालें म्हणजे त्यांनीं महाराजांविषयीं पूर्वग्रहदूषित होऊन प्रतिकूल अनुकूल अभिप्राय प्रकट करावे हें साहजिक होय. तेव्हां अशा अभिप्रायांतून पूर्वग्रहाचा भाग वजा केला तरच महाराजांविषयीं प्रामाणिक मतें आपणांस पहावयास मिळतील. म्हणून तसें करण्याचा आपण येथें यत्न करूं.

२. पण हे अभिप्राय समजून घेण्यापूर्वी येथील तत्कालीन परिस्थितीची थोडीशी कल्पना आल्यास तिचा अभिप्रायांचें मर्म कळण्यास अतिशय उपयोग होईल. तेव्हां प्रथम तिचें आकलन करून घेऊं या.

३. युरोप खंडांतून ज्या वेळीं पोर्तुगीज, इंग्रज, फ्रेंच, डच, वगैरे व्यापारी येथें आले, त्या वेळीं त्यांची हिंदुस्थानाविषयीं अशी कल्पना असावी कीं, हिंदुस्थान सर्व तऱ्हेनें संपन्न देश असून तेथें सुव्यवस्थित पद्धतीनें राज्य चाललें असल्यामुळें आपणांस राजकारणांत लक्ष घालावें न लागतां बिनधोकपणें व्यापार चालवितां येईल व हिंदुस्थानांतील राजकारणांत लक्ष घालणेंही चांगलें नव्हे. या धोरणानुरूप प्रथम प्रथम हे व्यापारी निरनिराळीं मसाल्याचीं द्रव्यें, जाड कापड, सुपारी, नारळ वगैरे जिन्नस येथून नेत. युरोपांत त्या वेळीं या वस्तू मिळत नसल्यामुळें तेथें त्यांचा खप चांगला होऊन व्यापाऱ्यांना पुष्कळ फायदा उरे. या उलट हे व्यापारी युरोपांतून निरनिराळे धातू, काचेचे जिन्नस, यांत्रिक सामान (प्राथमिक स्वरूपांतील) वगैरे वस्तू या देशांत विक्रीकरितां आणीत. युरोप खंडांत याच्या अगोदर कांहीं वर्षें नवीन युगास सुरुवात होऊन लोकांचें आधिभौतिक शास्त्रांच्या अध्ययनाकडे लक्ष लागूं लागलें होतें. त्याचा परिणाम असा झाला कीं, हस्तकौशल्याच्या बाबतींत हिंदुस्थान त्या वेळीं जरी युरोप खंडाच्या पुष्कळ पुढें होता तरी आधिभौतिक शास्त्रांचा अभ्यास येथें बंद झाल्यामुळें त्या बाबतींत हिंदुस्थान युरोपच्या मागें राहूं लागला आणि या शास्त्रांचा उपयोग करून घेऊन व्यवहारोपयोगी व युद्धो-

पयोगी अनेक वस्तूंच्या बाबतींत येथील निरनिराळ्या ठिकाणचे राज्यकर्ते व लोक युरोपाकडे पाहूं लागले.

४. या काळांत युरोपीय व्यापाऱ्यांप्रमाणें अरब, आर्मिनियन हबशी, तुर्की वगैरे लोकही व्यापारासाठीं येत व फार पूर्वींपासून येत होते. पण या दोन प्रकारच्या व्यापाऱ्यांमध्यें महत्त्वाचे फरक होते. एक तर हे व्यापारी युरोपीय व्यापाऱ्यांप्रमाणें सुधारलेले नव्हते. यामुळें त्यांचा व्यापार युरोपीयांप्रमाणें जोरावत नसे; दुसरें असें कीं, या वेळीं बहुतेक सर्व हिंदुस्थान मुसलमानी राज्यकर्त्यांच्या ताब्यांत असल्यानें, तसेंच हे व्यापारी धर्मानें मुसलमान असल्यानें व स्वधर्मीयांस जवळ करण्याची प्रवृत्ति सर्वत्र जारी असल्यानें अरब, तुर्क, हबशी, वगैरे व्यापारी ताबडतोब राजकारणांत शिरत. राजकारणांत शिरल्यावर कधीं ते सेनापति, मुख्य प्रधान बनण्यापर्यंत मजल जाई. तर कधीं त्यांमधील कांहीं धाडशी लोक स्वतंत्र राज्येंही स्थापीत. खलफ हसन बसरी, महमूद गावान, मीर युम्ला, युसुफ आदिलशाह, कुली कुत्बशाह वगैरे पुरुषांचीं उदाहरणें वरील विधानांस साक्ष देत आहेत. शिवाय युरोपीय व्यापाऱ्यांप्रमाणें चोकसपणा, सामायिक भांडवलानें व्यापार करणें, वगैरे गुणही त्यांच्या ठिकाणीं नव्हते. यामुळें त्यांना व्यापारी म्हणून फार महत्त्व कधींच आलें नाहीं.

५. युरोपीय व्यापारी इतके साधे नव्हते. ते या देशांतील मोठमोठ्या शहरांशीं व्यापारी संबंध ठेवून तेथें वखारी घालणें हा तर उद्योग करीतच; परंतु तन्निमित्तानें अनेक ठिकाणीं प्रवास करीत व व्यापाराशीं संबंध नसलेली, पण देशस्थितीची उत्तम प्रकारें जाणीव करून देणारी अशी अनेकविध माहिती जमवीत व प्रकाशीत. या माहितीनें त्यांना हिंदुस्थानच्या अंतर्गत स्थितीची जसजशी जास्त जाणीव होऊं लागली, तसतसे त्यांचे हेतू वाढूं लागले. त्यांना वाटूं लागलें कीं, या देशांत एकसारख्या लढाया चालत असूनही उत्तम तऱ्हेचे युद्धोपयोगी सामान तयार करण्याची कोणतीच सत्ता प्रयत्न

करीत नाहीं. तेव्हां आपण जर अशा प्रकारचें सामान विकूं लागलों तर आपल्या मालास पुष्कळ मागणी येऊन आपणांस खूप फायदा उरेल. म्हणून त्यांनीं इतर मालाबरोबर तोफा, बंदुका, दारू, गोळे या वस्तूंची विक्री करण्यास सुरवात केली. यायोगें त्यांना इतका फायदा राहूं लागला कीं, कंपन्या तर श्रीमंत झाल्याच; पण कंपन्यांचे निरनिराळे नोकरही खाजगी व्यापार करून गबर झाले. युद्धोपयोगी सामान विकतांना युरोपियन व्यापारी त्यांचा प्रत्यक्ष उपयोग कसा होतो तें करून दाखवीत. यामुळें येथील सत्ताधाऱ्यांस त्यांचा माल आवडे व तो ते विकतही घेत. पण हीच गोष्ट त्यांना त्रास होण्यास व येथील लोकांशीं त्यांचे शत्रुमित्रत्वाचे संबंध येण्यास कारणीभूत होऊ लागली. युद्धें चालू असतां ज्या बाजूच्या लोकांना हे व्यापारी लढाईचें सामान पुरवीत त्या बाजूच्या विरुद्ध पक्षाचे लोक संधि सापडतांच या युरोपियन व्यापाऱ्यांस शासन करण्यास चुकत नसत. महाराज पन्हाळ्याच्या वेढ्यांत अडकले असतां इंग्रज व्यापाऱ्यांनी आदिलशाही सैन्यांत आपल्या युद्धोपयोगी मालाचे प्रात्यक्षिक करून तो खपविला. याबद्दल महाराजांस राग आला. त्यांनीं सवड मिळतांच कित्येक इंग्रजांना कैद केलें आणि त्यांची राजापूर येथील वखार, तीवर धाड घालून लुटली व सपशेल खणून काढली. वखार लुटल्याबद्दल इंग्रजांना राग आला व लुटीची भरपाई करण्याबद्दल त्यांनीं महाराजांशीं सतत १५।१६ वर्षें वाटाघाट करून झालेलें नुकसान अंशतः भरून घेतलें.

६. इंग्रज व्यापाऱ्यांनीं अशा रीतीनें युद्धोपयोगी सामान विकणें योग्य नव्हे अशी समजूत कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची होती व या उपद्व्यापांबद्दल त्यांनीं कंपनीच्या खालच्या नोकरांस दोष दिल्याचेंही आढळतें (ले. ८७४). पण कंपनीच्या येथील नोकरांस हिंदुस्थानची माहिती जास्त असल्यामुळें ते एवढेंच करून स्वस्थ बसत नसत. येथील सत्तेकडून या युरोपीय व्यापाऱ्यांचे एखादें गलबत धरलें गेलें किंवा एखादी वखार लुटली गेली किंवा अशाच तऱ्हेचा दुसरा एखादा त्रास झाला तर त्याचा वचपा हे लोक त्या सत्तेचीं गलबतें पकडणें व इतर गोष्टींनीं काढीत. यामुळेंही येथील

सत्तांशीं या व्यापाऱ्यांचे शत्रुमित्रत्वाचे संबंध येऊं लागले. पण एवढ्यावरच या व्यापाऱ्यांचा आडदांडपणा थांबला नाहीं. हे लोक येथील राजकारणांत पडून एका सत्तेस दुसरीविरुद्ध लढण्यास उत्तेजन देत. निरनिराळ्या लोकांस एकाच वेळीं मदतीची आश्वासनें देत. एकास मदतीचें अभिवचन देऊन दुसऱ्यास प्रत्यक्ष मदत करीत. दोघांनाही कबूल करून कोणालाच मदत करीत नसत किंवा तटस्थ राहाण्याचा बहाणा करून गुप्तपणें एका पक्षास मदत करीत. या वागणुकीनेंही येथील सत्ताधारी व हे व्यापारी यांमध्यें हर्षामर्षांचे प्रसंग येऊं लागले. या सर्व आडदांडपणावर ताण म्हणजे येथील अंदाधुंदीचा फायदा घेऊन संधि सांपडताच कांहीं प्रदेश बळकावून तेथें हे आपलें राज्यच स्थापीत.

७. पोर्तुगीज हे इतर युरोपीय व्यापाऱ्यांच्या अगोदर आल्यामुळें त्यांनीं या बाबतींत आघाडी मारून महाराजांचे उदयाच्या अगोदरच गोवें व त्याच्या भोंवतालचा प्रदेश यावर आपला अमल बसविला. इंग्रज, डच व फ्रेंच हे पोर्तुगीजांच्या मागाहून पुष्कळ वर्षांनीं येथें आले. पण त्यांपैकीं प्रत्येकानें पोर्तुगीजांचा कित्ता गिरवून महाराजांच्या मृत्यूच्या सुमारास स्वतःकरितां एक एक छोटेंसें राज्यच येथें निर्माण केलें. या आपल्या राज्यांतील लोकांवर हे व्यापारी जर न्यायानें राज्य करते तर इतर लोकांना फारसें वाईट वाटलें नसतें. पण हे व्यापारी आपल्या राज्यांतील लोकांवर आपला धर्म, संस्कृति, भाषा, इत्यादि गोष्टी लादण्याचा प्रयत्न करीत. पोर्तुगीज लोक या बाबतींत पुढारलेले होते. यांच्या वरील गोष्टीचा प्रचार करण्याच्या तऱ्हा अनेक असत. एकाद्या घरांतील कर्ता मनुष्य मेला म्हणजे त्याच्या मुलाबाळांना ते सक्तीनें जेसुइट शाळांतून डांबून टाकीत व त्यांस परत आपल्या माणसांत जाऊं देत नसत. एवढेंच नव्हे तर त्यांना सक्तीनें ख्रिस्ती धर्माची दीक्षा देत (ले.१०३५, १७९८, १९१०). एकदां तर गोव्याच्या व्हाइसरायानें स्वधर्मीयांव्यतिरिक्त इतरांना हद्दपारीचाच हुकूम दिला होता (ले. ११८६). कधीं कधीं या धार्मिक जुलमाची पराकाष्ठा होऊन राजकारण बिघडण्याचा प्रसंग येई. अशा वेळीं राजकीय

अधिकारी गाद्रयांच्या विरुद्ध जात. इंग्रज व डच व्यापारी आपल्या अमलाखालच्या लोकांवर असा उघड जुलूम करीत नसत. त्यांच्या मनांत मात्र स्वधर्मप्रसार, स्वभाषाप्रसार, स्ववस्तुप्रसार या गोष्टी करण्याची इच्छा असे व तशा प्रकारच्या आज्ञाही त्यांस वरून येत. परंतु हे लोक आचरण करण्याच्या कामांत कुशल असल्यानें आपले बेत जास्त सफाईनें अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत (ले. ९३२, १२२४, १५८१, १६०३). या योगानेंही या परकी लोकांचीं व येथील सत्ताधाऱ्यांचीं भांडणें होत.

८. सारांश काय कीं, सामान्यतः सर्व युरोपियन व्यापाऱ्याविषयीं येथील मराठे लोकांचें—अर्थात् महाराज व त्यांचे अनुयायी यांचेंही—बरें मत नव्हतें; येवढेंच नव्हे तर या लोकांचे पाय येथें जर स्थिर झाले तर हे येथील प्रदेश हस्तगत करून राजे बनल्याशिवाय राहणार नाहींत अशी तत्कालीन मराठी मुत्सद्यांची कल्पना झाली होती. ही कल्पना शिवाजी महाराजांचे तालमींत वाढलेले व त्यांच्या मागून कित्येक वर्षें कार्य करून दाखविणारे रामचंद्रपंत अमात्य यांनीं आपल्या आज्ञापत्रांत सूत्ररूपानें गोवून ठेवली असून ती त्यांच्याच शब्दांत येथें मांडतों. "तसेच दर्यावर्दी साहुकार यासही बंदरोबंदरी कौल पाठवून अमदरफ्ती करावी; साहुकारामध्ये फिरंगी व इंग्रज व वलंदेज व फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात. परंतु ते वरकड सावकारांसारखे नव्हत. यांचे खावंद प्रत्येक राज्यच करीत आहेत, त्यांचे हुकुमाने त्यांचे होतसाते हे लोक या प्रांती साहुकारीला येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाही असें काय घडो पाहते ? तथापि टोपीकरांस या प्रांती प्रवेश करावा, राज्य वाढवावे, स्वमते प्रतिष्ठावी, हा पूर्णाभिमान. तदनुरूप स्थळोस्थळी कृतकार्यही जाले आहेत. त्यास ही हट्टी जात, हातास आले स्थळ मेल्यानेही सोडावयाचे नव्हत. यांची अमदरफ्ती आले गेले इतकीच असो द्यावी. त्यास केवळ नेहमी जागा देऊ नये. जंजिऱ्यासमीप तों या लोकांचे जाणे, सहसा होऊ देऊ नये. कदाचित वखारीस जागा देणे जाली तर खाडीचे मोबारी समुद्रतीरी न द्यावी. तसे ठिकाणी जागा दिल्याने

जोपर्यंत आपले मर्यादेने आहेत तो आहेत, नाही ते समयी आरमार, तोफा, दारूगोळी हेच त्यांचे बळ, आरमार पाठीशी देऊन त्याचे बळे या बंदरी नूतन क़िल्लाच निर्माण करणार. तेव्हा इतके स्थळ राज्यातून गेले. याकरिता जागा देणेच तर लांब खाडी, गाव, दोन गावे राजापुरासारखी असेल तेथे फ़रासीसास जागा दिला होता त्या न्याये दोन चार नामांकित थोर शहरे असतील त्यामध्ये जागा द्यावा. तो असा की, नीच जागा, शहराचे आवारी, शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारी घालाव्या.त्यास इमारतीचे घर बांधो देऊ नये. या प्रकारे राहिले तर बरे; नाही तर याविणे प्रयोजन नाही. आले गेले असून त्यांचे वाटेस आपण न जावे, आपले वाटेस त्यानी न जावे इतकेच पुरे.

९. हा अभिप्राय किती अनुभवानें भरलेला व सार्थ असा आहे ? महाराजांचाही एकंदर युरोपियांविषयीं असाच अभिप्राय असावा. कारण महाराजांनीं त्यांजशीं जें वर्तन केलें आहे तें या अभिप्रायाशीं जुळणारें असेंच दिसतें. यामुळें चिडून जाऊन या युरोपीय व्यापाऱ्यांनीं महाराजांविषयीं चोर, दरोडेखोर, लुच्चा, लबाड, वगैरे शेलकीं विशेषणें लावलीं आहेत. तेव्हां असल्या विशेषणांना महत्त्व नाहीं हें उघड आहे.

१०. आतां महाराजांचा स्थिति कशी होती हें पाहूं. महाराजांविषयीं प्रथमच एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, त्यांना विजापूरची आदिलशाही व दिल्लीचे मुघल यांशीं झगडत राहून स्वतःचें राज्य स्थापावयाचें होतें. महाराज एका जहागीरदाराचे मुलगे असल्यामुळें त्यांच्या हाताखालीं थोडासा प्रदेश होता हें खरें; पण त्या योगानें त्यांना राज्यस्थापण्याच्या कामांत विशेष सुलभता आली असें मुळींच नाहीं. त्यांनीं राज्य उभारण्याचा हेतू मनांत धरला तेव्हांचें त्यांचें भांडवल म्हणजे धाडस, साहस, बुद्धिमत्ता वगैरे मानसिक गुण, ४००।५०० सैनिक व पांच पंचवीस हजार रुपये येवढेंच असावें. अर्थात् त्यांना राज्य स्थापण्यासाठीं सैन्य उभारावयाचें व त्यासाठीं पैसेही जमवावयाचें होते. यामुळें त्यांस वारंवार शत्रुप्रदेशांत जाऊन लूट करावी लागे. अशी लुटालूट

करतांना क्वचित् युरोपियन व्यापाऱ्यांच्या वखारींवरही धाड येई. उदाहरणार्थ, इंग्रजांच्या राजापूर, अथणी, हुबळी येथील वखारी लुटल्या गेल्या होत्या. पण त्या लुटतांना इग्रजांनीं कांहीं अपराध केले असावेत अशी राजापूरच्या वखारीची लूट झाल्याची जी हकीकत आहे तीवरून संशय येतो. तेव्हां अशा स्थितींत युरोपीयांनीं महाराजांना नावें ठेवलीं तर ती कितपत सुयुक्त हा प्रश्न आहे.

११. दुसरी गोष्ट अशी कीं, महाराजांना वर सांगितलेल्या दोन शाह्यांशीं व सावंत वगैरे इतर दुय्यम राजांशीं एकसारखें झगडावें लागे. यामुळें सैन्याच्या एकसारख्या व जलद हालचाली कराव्या लागत. यामध्यें व्यापाराला धोका येई. यामुळेंही व्यापाऱ्यांनीं चिडून महाराजांना दूषणें दिलीं आहेत. पण त्याला महाराज काय करणार? आपली सत्ता स्थापन करीत असतां कोणासही अशा गोष्टी कराव्या लागतातच. शिवाय सैन्याच्या हालचाली व युद्धें यामुळें महाराजांच्या अमलाखालचे व्यापारी व प्रजा यांचेंहि नुकसान होत असलेंच पाहिजे. पण मराठी व इंग्रजी दोन्ही पत्रांवरून महाराज आपल्या अमलाखालच्या प्रजेची उत्तम काळजी घेत असें दिसून येतें. महाराजांनीं अनेक ठिकाणीं लूट, जाळपोळ, कत्तल वगैरे कृत्यें केलीं. पण त्यांपैकीं एकही कृत्य त्यांनीं आपल्याच मुलखांत केल्याचें नमूद नाहीं. शिवाय महाराज ज्या वाईट गोष्टी करीत असा युरोपीयांचा आरोप त्याच गोष्टी मुघल, आदिलशाही किंवा कुत्बशाही, सीदी वगैरे लोक करीत. तेव्हां एकट्या महाराजांना दोष देण्यांत अर्थ काय? ज्या वेळीं हे युरोपीय लोक विकारवश न होतां, सारासार विचार करीत, तेव्हां त्यांच्या तोंडूनही मुसलमानांच्या शेजारापेक्षा शिवाजीचा शेजार अधिक बरा वाटतो, अशासारखे उद्‌गार निघालेले आहेत (ले. १२९५).

१२. या बाबतींत तिसरी एक गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे. हे व्यापारी युद्धोपयोगी सामानाचा व्यापार करीत असल्यामुळें तो चालूं देणें म्हणजे आपल्या शत्रूंस युद्धसामग्री मिळूं देणेंच होय. तिचा उपयोग आपल्याच विरुद्ध होणार आहे हें स्पष्ट दिसत असतां कोणता शहाणा स्वराज्याकांक्षी मनुष्य असा व्यापार चालूं

देईल ? अथवा जो पुरुष असा व्यापार चालू देईल त्यास शहाणा तरी कसें म्हणावें ? जी गोष्ट युद्धोपयोगी सामानाची तीच गोष्ट थोड्या फार फरकानें साध्या सामानाची. इंग्रज व्यापाऱ्यांनीं अथणी, हुबळी व इतर विजापूरच्या मुलखांतील ठिकाणीं वखारी घातल्या होत्या, त्या वखारींत माल आणण्याचा किंवा तीमधून माल बाहेर नेण्याचा रस्ता महाराजांच्या मुलखांतून होता. महाराजांना विजापूरच्या राज्यावर सत्ता स्थापना करावयाची होती. ती करीत असतांना व विशेषत: दोघांमध्यें वैर सुरू असतां व्यापाऱ्यांना आपला व्यापार सुरळीत चालवूं देणें म्हणजे आपण आपल्या शत्रूंनाच मदत करण्यासारखें होतें. तेव्हां अशा वेळीं महाराजांनीं या व्यापाऱ्यांचा व्यापार चालूं न दिला आणि व्यापाऱ्यांनीं महाराजांना व्यापाराचा शत्रु, विध्वंसक, लुटारू, इत्यादि विशेषणांनीं संबोधलें तर त्यास महत्त्व कितपत द्यावयाचें ?

१३. महाराजांचें व्यापाराविषयीचें धोरण काय होतें हें त्यांनीं आपल्याच राज्यांतील स्वकीय व्यापाऱ्यांशीं कसें वर्तन केलें यावरून ठरवावयास पाहिजे. या बाबतींत युरोपीय व्यापाऱ्यांचे पुढील उद्गार ध्यानांत घेण्यासारखे आहेत. 'शिवाजी आपल्या स्वत:च्या मुलखांत मात्र आपल्याला नांव ठेवण्यास जागा नाहीं अशा तऱ्हेनें व्यापारास यथोचित उत्तेजन देतो' (ले. १७३८). 'आपल्याच राज्यांत तो आमची लूट करील अशी शंका घेववत नाहीं' (१९०७). या उद्गारांतच महाराजांचें व्यापाराविषयींचें धोरण प्रतिबिंबित झालें आहे असें मला वाटतें.

१४. तत्कालीन युरोपीय व्यापारी व महाराज यांची परिस्थिति कशी होती एतद्विषयी वरीलप्रमाणें थोडेसें दिग्दर्शन केल्यानंतर आतां अभिप्रायांकडे वळूं. हे अभिप्राय पत्रव्यवहाररूपी समुद्रांतून घुसळून बाहेर काढले असल्यानें, यांत चौदा रत्नांप्रमाणेंच कोणताही विशेष क्रम आढळणार नाहीं. तसेंच इंद्रधनुष्यांतील रंगांपैकीं एक कोठें संपतो व दुसरा कोठें सुरू होतो हें जसें निश्चयानें सांगतां येत नाहीं, तद्वत येथेंही एका गुणावगुणाची मर्यादा कोठें संपते व दुसरा कोठें सुरू होतो हें नीट सांगतां यावयाचें नाहीं किंवा महा-

राजांविषयींच्या एखाद्या अभिप्रायानें एखादा विशिष्ट गुण जरी उत्कटपणें प्रत्ययास येत असला तरी त्यांत इतर गुणावगुणांचें प्रतिबिंब अजिबात नसेलच असें म्हणवत नाहीं. तसेंच मला एखाद्या अभिप्रायांत जो गुणावगुण दिसेल तोच इतरांनाही दिसेल असेंही गृहीत धरण्याचें कारण नाहीं. 'पिंडे पिंडे मतिर्भिन्ना' या न्यायानें दुसऱ्या एखाद्यास निराळेच गुणावगुण दिसतील. तेव्हां वरील दृष्टीनेंच पुढील विवेचन वाचावें येवढें सुचवून आतां नमुन्यादाखल कांहीं अभिप्राय येथें उद्धृत करतों.

१५. महाराजांनीं सुरतेवर श. १५८५ मध्यें जो पहिला हल्ला केला, त्यांत तेथील लोकांकडून पैसे मिळविण्यासाठीं फटके मारणें, धमक्या, शिरच्छेद, इत्यादि अनेक निर्दयपणाचे प्रकार घडले असें सामान्य विधान करून त्याचें उदाहरण म्हणून एका दिवसांत महाराजांनीं सव्वीस हात कापविल्याचें स्मिथ नांवाच्या एका प्रमुख वखारवाल्यानें प्रत्यक्ष पाहिलें अशी माहिती दिली आहे. व हीवरून महाराज अतिशय निर्दय होते असें मत परकीयांनीं प्रदर्शित केलें आहे ( ले. ९७३, ९७४, ९७५, ९७७ ). हा आरोप कितपत खरा मानावयाचा हा प्रश्न आहे. या बाबतींत एक गोष्ट लक्षांत आणावयाची ती ही कीं, त्या वेळीं हातपाय तोडणें, डोळे काढणें, अशा प्रकारच्या शिक्षा देण्याचा सरसहा प्रचार होता. महाराजांनीं आपल्या ताब्यांतील प्रदेशांत राहणाऱ्या लोकांनाही अशा प्रकारेंच शासन केलेलें रांझें येथील गुजर पाटलाच्या उदाहरणावरून दिसून येतें. शिवाय सुरत त्या वेळीं मुघलांच्या म्हणजे शत्रूच्या ताब्यांत होती. हीही गोष्ट विचारांत घेतली पाहिजे. मुघल व विजापूरकर यांनीं महाराजांच्या मुलखावर हल्ले केले त्या वेळीं असलीं कृत्यें होत नव्हतीं असें कां या परकीयांचें मत होतें ? नुसतें मुघली सैन्य इकडून तिकडे गेलें तरीही मुलूख उजाड होई असे उल्लेख आहेत (ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड १, ले. ७५).महाराज तर शत्रूचा मुलूख लुटण्यासाठींच गेले होते. त्यांनीं आपल्या सैन्यास शहर लुटण्याचा हुकूम केला असता तर सैन्याच्या हातून याहूनही-कोठल्याही सैन्याच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें-जास्त अनन्वित कृत्यें

झालीं असतीं. महाराज पकडून आणलेल्या सुरतेच्या व्यापाऱ्यांना प्रथम एक विशिष्ट रक्कम मागत व तशी ती देण्याचें नाकारल्यास त्यासच हातपाय तोडण्यासारखी शिक्षा करीत. त्या वेळीं जीविताला आजच्या इतकी किंमतच नसे. मारामाऱ्या व त्यांत मरण किंवा हातपाय तुटणें ही गोष्ट लोकांस रोजच्या व्यवहारांतील वाटे. म्हणून महाराजांना या बाबतींत दोष देण्यांत अर्थ नाहीं.

१६. महाराजांचें धार्मिक बाबतींत सहिष्णुतेचें वर्तन असावें असें दिसतें. त्यांच्या सैन्यांत हिंदूप्रमाणें मुसलमान लोक होते. येवढेच नव्हें तर महत्त्वाच्या अधिकारांच्या जागाहि मुसलमानांकडे होत्या असें दर्यासारंग दौलतखान किंवा इब्राहीमखान यांच्या हकीकतीवरून म्हणतां येतें.पण महाराजांनीं व्यंकोजीस पत्र लिहिलें आहे त्यांत मी तर दुष्ट तुर्कांना (म्लेंच्छांना) मारावयास निघालों आहे आणि तुमचे सन्यांत तुर्क आहेत तेव्हां तुमचा जय कसा होतो असा स्वतःच्या पराक्रमांना उद्देशून सवाल टाकला आहे. तें कांहींही असलें तरी स्वधर्मीयांचा केवळ हिंदुधर्मी म्हणूनच एखादी सत्ता छळ करीत असेल तर त्या सत्तेच्या बाबतींत ते जशास तसें वर्तन करण्यास सोडीत नसत. येवढेंच काय पण सामान्यतः सर्वच बाबतींत जशास तसें वर्तन करणें हेंच त्यांचें धोरण होतें. श. १५८१ च्या सुमारास गोव्याच्या व्हाइसरायानें स्वधर्मीयांच्या व्यतिरिक्त इतरांना हद्दपारीचा हुकूम केला होता व बारदेशांतील चार पाद्र्यांनीं अशा लोकांना ठार करण्याचा सल्ला दिला होता. महाराजांनीं या सुमारास बारदेशावर स्वारी केली होती. त्यांना ही गोष्ट कळतांच त्यांनीं वरील चार पाद्र्यांना धरून आणून त्यांस हिंदू धर्म स्वीकारण्यास फर्माविलें व तसें करण्याचें नाकारतांच त्यांचा शिरच्छेद करविला. या योगें पोर्तुगीज गव्हर्नर तावडतोब ताळ्यावर आला व त्यानें हद्दपारीचा हुकूम परत घेतला (ले. ११८६). महाराज व पोर्तुगीज यांमध्यें वारंवार भांडणें होण्याचें,पोर्तुगीज मुलखांतील परधर्मीयांचा म्हणजे हिंदूंचा छळ, हें एक कारण होतें असें इंग्रजी पत्रांत नमूद आहे(ले. १७९८).श.१६००(इ. १६७८)च्या सुमारास हातीं लागलेल्या महाराजांच्या कांहीं लोकांना सुरतेच्या

मुसलमानांनीं अतिशय अपमानानें वागविल्यामुळें महाराजांनीं चिडून जाऊन सुरतेचा समूळ नाश करण्याचें ठरविल्याबद्दल एका पत्रांत उल्लेख आहे (ले. २०७३). तेव्हां महाराजांचा सर्वत्र जशास तसें वागण्याचा नेहमीच संप्रदाय होता असें दिसतें. केवळ धार्मिक बाबतींतच नव्हे तर सर्व बाबतींतच महाराज जशास तसें वर्तन करीत असें वाटतें.

१७. पण परकी व्यापाऱ्यांनीं याही पुढें जाऊन महाराजांच्या ठिकाणीं सूडाची भावना होती असें ध्वनित केलें आहे. तेव्हां त्यांचें हें ध्वनित कितपत ग्राह्य धरावयाचें हा प्रश्न उत्पन्न होतो. विशेषतः औरंगजेबानें महाराजांना कपटानें पकडल्यावर महाराज युक्तीनें सुटले असतां ते मुघली मुलखावर सूड घेतील अशी भीति या व्यापाऱ्यांना वाटली व तसें त्यांनीं नमूद केलें. पण महाराजांचें राजकारण भावनाप्रधान नसून विचारप्रधान असल्यामुळें त्यांनीं पुढें तीन वर्षेंपर्यंत मुघली मुलखावर सूड तर नाहींच उगविला; उलट त्या बाबतींत नेमस्तपणाचेंच धोरण स्वीकारलें. महाराजाना राज्यवृद्धीची आकांक्षा होती हें उघडच आहे. तिजबरोबर सूडाची विकारप्रधान वृत्ति जर त्यांच्या ठिकाणीं असती तर राज्य वाढवीत असतांही त्यांच्या हातून ती वृत्ति व्यक्त करणारें एकादें तरी कृत्य झालें असतें. पण त्यांचीं निर्दयपणाचीं किंवा सुडाचीं म्हणून समजलीं जाणारीं सर्व कृत्यें नीट तपासून पाहिलीं तर तीं संरक्षक स्वरूपाचीं किंवा जशास तसें या धोरणास अनुसरून आहेत असेंच दिसतें. त्यावरून त्यांच्या ठिकाणीं सूडाची भावना होती असें मुळींच सिद्ध होणार नाहीं (ले. ११३७, ११४२, २०५५).

१८. महाराजांच्या हेतूंचा त्यांच्या बोलण्यावरून पत्ता लागत नसे, अशी ज्याप्रमाणें जयसिंगाची कल्पना होती त्याचप्रमाणें युरोपीयांचीही होती असें दिसतें. त्यांनीं अनेक ठिकाणीं 'शिवाजी आपले बेत आपल्याच डोक्यांत ठेवतो, त्या बाबतींत दुसऱ्या कोणावर तो विश्वास ठेवीत नाहीं. यामुळें प्रत्यक्ष स्वारीस निघाला तरी तो कोठें जाणार हें, उद्दिष्ट ठिकाणाच्या अगदीं जवळ आल्याखेरीज कोणास समजत नाहीं. ज्या वेळीं तो एखादे ठिकाणीं

छापा घालतो त्या वेळीं इतका अचानक घालतो कीं, त्याची बातमी कोणालाच कळत नाहीं. यामुळें हेरांनीं आणलेल्या बातमीवर कितपत विश्वास ठेवावा हें समजत नाहीं. त्यानें एखादी गोष्ट करण्याचें जाहीर केलें तरी ती तो मनापासून करतो असें मुळींच नसतें. त्यांत निराळाच कांहीं डाव असतो व तो फार दूरवरचा असतो. एखादी मोठी गोष्ट करण्यापूर्वी तो कांहीं तरी हुली उठवितो ' अशा प्रकारचीं मतें कांहीं पत्रांतून नमूद केलीं आहेत. (वरील परिस्थितीमुळें इंग्रजांसारख्या व्यापाऱ्यांना शिवाजीमहाराजांच्या आगमनामुळें स्वतःच्या बचावाची तयारी करावी लागे व ते येऊन जाई तों सावधपणें रहावें लागे. त्यामुळें त्यांना त्रास होई.) या गोष्टीचीं उत्तम उदाहरणें म्हणजे नेताजीचें रुसून मुघलांकडे जाणें व महाराजांचें मरण. या दोन्ही बातम्या इंग्रज व्यापाऱ्यांना प्रथम खऱ्याच वाटल्या नाहींत. त्या महाराजांनीं कांहीं तरी कार्य साधण्यासाठीं उठविल्या होत्या अशीच त्यांनीं समजूत करून घेतली होती. पण ज्या कालीं या बातम्या उठल्या त्या वेळीं वरील दोन्ही गोष्टी प्रत्यक्ष घडल्या होत्या हें आपणांस आतां सांगतां येतें. बाकी एखाद्या मनुष्यानें आपले बेत कोणास न कळू देतां कृतींत आणले तर त्यास नांवें ठेवणें योग्य आहे कीं नाहीं हा प्रश्नच आहे. राजकारणी मनुष्य आपले बेत जर उघड बोलून दाखवूं लागला तर शत्रुपक्षीय लोक त्याचा फायदा घेतल्याशिवाय सोडणार नाहींत. अशा उघडपणानें फायदा होण्याऐवजीं तोटा होण्याचाच संभव जास्त. साध्या व्यवहारांतही आपले बेत बोलून दाखविणारास यश मिळणें कठीण जातें. मग राजकारणाची गोष्ट कशास पाहिजे ? तेव्हां बेत गुप्त ठेवणें हा दोष आहे असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. महाराज हुली उठवीत असत कीं काय याविषयीं निश्चयानें सांगतां येत नाहीं. पण हुली उठतात त्या बहुधा इतरेजनांकडूनच उठतात. आज लोकांमध्यें बातम्यांवर विश्वास ठेवण्याच्या बाबतींत जितकी दक्षता घेतली जाते तितकी त्या वेळच्या अडाणी लोकांत राहणें शक्य नव्हतें. जलद दळणवळणाचीं साधनें नसल्यामुळें लोकांना एखाद्या बातमीची शहानिशा

 

चटकन् करणें शक्य नसे. शिवाय महाराजांच्या सैन्याच्या हाल-चालीही कमालीच्या जलदीनें होत असत. यामुळें महाराजांच्या विषयीं सर्वसामान्य लोकांमध्यें अनेक तऱ्हेच्या अफवा उठत असल्या पाहिजेत. पण अशा अफवांबद्दल महाराजांस जबाबदार धरतां येणार नाहीं.

१९. परकी व्यापाऱ्यांनीं किंवा सत्ताधाऱ्यांनीं सामान्यतः मराठे लोकांविषयीं, विशेषतः शिवाजी महाराजांविषयीं असा एक अभिप्राय प्रकट केला आहे कीं, यांपैकीं कोणालाही आपल्या शब्दांचीं किंमत नसल्यामुळें ते शब्द आपण पाळले पाहिजेत अशी त्यांची भावना नव्हती. यामुळें अनेक वेळां शिवाजीनें किंवा मराठ्यांनीं दिलेलीं वचनें म्हणजे थापेबाजी ठरलेली आहे. शिवाजीनें एखादें वचन दिलें म्हणजे तें तो पाळील कीं नाहीं या विषयीं या लोकांना शंका येत असे. कारण त्यांच्या मतें महाराजांच्या ठिकाणीं शत्रु, मित्र, देव, मनुष्य वगैरे कोणाविषयींच विशेष भावना नसल्यामुळें त्यांच्या हातून दिलेलीं वचनें पाळलीं जातील असा मुळींच भरवंसा नसे. तसेंच महाराज मोठीं वचनें देत व घात करीत. ते बेइमानी होते असेंही त्यांचें मत होतें. अर्थात् महाराजांच्या वचनावर विश्वास ठेवण्यात ते तयार होत नसत व तयार झालेच तर बाह्यात्कारी विश्वास ठेवून अंतस्थ रीतीनें महाराजांनीं दिलेलें वचन मोडल्यास काय करावयाचें याची तरतूद करून ठेवीत असत. तसेंच वचन मोडून विश्वासघात करण्याच्या कामीं त्यांनीं महाराजांची औरंगजेबाशीं तुलना करून दोघांत साम्य असल्याचा निर्वाळा दिला आहे.

२०. या आरोपांचा विचार करतांना एक मुद्दा ध्यानांत आणावयाचा तो हा कीं, हा आरोप स्वार्थमूलक आहे कीं काय ? व तसा तो नसला तरी त्याबाबत महाराजांस दोष देतां येईल कीं काय ? निरनिराळ्या राष्ट्रांचे इतिहास पाहिले तर असें दिसेल कीं, प्रत्येक राष्ट्रांतील मोठमोठ्या कर्तबगार प्रातःस्मरणीय अशा माणसांनींही दिलेलीं वचनें मोडलीं आहेत. याविषयीं मॅकिएव्हेलीनें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, wherefore a prudent ruler ought not to keep faith when by so doing, it would be

against his interest and when the reasons which made him bind himself no longer exist. माझ्या पक्कें स्मरणांत आहे कीं, गार्डिनर किंवा कोणी तरी जगांतील आधुनिक कर्तबगार पुरुषांचीं ओळख करून देण्यापुरतीं चरित्रें लिहिलीं आहेत त्यांत त्यानें मला वाटतें रुझवेल्टचें चरित्र लिहितांना 'A saint cannot succeed in politics असें एक सूचक वाक्य घातलें असून तें अक्षरशः खरें आहे. तेव्हां महाराजांनीं वचनें मोडलींच असतील तर त्यांना दोष कितपत द्यावयाचा ? तसेंच आरोप करणारे लोक तरी वरील आरोपांतून मुक्त होऊं शकतील काय? मग महाराजांना नावें ठेवण्यांत अर्थ काय?

२१. युरोपीय व्यापाऱ्यांनीं महाराज निरनिराळ्या मुघली किंवा विजापुरी सरदारांना लांच देत असें ध्वनित केलें आहे. या लाचेच्या जोरावर महाराजांनीं श. १५९६ मध्यें एक महत्त्वाचा किल्ला शत्रुपक्षाकडून कोणत्याही प्रकारचा प्रतिकार न होतां हस्तगत केला. याच सालीं महाराजांनीं मुघलांचा सेनापति व इतर सरदार यांना पैसा चारला. तसेंच मुघल व विजापूरकर सरदार यांनीं त्यांचे अनेक वेळां पराभव केले असतांही, त्यांचें सामर्थ्य कमी झालें नव्हतें आणि याचें कारण म्हणजे ते नेहमीं करीत तो सुवर्णप्रयोग असें या व्यापाऱ्यांचें मत होतें ( ले. १५५५, १५७४, १६१३ ). पण या आक्षेपास उत्तर देणें अवघड नाहीं. सामदामाचे प्रयोग महाराजांचे वेळीं, त्यांचे अगोदर व फार प्राचीन काळापासून ते तहत आज तागायत सर्वत्र चालू आहेत. ते केवळ हिंदुस्थानांत झाले, इतरत्र झाले नाहींत किंवा होत नाहींत, असें मुळींच नाहीं. निरनिराळ्या परिस्थितींत या लाचींना भेट, नजराणा, खंडणी इत्यादि सोज्वळ नांवें देतात एवढेंच. युरोपीय व्यापाऱ्यांनीं स्वतः अनेक वेळां महाराज किंवा त्यांचे नोकर यांस भेट किंवा नजराणे दिलेले आहेत. विशेषतः राज्याभिषेकाच्या वेळीं इंग्रज व्यापाऱ्यांनीं महाराजांशीं तह घडून येण्यासाठीं चालविलेल्या खटपटीला यश यावें म्हणून निराजी पंडित व भीमजी पंडित आणि इतर अधिकारी यांना कोणास ५०० होन, कोणास १०० होन, कोणास अंगठी वगैरे जिन्नस देण्याचें आमिष कसें दाखविलें

किंवा महाराज दिग्विजयार्थ दक्षिणेंत गेल्यावर, तेथें वेलूरचा वेढा चालवीत असतां, त्या प्रसंगीं त्यांनीं पुष्टिकारक रत्नें, विषावरील उतारे वगैरे जिनसांची मागणी केली असतां आणि त्यांबद्दल महाराज किंमत देण्यास तयार असतांही मद्रासकडील इंग्रज व्यापाऱ्यांनीं या वस्तु तशाच कशा पाठवून दिल्या याचा विचार केला तर माझीं वरील विधानें मान्य होण्यास मुळींच हरकत नाहीं असें वाटतें, सारांश काय कीं, द्रव्यप्रयोग ही रोजच्या व्यवहारांतील गोष्ट असून तीबद्दल एकानें दुसऱ्यास निर्हेतुक दोष द्यावा हें न्यायाचें होणार नाहीं. व्यवहार किंवा राजकारण यांत एकानें दुसऱ्यास भावनेनें व केवळ प्रेम म्हणूनच जर कांहीं वस्तु दिल्या तरच तेथें भेट, नजर, हे शब्द लावणें लावणें योग्य होईल. पण अशा तऱ्हेच्या भेटी किंवा नजरा किती सांपडतील याची वानवाच आहे (ले. ७९१,९५९, १०४४, १०७६, १६३९, १६४२, १६४९, १९३४, १९३७).

२२. महाराजांच्या उद्योगशीलतेविषयीं युरोपीयांनीं अनेक ठिकाणीं उद्गार काढले असून त्यांवरून महाराजांच्या उद्यमप्रियते-विषयीं चांगलीच कल्पना येते. नमुन्यादाखल येथें एक उतारा देतों. शिवाजी मुघली फौजेंप्रमाणें आळशी रहात नाहीं. तो सूर्यप्रकाश असतांनाच गवत वाळवितो असें नसून झोड पावसानें सूर्य आच्छादून गेला असतांही त्याचें काम चालतें. मुघली फौज पावसाळ्याकरतां टेकडीच्या आश्रयाला निघून गेल्यानंतरसुद्धां शिवाजीच्या हालचाली चालूच आहेत (ले. १३१३).

२३. उद्योगाबरोबर त्यांच्या ठिकाणीं विलक्षण चलाखी असल्या-मुळें शत्रूस त्यांच्या हालचालींची पूर्वसूचना मिळवितां येत नसे. याविषयीं हे व्यापारी एके ठिकाणीं म्हणतात –‘ तो अत्यंत चपळ असून कष्ट सहन करतां यावे म्हणून परिश्रम करतो. त्याचें मुख्य मदतनीसही तसेच तयार असल्यामुळें तो अतर्क्य त्वरेनें आपल्या हालचाली करूं शकतो (ले. १०१, १२९७, १८७७). चलाखी-बरोबर धाडस या गुणाची आवश्यकता असते. पुष्कळ वेळां धाडस करूनच जय मिळविता येतो. हाही गुण महाराजांच्या ठिकाणीं असल्याचें नमूद आहे (ले. २०६१). एकाच वेळीं अनेक ठिकाणीं उद्योग

सुरू करून शत्रूस भांबावून सोडणें ही गोष्ट महाराज करीत असत. महाराजांना आदिलशाही, मुघल, कुत्बशाही, पोर्तुगीज, इंग्रज, डच, सीदी वगैरे अनेक शत्रू असतांनाही त्यांनीं या सर्वांना दमविलें व राज्यविस्तार केला. यावरून त्यांच्या ठिकाणीं हें धोरण होतें असें म्हणतां येतें (ले. १७४३).

२४. महाराजांस अनेक ठिकाणीं धोरणी, चतुर वगैरे विशेषणांनीं गौरविलें असलें, तरी पुढील दोन उताऱ्यांत युरोपीयांची महाराजांविषयींची कल्पना सुव्यक्त झाली आहे. ‘ दख्खनची स्थिति कष्टमय असून शिवाजी ( आग्र्याहून) सुटून स्वदेशीं परत आल्यामुळें शांततेची सर्व आशा नष्ट झाली आहे. शिवाजी आपला उद्योग इतक्या चतुराईनें चालवितो कीं, बादशाहाच्या संतापाची मात्रा त्याच्या पुढें न चालतां शेवटीं अपमानानें शिवाजीशीं त्याला नमतें घ्यावें लागलें (ले. ११६२). शिवाजी मोठा प्रबळ राजा असून सामर्थ्यवान् अशा अनेक शत्रूंना न जुमानतां त्यानें सर्व कारभार मोठ्या धोरणानें चालविला आहे...... त्याची प्रजा त्याचे सारखीच मूर्तिपूजक असली तरी तो सर्व धर्मांना नांदूं देतो. ह्या भागांतील अत्यंत धोरणी व राजकारणी पुरूष म्हणून त्याची ख्याती आहे ( ले. १२७९). अशाच प्रकारचा अभिप्राय मुघली सुभेदार बहादुरखान याजशींही महाराजांनीं केलेल्या वर्तनाच्या बाबतींत नमूद आहे (ले. १६७१).

२५. महाराज जबरदस्त पराक्रमी होते ही गोष्ट उदाहरणें देऊन सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं. पण त्यांचा पराक्रम, चपळता, धाडस यांचें वर्णन इंग्रजी कागदपत्रांतून आलें आहे तें मात्र पाहण्यासारखें आहे. याकरितां एका ठिकाणचें वर्णन येथें देतों. हें वर्णन शिवाजीनें दक्षिणदिग्विजयासाठीं केलेल्या स्वारीच्या वेळचें आहे. ‘ स्पेनमध्यें ज्याप्रमाणें सीझर आला, त्यानें पाहिलें आणि जिंकलें, तद्वतच तेथें शिवाजीचा पराक्रम होऊन त्याला अमर्याद संपत्ति मिळाली .... तो हल्ली बंका व पूर (बंकापूर? ) या दोन दुर्गम किल्ल्यांवर हल्ले करीत आहे. जगज्जेत्या अलेक्झांडर इतकाच त्याचा या बाबतींत हातखंडा आहे. कारण

पूर्वी जयसिंगाला दिलेले २३ दुर्गम किल्ले आपल्या पक्षांप्रमाणें चपल स्वारांच्या सहाय्यानें. ... .आठ महिन्यांच्या आंतच त्यानें परत घेतले (ले. २०००). शिवाजी दुसरा सेर्टोरियस किंवा युद्ध-कौशल्यामुळें प्रति हॅानिबाल आहे हें प्रसिद्धच आहे (ले. २०१३).

२६. दुसऱ्या एके ठिकाणीं केलेलें वर्णनही असेंच वाचण्या-सारखें आहे. तें असें– 'विलक्षण धाडसी असा दरोडेखोर म्हणून शिवाजीची इतकी ख्याति झाली आहे कीं, लोकांनीं त्याचें शरीर हवामय असून त्याला पंखही आहेत असें उठविलें आहे. एरवीं तो एकाच वेळीं अनेक ठिकाणीं प्रगट होतो या बातम्या शक्य तरी कशा होतात ? आज तो एके ठिकाणों आहे असें खात्रीलायक सम-जावें, तर एक दोन दिवसांत तो दुसऱ्याच ठिकाणों आहे असें कळतें व लगेच दूरदूर असलेल्या पांचसहा ठिकाणीं एका मागून एक अशा तऱ्हेनें अप्रतिहतपणें लुटालुट जाळपोळ करतांना आढळतो. यामुळें त्याचें नांव सर्वतोमुखी झालें असून त्याला भीमाचें (हर्क्युलिस) सामर्थ्य आहे असें लोक मानतात (ले. ९९६).

२७. पराक्रमी मनुष्य आत्मविश्वासामुळें बहुधा मानी असतो. त्याच्या ठिकाणीं सामान्यत: उदार वागणूकही संभवते. महाराज या नियमास अपवाद नव्हते ही गोष्ट युरोपीयांनीं त्यांच्या आग्ऱ्याच्या प्रसंगाविषयीं जीं पत्रें धाडलीं आहेत आणि 'उत्तम मित्र आणि उदार शत्रु' सारखे जे उद्‌गार काढले आहेत त्यांवरून दिसून येईल (ले. ११२८, ११३६, ११४१, १७८८).

२८. महाराजांच्या युद्धकौशल्याविषयीं युरोपीयांनीं नमूद केलेले अभिप्राय महत्त्वाचे असून त्यामुळें त्यांच्या युद्धपद्धती-विषयीं आपणांस कयास बांधतां येण्यासारखा आहे. श. १५९५ मध्यें सीदीशीं चाललेल्या युद्धाच्या अनुषंगानें पुढील उद्‌गार काढले आहेत 'शिवाजी साधा इसम नसून मोठा चलाख आणि धोरणी योद्धा आहे. तो मोठ्या चिकाटीनें आणि सावधगिरीनें लढतो. तो सरळ तोंड क्वचितच देतो. परंतु सर्व प्रकारच्या युक्त्या योजून असे छापे घालतो कीं त्यांत बरीच माणसें जाया होतात. यामुळें

शिवाजीचें थोडेसें सैन्यही जेथें असतें तेथें सीदीची डाळच शिजत नाहीं'(ले. १५९०).

२९. महाराज प्रजेवर जुलूम होऊं नये, ती समाधानानें रहावी याविषयीं अतिशय जागरूक असत हें चिंचवडचे देव किंवा जेधे देशमूख किंवा हलवर्ण येथील अधिकारी यांना पाठविलेल्या पत्रांवरून उघड होत आहे. युरोपीय साधनांवरूनही तीच गोष्ट समजून येते. शिवाजीला मोठा मान असून लोक त्याच्यावर प्रेम करतात. त्याची प्रजा त्याला जितकी मानते तितकेंच त्याच्यावर प्रेम करते अशा प्रकारचे उद्‌गार कांहीं पत्रांतून काढलेले आढळतात (ले. १००२, १९०५).

३०. शिवाजी महाराजांना त्यांच्या काळांत अवतारी पुरूष समजत असत कीं नाहीं याविषयीं चांगलासा पुरावा नाहीं. महाराजांनीं व्यंकोजीस लिहिलेल्या एका पत्रांत आपणांवर श्रीदेवीची व श्रीची कृपा पूर्ण झाली असल्याचा उल्लेख आहे. यावरून आपणांवर देवाची पूर्ण कृपा आहे असें महाराज मानीत होते असें दिसतें (ले. २३३२). इंग्रजी पत्रांतून या विषयावर विशेष प्रकाश पडेल अशी माहिती जरी आली नसली तरी शायिस्तेखानाच्या प्रसंगाची हकीकत सांगताना एके ठिकाणीं शिवाजी मात्र आपल्याला परमेश्वरानें हें कृत्य करण्याचा संदेश दिला असें आपल्या लोकांना सांगतो इत्यादि माहिती आलेली आहे. या २० व्या शतकांत महात्मा गांधी, वैद्यपंचानन कवडेशास्त्री इत्यादि लहानमोठे अनेक लोक आपणांस ईश्वरी प्रेरणा होत असल्याचें सांगतात आणि कित्येक लोक तें खरेंही मानतात. तर मग महाराजांच्या भावनाप्रधान व भोळ्या भावाच्या काळीं वरील प्रकारच्या समजुती लोकांमध्यें व लोकांकडून खात्रीनें प्रचलित होत असल्या पाहिजेत व आजच्याहून शेकडों पटींनीं जास्त लोक त्या समजुती उराशीं घट्ट धरून ठेवीत असले पाहिजेत यांत संशय नाहीं (ले. ९३०).

३१. महापुरूष झाला तरी तो सर्वच बाबतींत क्रांतदर्शी

८

असतो असें मानणें चुकीचें आहे. इतिहासांत या गोष्टीस आधार मिळत नाहीं. महाराजांनीं अनेक बाबतींत जरी मोठी मौलिकता दाखविली तरी कित्येक भोळ्या समजुतींचा ते त्याग करूं शकले नाहींत. भविष्यावरील विश्वास हा त्यांपैकींच एक होय. ज्योतिष्यांनीं भविष्य वर्तविल्यामुळें महाराजांनीं श. १५९२ मध्यें सुरतेचा किल्ला घेण्याचा प्रयत्न केला असें नमूद आहे (ले. १३५०). भविष्याप्रमाणें महाराजांच्या हातीं किल्ला आला नाहीं. तसेंच कित्येक रत्नें जवळ ठेवल्यास पुष्टी प्राप्त होते अशी त्या काळच्या इतर लोकांप्रमाणें महाराजांची कल्पना असल्यानें तशीं रत्नें इंग्रज व्यापाऱ्यांकडून मागविल्याचेंही एके जागीं सांगितलें आहे (१९३४).

३२. सारांश, युरोपीय व्यापाऱ्यांनीं नमूद केलेल्या अभिप्रायांतील स्वार्थमूलक, ऐकीव माहितीचा वगैरे भाग बाद म्हणून काढून टाकला व त्यांच्या अभिप्रायांचा नीट विचार केला तर त्यांच्या मतेंही शिवाजी महाराज ही एक प्रचंड व्यक्ति होऊन गेली असें ठरतें. अशा या व्यक्तीचे विषयीं त्यांनीं नमूद केलेल्या अभिप्रायांचें थोडेसें दिग्दर्शन वर केलें. त्यावरून वाचकांस युरोपीयांनीं रेखाटलेल्या त्यांच्या शब्दचित्रांविषयीं ओझरती कल्पना येईल अशी आशा आहे.

---

## १०. शिवाजी महाराजांचें कार्यकौशल्य

१. इसवी सनाच्या १७ व्या शतकांत महाराष्ट्रामध्यें असा एक महापुरूष होऊन गेला कीं, तो व त्याचें कार्य यांची आठवण तत्कालीन लोकांना होत असेच; पण पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या विसाव्या शतकांतील मराठी भाषिकांनाच नव्हे तर भारतांतील स्वातंत्र्येच्छू इतर लोकांनाहि ती होत असे व आज स्वराज्य झाल्यावरहि तितक्याच प्रकर्षानें होत आहे.

२. जगामध्यें स्वातंत्र्य मिळवून देणारे अनेक महापुरूष होऊन

गेले. केवळ पराक्रमाचाच विचार केला तर, कदाचित् ज्यांनीं शिवाजी महाराजांहून अधिक पराक्रम दाखविला असे पुरूष होऊन गेले असतील; किंवा एकेका गुणाच्या बाबतींत शिवाजी महाराजांशीं तुलना केली तर सरस ठरतील असेहि पुरूष इतिहासांत आढळतील. तथापि शिवाजी महाराजांच्या ठायीं जो गुणसमुच्चय होता आणि त्यांनीं ज्या पद्धतीनें कार्य केलें त्याप्रमाणें कार्य करणारा आणि असा अलौकिक गुणसमुच्चय असणारा शिवाजी महाराजांहून निराळा मनुष्य असेल असें वाटत नाहीं. तथापि गुणांचा आणि कार्याचा हा प्रकर्ष त्यांच्या ठिकाणीं एकदम अवतरित झाला असें म्हणतां यावयाचें नाहीं. अर्थात् ते जन्मतःच अवतारी पुरूष होते असें म्हणणें कठीण आहे. हें सर्व जरी खरें असलें तरी केवळ त्यांचें अगदीं पहिलें पत्र पाहिलें आणि त्यावर उठविलेली त्यांची 'प्रतिपच्चंद्ररेखेव' ही मुद्रा पाहिली म्हणजे या पुरुषाच्या ठिकाणीं सामान्य माणसापेक्षां कांहीं तरी अधिक होतें,वेगळी विचारसरणी होती, विशेष ध्येय होतें, असें वाटूं लागतें.

३. एका पत्रांत उल्लेखिल्याप्रमाणें, त्यांनीं आपल्या बालवयांत आपल्या सोबत्यांकडून व जहागिरींतील जनतेकडून, स्वराज्याच्या शपथा घेवविल्या होत्या कीं नाहीं हा वादग्रस्त प्रश्न आहे हें जरी सत्य असलें तरी, एवढें मात्र आपणांस कबूल करावयासच हवें कीं, महाराजांच्या मनांत आपलें राज्य वाढवावें ही कल्पना निश्चित होती; पण नुसती कल्पना करणें सोपें असतें, ती कल्पना कृतींत उतरविणें महा कठीण कर्म ! शिवाजी महाराजांना त्यांच्या अंतरीं असलेली स्वराज्याची कल्पना साकार करण्यासाठीं, अफजलखान, सीदी जौहर, शायिस्तेखान आणि आग्रा असे चार जिवावरील मोठे प्रसंग स्वतःवर ओढवून घ्यावे लागले. यांपैकीं प्रत्येक प्रसंगच असा होता कीं, तो छत्रपतींवर उलटला असता तर, स्वराज्याचा इतिहास घडलाच नसता. उत्तर हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणेंच महाराष्ट्रांतील लोकही मुसलमान, ख्रिस्ती, हबशी इत्यादि परकीयांच्या गुलामगिरींत खितपत पडले असते.

४. पण तसें व्हावयाचें नव्हतें. शिवाजी महाराजांनीं या चारही संकटांवर मात केली. एका सुभाषितकारानें म्हटलें आहे—

न संशयमनारुह्य नरो भद्राणि पश्यति ।
संशयं पुनरारुह्य यदि जीवति पश्यति ॥

या उक्तीप्रमाणें वरील प्रसंगांतून कौशल्यानें ते निसटले म्हणून मराठी भूमि स्वराज्यानें पावन झाली.

५. पण स्वराज्य किंवा स्वातंत्र्य केवळ धाडस दाखवूनच मिळतें असें नाहीं. स्वराज्य मिळवूं पाहणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें शौर्य, धैर्य, आत्मविश्वास हे गुण असावे लागतात त्याचप्रमाणें संघटनाचातुर्यहि अवश्यमेव लागतें. हें चातुर्य महाराजांच्या ठिकाणीं ओतप्रोत होतें याविषयीं शंकाच नाहीं. छत्रपतींनीं राज्यविस्तारास आरंभ केला त्या वेळीं त्यांजपाशीं फार तर शेंपांचशें स्वार व पायदळ आणि त्यांचा निर्वाह चालूं शकेल एवढीच जहागीर असेल. द्रव्याचा साठाही फार असेलसें वाटत नाहीं. अशा अवस्थेंतहि त्यांनीं आपणांभोवतीं नेताजी पालकर, येसाजी कंक, तानाजी मालुसरे, बाजीप्रभू देशपांडे, कान्होजी नाईक जेधे इत्यादि शूर व जिवास जीव देणारे लोक वाढत्या प्रमाणांत जमा केले आणि लोकांची ही संघटना त्यांनीं शेवटपर्यंत चालूं ठेविली होती. केवळ संघटनाचातुर्यानें स्वराज्य मिळतेंच असें नाहीं. प्रखर सारासार विचार, समयसूचकता, एका ताम्रपटामध्यें सांगितल्याप्रमाणें आपलें व आपल्या शत्रूचें बल यांच्या उणेंअधिकपणाची पक्की जाणीव ठेवून आपलें बल सतत वाढवीत राहणें आणि आपल्या संघटनेंतील लोक एकनिष्ठ राहतील याची काळजी घेणें, इत्यादि अनेक गुण व कार्यपद्धति यांचा शिवाजी महाराजांच्या ठिकाणीं प्रकर्ष झालेला होता. इतके गुण असूनही शिवाजी महाराज आपलें राज्य उत्तरेच्या बाजूस औरंगजेबासारख्या प्रबळ शत्रूमुळें फार वाढवूं शकले नाहींत. कारण त्यांच्या हें ध्यानांत आलें होतें कीं, औरंगजेबाच्या मानानें आपली शक्ति अपुरी आहे. तेव्हां ती शक्ति उत्तरेकडे राज्यविस्तार करण्यासाठीं औरंगजेबासारख्याशीं लढा देण्यांत व्यर्थ खर्च न करतां दक्षिणेकडे राज्यविस्तार करण्याच्या कामीं

संपूर्णतया वापरणें श्रेयस्कर. म्हणूनच महाराष्ट्राच्या दक्षिणेकडील म्हणजे बेळगांव, धारवाड, शिमोगा, चित्रदुर्ग इत्यादि भागांत शिवाजी महाराजांच्या हालचाली सांगणारे अनेक प्रकारचे कागदपत्र पूर्वीं मिळाले आहेत व सध्याहि संशोधनांत आढळत आहेत. आणि पद्धतशीर शोध घेतल्यास फार मोठ्या प्रमाणांत पुढें मिळतील असा विश्वास वाटतो. असे कागदपत्र मिळाले म्हणजे कित्येक नव्या हकीकती कीं, ज्या प्रकाशित कागदपत्र व बखरी यांत आलेल्या नाहींत त्या उजेडांत येंतील.

६. अशीं कांहीं फार्सी व मराठी पत्रें नुकतींच उपलब्ध झालीं आहेत. त्यांमधील एका अप्रसिद्ध पत्राविषयीं येथें थोडी माहिती देतों. हें पत्र शिवाजी महाराजांनीं बेळगांव जिल्ह्यांतील मुरगूड येथील देसाई रुद्रप्पा यास लिहिलें आहे. याची इंग्रजी सनांतली तारीख ११ डिसेंबर १६७६ अशी आहे. छत्रपतींनीं कर्नाटकांत राज्यविस्ताराचा जो प्रयत्न केला त्याचा भाग म्हणून रुद्रप्पा देसाई यास भुजबळगड घेण्याबाबत कामगिरी सांगितली होती. त्याप्रमाणें तो गड घेण्यासाठीं रुद्रप्पा देसायानें आपलीं माणसेंहि पाठविलीं होतीं. दुर्दैवानें त्याचीं माणसें भुजबळगडाला पोहोंचण्यापूर्वींच मारलीं गेलीं आणि त्याचे हातून शिवाजी राजांच्या इच्छेप्रमाणें भुजबळगड घेण्याचें काम सिद्धीस गेलें नाहीं. यामुळें रुद्रप्पा देसाई मोठ्या फिकिरींत पडला. हें महाराजांस समजल्यावर त्यांनीं त्यास समाधानाचें पत्र पाठविलें व त्यांत लिहिलें: तुमच्या हातून भुजबळगड घेण्याचें काम झालें नाहीं तरी तुमची निष्ठा आम्हांस कळली. हें काम झालें नाहीं तरी कडकोळी वगैरे ठिकाणचीं शत्रूचीं ठाणीं तुम्ही उठवून लावावीं. तसेंच भुजबळगडाच्या बाबतींतहि जें करतां येईल तें अवश्य करावें. येणें करून तुमची निष्ठा सुस्पष्ट होऊन आमची कृपा तुमच्यावर राहील.

७. हें पत्र लहानसेंच असलें तरी, कर्नाटकांत राज्यविस्ताराकरितां शिवाजी महाराज कसा प्रयत्न करीत होते आणि नवनव्या लोकांना आपल्या संघटनेंत कसे सामील करून घेत होते ह्या बाबतींत बोलकें आहे. वास्तवीक रुद्रप्पा देसाई हा आदिलशाही सत्ते-

खालीं जन्म काढलेला; त्याचें वतन, घरदार, हें सर्व आदिलशाही मुलुखांतच होतें; त्याचे वाडवडील पिढान्‌पिढ्या आदिलशाही प्रदेशांतच राहात आले होते; छत्रपति त्या मानानें अगदींच नवखे होते; एवढेंच नव्हे तर त्यांची सत्ता अत्यंत अस्थिर अशी होती. असें असतांही रुद्रप्पा देसाई छत्रपतींच्या सांगण्यावरून त्यांस मदत करण्यास येतो यांतच शिवाजीराजांच्या यशाचें मर्म आहे, कार्यकौशल्याचें गमक आहे.

८. वर उल्लेखिलेलें व संशोधनांत अलीकडेच आढळलेलें मूळ पत्र खालीलप्रमाणें आहे –

[आरंभीं 'प्रतिपत्' इत्यादि अष्टकोनी शिक्का आणि ३ व ४ या ओळींच्या डाव्या अंगास बदामी आकाराचा★] श्री। शिवचर। णी तत्पर त्र्यं। ब्रकसुत मोरेश्वर असा शि.★] स्वस्ति श्रीराज्याभिषेक शक ३ नल संवत्सर मार्गशीर्ष वदि प्रतिपदा इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति याणी रुद्रपा नाईक देसाई पा। मुरगूड यांसी आज्ञा केली यैसी जे तुमचा मुतालीक चेनपा हुजूर आहे त्याणे सांगितले की रुद्रपा स्वामीचे कामावरी येक्षियार होऊन भुजबलगडीचे कामाबदल वडउपर व मोप बराबरी नागणगौडा पाठविले होते त्यास वाटेस तोरगलकरांनी जिवे मारिले त्याकरिता दिलगिरी धरिली की साहेबकामास अंतर पडिले म्हणून तरी तुम्ही काही फिकीर न करणे स्वामीचे सेवेस येक्षियार जाले आहा साहेब काम उदंड कराल यैसे स्वामी समजले असेती बहूत काही काम तुमच्या हाते घेऊन तुम्हास सर्फराज करून यैसा दिलासा असो देणे साल मजकूर सन सबा सबैनाकारणे स्वामी तुमचे परगणियाचा काही खंडणी अगर पैका घेत नाही तुम्हास माफ केले असे तुम्ही साहेबांचे तर्फेने कुली रुजुवातीनें वर्तणूक करून गनिमाचे लोकास गोशमाल देत जाणे कडकोली गनिमाचे ठाणे आहे तेही उठवून तेथे आपले ठाणे बैसे ते करणे व वरकडही जागाजागांची ठाणी गनिमाची उठऊन देणे स्वामीही तुमची हर बाब मदत करवितील तुम्ही साहेबकाम चालवीत जाणे भुजबलगडीची बहूत काही मदत हर येक बाबेने करून

आपले चाकरीचा व रुजुवातीचा व येक्षियारीचा मजुरा करून दाखवणे की स्वामी तुम्हावरी पुढेही मेहरबानी करीत ते करणे [नि.*] लेखनसीमा [ष.*] मर्या। देयं विरा। जते [पाठीवर शेरे *) चंद्र .., मास मार्गशीर्ष मार्गशीर्ष सुरू सूद बार

---

# ११. युगपुरूष शिवाजी महाराजांची थोरवी

१. आपल्या भारताच्या पुराणकालांत शेकडो थोर राजे होऊन गेले. पैकीं राम व कृष्ण हे तर आपल्या अलौकिक आचरणानें देवत्व पावले; पण त्यांचा इतिहास समकालीन साधनांच्या साह्यानें आपणांस सांगतां येत नाहीं. त्यांच्या नंतर कित्येक शतकांनीं झालेल्या ग्रंथांवरून त्यांचा इतिहास आपणांस समजून घ्यावा लागतो. त्यांच्या चरित्राचा पर्वत आपण फार लांबून पहात असल्यानें त्यांतील उंचसखल भाग, खाचाखोचा वगैरे दिसेनासे होऊन त्यांतील नितांत रमणीयता तेवढी शिल्लक राहिली आहे. पण केवळ वाङ्मय पुराव्यावरून त्यांचीं चरित्रें समजत असल्यानें एक प्रकारें तीं पुराणेंच झालीं आहेत. भारताच्या इतिहासांतही कित्येक नामांकित राजे होऊन गेले. त्यांचा वाङ्मय व वस्तुमय अशा दोन्ही प्रकारच्या साधनांवरून समजणारा इतिहास कांहीं प्रसिद्ध झाला आहे, कांहीं उजेडांत येत आहे. पण ज्याच्या विषयीं कांहींना कांहीं माहिती उपलब्ध झाली आहे त्यांत धर्मनिष्ठ, पराक्रमी, कर्तबगार, सौजन्ययुक्त असे समुद्रगुप्त, पुलकेशी, हर्ष इत्यादि राजे असले तरी आज ज्ञात असलेल्या इतिहासांत शिवाजी महाराजांशिवाय असा एकही पुरूष झालेला दिसत नाहीं कीं, ज्यास युगपुरूष व क्रांतदर्शी हीं विशेषणें सार्थकतेनें लावतां येतील.

२. तीनशें वर्षांच्या खडतर पारतंत्र्यामुळें या महाराष्ट्रांतील बहुसंख्य हिंदू लोक, राजसत्ता आपल्या हातात असणें आवश्यक, न्याय्य, क्रमप्राप्त व मानवी हक्कांस धरून आहे हें मूलभूत तत्त्वच पिढयान्‌पिढया विसरून गेले होते. ते सर्व लोकांस पटावें, याबाबत

त्यांची स्मृति जागृत व्हावी आणि या तत्त्वांवर त्यांची निष्ठा दृढतम रहावी यासाठीं महाराजांनीं अमाप पैसा खर्च केला, सर्व भारतभर घोषणा केली आणि स्वतःस मोठ्या समारंभानें राज्याभिषेक करून घेतला. एरवीं 'विक्रमार्जितसत्त्वस्य स्वयमेव मृगेन्द्रता' या न्यायानें ते या महाराष्ट्राचे स्वयंभू राजे झाले होतेच. त्यांस राज्याभिषेक करून घेण्याची आवश्यकताच होती कुठें? परंतु महाराज एवढ्या-वरच थांबले नाहींत. त्यांनीं राज्य मिळविलें स्वतःच्या हिमतीवर आणि जिवास जीव देणाऱ्या लोकांच्या साह्यानें; पण मनुष्य अमर नाहीं आणि एक खांबी तंबू फार काळ तग धरूं शकत नाहीं हें त्यांना स्पष्ट दिसत होतें. म्हणून त्यांनीं फार पूर्वीपासून—प्रायः स्वतःच्या लहानशा राज्याची व्यवस्था पाहूं लागल्यापासून—अष्ट-प्रधान संस्था कार्यवाहींत आणिली आणि राज्यांत लोकांची भागी-दारी उत्पन्न केली. सर्व प्रकारच्या बेबंदशाहींतून स्वराज्य उत्पन्न करावयाचें तर विशिष्ट मर्यादेपर्यंत सर्वाधिकारित्व आवश्यकच होतें. म्हणून त्यांनीं शेषाधिकार स्वतःकडे ठेविला होता व न्याया-सारख्या निरुपद्रवी खात्यांतही महत्त्वाच्या प्रसंगीं त्यांनीं तो बजा-विला होता. या मुळेंच खराडे—काळभोर भांडणांत पालीस दिव्य होण्याच्या प्रसंगीं वेळांत वेळ काढून महाराज आपल्या अष्टप्रधानां-पैकीं बहुतेकांसह उपस्थित राहिले आणि त्यांनीं स्वतःच्या अध्यक्षते-खालीं भांडणाचा निकाल लाविला.

३. युगपुरूष क्रांतदर्शी असल्यामुळें देशबांधवांच्या शेकडों वर्षांच्या कल्याणाचा विचार करून आवश्यकतेप्रमाणें अनेक उपक्रम करतात व यशस्वी रीतीनें स्वतःच आचरणांत आणून दाखवितात. महा-राजांना, स्वराज्याच्या शाश्वततेसाठीं किल्ले, आरमार, खडें सैन्य, निष्ठावान् व कर्तबगार अधिकारी इत्यादींची आवश्यकता आहे असें दिसतांच, कित्येक जुने व नवे डोंगरी, भुईकोट व पाणकोट किल्ले बांधून, नवेंच बळकट आरमार उभारून व स्वतःच्या आधि-पत्याखालीं आरमारी स्वारी काढून आरमारी स्वाऱ्यांचें उदाहरण घालून दिलें. रोख वेतन देऊन अत्यंत कार्यक्षम घोडदळ व पायदळ उभारलें. दक्षिण दिग्विजयाच्या वेळची या सैन्याची कर्तबगारी,

महाराजांचें सेनापतित्वाचें कौशल्य आणि त्यांच्या दिग्विजयाचा विलक्षण वेग पाहून पाश्चात्य व्यापारी तर दिङ्मूढ होऊन गेले आणि त्यांनीं त्यांस दुसरा सीझर, प्रति अलेक्झांडर, नवा सेटॉरिअस, प्रत्यक्ष हॉनिबॉल म्हणूनच संबोधिलें. कोण अधिक काम करून दाखवितो याबद्दल स्पर्धा लागावी अशी आस्था, निष्ठा व स्फूर्ति नोकरांमध्यें उत्पन्न केली आणि आवश्यक तेव्हां मशिदी पाडून व पाद्रयांचीं डोकीं उडवून दाखवून दिलें कीं, वेडानें केलेल्या अत्याचारांचा तात्काळ बदला घेतला जाईल आणि शेजारच्या परकी सत्तेच्याही हृदयांत धार्मिक जुलुमाच्या परिणामाविषयीं धडकी उत्पन्न केली. शुद्धीकरणाच्या उदाहरणांनीं सामान्य लोकांची विशेषत: शत्रुपक्षीय लोकांची खात्री करून दिली कीं, जबरदस्तीचें धर्मांतर फोल आहे. राजव्यवहारकोश रचवून समजावून दिलें कीं, भाषिक आक्रमण राजकीय आक्रमणाएवढेंच प्रतिकार्य आहे. शुद्ध भारतीय परंपरेचीं नाणीं पाडून व करणकौस्तुभासारखा ज्योतिषावरील ग्रंथ आणि शिवभारतासारखा संस्कृत इतिहासग्रंथ रचवून दाखवून दिलें कीं, संस्कृतिसंवर्धन अनेक अंगांनीं करावें लागतें.

४. भेटीस बोलावून दग्यानें मारावयाचें हा अफजलखानानें इतरत्र यशस्वी रीतीनें केलेला प्रयोग महाराजांस काय माहीत नव्हता? पण तोच प्रयोग त्यांनीं स्वत: जातीनें उलटवून अफजलखानाचा समूळ नाश केला पन्हाळ्याच्या वेढ्यांतून सुरक्षित पार झाले व आदिलशाही डाव हुकविला. सभोंवतीं शत्रुसैन्य पसरलें असतां त्यास थांग-पत्ता लागू न देतां शत्रूच्या काळजास हात घालणें परम दु:साध्य; पण तें काम शायिस्तेखानावर स्वत: छापा घालून महाराजांनीं करून दाखविलें. औरंगजेब किती कपटी, किती केसांनीं गळा कापणारा, किती क्रूर! पण त्यानें केलेला अपमान महाराजांनीं भर दरबारांत व्यक्त केला. नंतर औरंगजेबानें मृत्यु व समूळ नाश यांचें हीन जाळें महाराजांवर टाकलें. पण महाराज त्यांतून आपल्या मुलासह निसटले. चारही प्रसंग असे होते कीं, एक जरी अंगावर उलटता तरी स्वराज्य, स्वातंत्र्य, साम्राज्य, धर्मरक्षण, संस्कृतिसंवर्धन, स्वभाषाभिमान इत्यादि सर्व कल्पना

धुळीस मिळणार होत्या. आमचें अस्तित्वच कार्थेजप्रमाणें स्मृति-शेष झालें असतें. पण ज्यांनीं चारही प्रसंगीं शत्रूंवर मात केली त्यांचे उपर्युक्त गुण कोणत्या उच्च दर्जाचे होते म्हणून वर्णन करावें ? मोरे, मोहिते इत्यादि लहान मोठे अंतःशत्रू आणि विजापूरकर, औरंगजेब, सीदी इत्यादि बाह्य शत्रू यांशीं सतत झगडत राहून सुमारें पंचवीस वर्षांच्या अवधींत त्यांनीं शून्यांतून स्वराज्याची कल्पना साकार करून दाखविली. याची देहीं, याची डोळां तिचा अनुभव घेतला आणि त्याच अवधींत आपल्या मराठी बांधवांस कर्तबगारीची अशी स्फूर्ती दिली कीं, सर्व सामर्थ्यानिशीं सतत पंचवीस वर्षें महाराष्ट्राचा नाश करण्यासाठीं अहर्निश झटणाऱ्या औरंगजेबानें भग्नहृदय होऊन इहलोक सोडला; येवढेंच नव्हे तर त्याच मराठ्यांनीं स्वराज्याचें साम्राज्य करण्यासाठीं सर्व भारतभर अनिरुद्ध संचार केला.

५. त्या युगपुरुषाचे आम्ही वारस असूं तर त्याचीं ध्येयें पुन्हा साकार करून दाखविलीं पाहिजेत. सूर्यापोटीं शनैश्चर बनण्याचा आपणांस अधिकार नाहीं.

---

## १२. समर्थांच्या चरित्राविषयीं कांहीं चर्चा

१. गेल्या वर्षाप्रमाणें यंदाही जांब येथें समर्थमंदिरांत अनेक रामदासभक्त जमणार असून समर्थांचें चरित्र व ग्रंथ यांविषयीं तेथें चर्चा होणार आहे. तीमध्यें चर्चा व्हावी या उद्देशानें समर्थचरित्राशीं निगडित अशा दोन तीन मुद्द्यांविषयीं येथें लिहीत आहे. समर्थ-भक्तांचें यांकडे लक्ष जाईल अशी आशा आहे.

२. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या चौदाव्या वर्षाच्या पहिल्या अंकांतील 'चाफळ येथील मूर्ती रामाची कीं सूर्याची' या लेखांत मी स्पष्ट दाखवून दिलें आहे कीं, चाफळची समर्थ-स्थापित व रामाची म्हणून म्हणविली जाणारी मूर्ती वस्तुतः रामाची नसून सूर्याची आहे. माझ्या विधानाच्या सिद्धीसाठीं मी तेथें ग्रांथिक

वर्णनें व प्रत्यक्ष मूर्ती यांचे आधारही दिले. त्यांवरून माझें म्हणणें सुज्ञ वाचकांस पटल्यावाचून राहिलें नसेल असें मला वाटतें. तेव्हां उपर्युक्त मूर्ती रामाची नसून सूर्याची आहे येवढें निश्चित ठरतें.

३. पण तसें ठरल्यावर वरील सूर्यमूर्ती तेथें केव्हां व कशी आली हे प्रश्न पुढें उभे राहतात. श्री. नानासाहेब देव यांच्या मतें समर्थांनीं श. १५७१ मध्यें अंगापूरच्या डोहांतून काढलेली व चाफळास स्थापन केलेली अशी जी रामाची मूर्ती ती हीच होय. रामदासी संप्रदायांतील इतर लोकांचें म्हणणेंही जवळ जवळ असेंच आहे. पण हें म्हणणें मान्य केलें तर, रामदासांना राम व सूर्य यांमध्यें मूर्तिशिल्पाच्या दृष्टीनें भेद कसा आहे हें कळलें नव्हतें असें मानावें लागेल. असें मानलें तरी त्यायोगें रामदासांचें साधुत्व, व्यवहारचातुर्य, अमोल उपदेश व प्रचंड कार्य यांबाबतींत कांहीं उणेपणा उत्पन्न होतो असें मुळींच नाहीं; पण कित्येक लोकांना रामदासांना मूर्तिशिल्प कळत नव्हतें असा दोष लावणेंही मान्य नाहीं. त्यांचें म्हणणें असें— रामदासांनीं अनेक ठिकाणीं धनुष्यबाण धारण करणाऱ्या रामाचें वर्णन केलें असल्यामुळें,त्यांच्या हातून सूर्याला राम म्हणण्याची चूक होईल हें संभवत नाहीं. तेव्हां समर्थांनीं बसविलेली मूर्ती दुसरीच असावी. पण कांहीं तरी कारण घडून ती मूर्ती अपूज्य ठरल्यामुळें तिच्या जागीं हल्लीची मूर्ती बसविली गेली.

४. हल्लीची मूर्ती सूर्याचीच कां असावी याला त्यांचें असें उत्तर आहे कीं, रामदासांच्या घराण्यांत सूर्योपासना असल्याचें प्रसिद्ध आहे. अर्थात् त्यांच्या घरीं सूर्याची मूर्ती असणें शक्य आहे. जेव्हां समर्थस्थापित मूर्ती अपूज्य ठरली तेव्हां तिच्या जागीं दुसरी एखादी मूर्ती स्थापणें आवश्यक झालें. म्हणून समर्थांच्या घरांतून ही मूर्ती आणली व तिची राम म्हणून स्थापना केली. हेंच काय तें समतोल, सुसूत्र व एकच एक अनुमान आहे. हें मत ग्राह्य धरलें तर मूर्तीच्या पाठीमागील परंपरा तुटते व जो दोष पूर्वी रामदासांकडे येत होता तो आतां रामदासांचे भक्त व शिष्य यांना लावावा लागेल. मला स्वतःला या दोन मतांपैकीं कोणतेंच मत निर्दोष वाटत नाहीं. म्हणून मी रामदासी वाङ्मयांत या विष-

याची कांहीं निर्णायक माहिती मिळते कीं नाहीं हें पाहण्याचा यत्न केला. पण त्यांत मला अजून यश मिळालें नाहीं. मात्र मी केलेला यत्न दुसऱ्या कोणास पुढें जाण्यासाठीं उपयोगी पडणारा असल्यामुळें तो येथें नमूद करतों.

५. हा प्रयत्न करीत असतां एक गोष्ट माझ्या निदर्शनास आली ती ही कीं, रामदासांचें स्वतःचें म्हणून जें कांहीं कवित्व आहे त्यांत कोठेंही चाफळच्या रामाचें वर्णन आल्याचें मला आढळून आलें नाहीं. एवढेंच नव्हे तर नानासाहेब देव यांस विचारतां त्यांनीं कळविलें कीं, 'चाफळच्या श्रीरामाच्या मूर्तीचें प्रत्यक्ष वर्णन श्री समर्थांनीं कोठें केलें असेल असें वाटत नाहीं. पण या दृष्टीनें मुद्दाम पूर्वी टिपण केलेलें नाहीं (श्री. देव यांचें १७।३।३३ चें पत्र). एवढेंच नव्हे तर त्यांच्या मागून जे सांप्रदायिक ग्रंथकार झाले त्यांच्या ग्रंथांतही कोठें चाफळच्या मूर्तीचें वर्णन माझ्या माहिती-प्रमाणें आलेलें नाहीं. यामुळें चाफळास पूर्वी दुसरी मूर्ती होती कीं नाहीं हें निश्चयानें समजण्यास मार्ग नाहीं. हनुमंत स्वामींच्या बखरींत अंगापुरास मिळालेल्या मूर्तीचें म्हणून वर्णन आलें आहे; तरीही त्यांतील 'करधृतकमलं' 'युक्तस्यंदने तिष्ठमानं' वगैरे पदांवरून व श्लोकाच्या अगोदर जें वर्णन केलें आहे त्यावरून हनुमंत स्वामी हल्लीच्या रामाचें म्हणजे वस्तुतः सूर्याचें वर्णन करीत आहेत हें स्पष्ट दिसतें. हनुमंत स्वामींच्या बखरीचा काळ अलीकडचा म्हणजे श. १७४० हा आहे. तेव्हां श. १७४०च्या सुमारा-पासून तरी चाफळास राम म्हणून सूर्याच्या मूर्तीची पूजा होत आहे हें सिद्ध होतें. आतां श. १७४० पूर्वी किती दिवस ही मूर्ती चाफळच्या देवळांत पूजिली जात होती ही गोष्ट हनुमंत स्वामींच्या बखरीची सर्वांत जुनी हस्तलिखित टिपणी कोणत्या सालीं लिहिली गेली व तींत सध्याच्या प्रतींत सापडणारें रामा (सूर्या)चें वर्णन मिळतें कीं नाहीं या दोन प्रश्नांच्या उत्तरांवर अवलंबून आहे. या दोन प्रश्नांचा निकाल लागला तरी प्रस्तुतची मूर्ती कोठें मिळाली हा प्रश्न शिल्लक राहतो. पण तो इतका महत्त्वाचा नसल्यामुळें त्याचा येथें विचार करीत नाहीं.

६. समर्थांच्या कवितेंत चाफळच्या मूर्तीचें वर्णन मिळालें नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. पण त्यांच्या कवितेंत राममूर्तींचीं जीं वर्णनें आहेत त्यांवरून त्यांना पट्टाभिषिक्त रामाचें किंवा रामपंचायतनाचें ध्यान प्रिय होतें असें दिसतें. उदा. समर्थांच्या नांवावर मोडणारें सगुण ध्यान या नावाचें एक प्रकरण आहे. त्यांत त्यांनीं रामपंचायतनाचें वर्णन केलें आहे ( समर्थांचे समग्र ग्रंथ—दामोदर सावळाराम प्रत पृ. ३२०). समर्थांच्या वडिलांना अनुग्रह म्हणून जी मूर्ती मिळाली तीही पट्टाभिषिक्त रामाची होती असें दिसतें (समर्थांचा गाथा पृ. ४९४). चाफळ मठाच्या नित्य पाठांत रामध्यानासंबंधीं १।२ वचनें आहेत; पण त्यांतही पट्टाभिषिक्त रामाचेंच ध्यान आहे. आतां समर्थांच्या काव्यांत राम, लक्ष्मण व सीता ही त्रयीच ज्यांत आहे अशा ध्यानाचा तपशील कोठें आलेला नसेल असें म्हणवत नाहीं. पण मला तो सापडला नाहीं. आणि सांपडला तरी तें वर्णन हल्लीच्या मूर्तीला लागू पडणार नाहीं. तात्पर्य चाफळ येथें समर्थांनीं ज्या मूर्तीची स्थापना केली तिचें स्वरूप काय होतें हा चर्चेचा प्रश्न आहे.

७. समर्थांच्या घराण्यांत रामाची उपासना चालू होती कीं सूर्याची किंवा राम व सूर्य या दोघांची हाही चर्चा करण्यास योग्य असाच विषय आहे हें सुद्धा येथें दाखवितों.

८. या संबंधानें प्रथमच एक गोष्ट ध्यानांत येते ती अशी कीं, रामदासांच्या कुलांत सूर्योपासना चालू होती किंवा सूर्य हें त्यांचें कुलदैवत होतें अशी जी सर्वसाधारण समजूत आहे, ती सर्वांशीं खरी दिसत नाहीं. या बाबतींत रामदासांचे स्वतःचे उद्‌गार पाहिले तर त्यांवरून रामदासांचीं कुलदैवतें तुळजाभवानी, हनुमंत व रामचंद्र हीं असावीं असें दिसतें. उदा., हनुमंत आमुची कुळवल्ली, प्रपंचीं आमुचें कूळीं । तुळजा कुळदेवता (रामदासांची कविता पृ. ३९३) अशा सारखे उद्‌गार किंवा अनेक ठिकाणीं रामाचें कुलदैवत म्हणून केलेलें वर्णन पाहिल्यास माझें म्हणणें लक्षांत येईल.

९. शक १५६६–६७ च्या सुमारास रामदास–तुकाराम भेट झाली असतां एकमेकांनीं आपलें चरित्र सांगितल्याची कथा आहे.

त्यांपैकीं समर्थांनीं सांगितलेलें चरित्र म्हणजे समर्थांचें आत्मचरित्र आहे असें समजतात. त्यांत रामदासांच्या घराण्यांत सूर्योपासना होती असें सांगितलें नसून रामदासांचे वडील रामोपासना करीत असें ध्वनीत केलें आहे. ( अनंतबुवा रामदासी : समर्थांचा गाथा पृ. ४९४ ). रामदास रामदासी ग्रंथमालेच्या दुसऱ्या भागांत रामदासांचीं दोन जुनीं चरित्रें छापलीं आहेत. त्यांपैकीं दुसरें म्हणजे समर्थशिष्य भीमस्वामी यांनीं श. १६०३ मध्यें लिहिलेलें चरित्र त्रुटित असून त्यांत पूर्ववृत्त नाहीं. दुसरें चरित्र चाफळपासून २।३ कोसांवर राहणारे शिरगांव मठाधिपति भीमस्वामी यांनीं श. १७१९ त लिहिलें असून त्यांत रामदासांच्या कुळांत सूर्योपासना चालू असल्याचें नमूद केलेलें नाहीं (पृ. १७३ व पृ. १). एवढेंच नव्हे तर गुरुपरंपरा व राममूर्ती या दोन्ही गोष्टी अस्तित्वांत नव्हत्या असें सांगितलें आहे.

१०. गिरिधरांच्या समर्थप्रतापांतही रामदासांचें घराणें सूर्योपासक असल्याचें सांगितलेलें नाहीं (पृ. २ व ३). रामदास रामदासीच्या पंधराव्या भागांत हरिहर स्वामींनीं केलेलें व श. १६८८च्या पूर्वींचें पण त्रुटित असें एक चरित्र छापलें आहे. त्यांत समर्थांचें पूर्ववृत्त आलें आहे. परंतु कुलोपासना रामाची कीं सूर्याची कीं दोघांची हें त्यांत सांगितलेलें नाहीं (पृ. ९८).

११. प्रसिद्ध वाकेनिशी टिपण व हनुमंत स्वामींची बखर यांत समर्थांचे वडील सूर्याजीपंत हे रामोपासना करून शिवाय सूर्यआराधनाही करीत असें सांगितलें आहे (रा. रा. भाग १५ आणि ठक्कर संपादित श्री. रामदासस्वामी चरित्र पृ. १९). या दोन्ही आधारांचा सूक्ष्म अभ्यास केला तर असें दिसून येईल कीं, वाकेनिशी टिपण हें हनुमंत स्वामींच्या बखरीच्या मुद्द्यांचें टिपण आहे. तेव्हां या दोन आधारांना भिन्न अस्तित्व नसून दोन्ही एकच आहेत असें मानिलें पाहिजे. हनुमंत स्वामींची बखर श. १७४० सालीं म्हणजे समर्थांनंतर १३७ वर्षांनीं झालेली आहे. उद्धवसुत ( श. १६३२ ते १७००) रामदासांचें घराणें सूर्योपासक होतें असें सांगतो; पण

उद्धवसुतांनीं दिलेली सर्व माहिती ऐकीव असावी असें अनंतबुवा रामदासी यांचें मत आहे.

१२. दासविश्रामधामांत (श. १७००-१७३८) समर्थांचे वडील प्रथम सूर्योपासक असतां सूर्याच्या आज्ञेवरून रामोपासक बनले असें सुचविलें आहे. म्हणजे वाकेनिशी टिपण व हनुमंत स्वामींची बखर यांच्या विधानांच्या अगदीं उलट विधान केलें आहे. वाकेनिशी टिपणाचा काल वादग्रस्त म्हणून तें बाजूस ठेविलें तरी दासविश्रामधाम व हनुमंत स्वामींची बखर हे दोन्ही ग्रंथ समर्थनिर्याणापासून शंभर वर्षांनंतरचे आहेत हें ध्यानांत ठेवावें. वाकेनिशी टिपणाच्या शेवटीं जरी श. १६०३ हा काल दिला असला तरी तें तत्कालीन आहे किंवा नाहीं हें ठरविण्यासाठीं त्याचें छायाचित्र तरी निदान प्रसिद्ध केलें पाहिजे.

१३. या सर्व आधारांचा विचार केला असतां श्रीसमर्थांचें घराणें सूर्योपासक होतें ही समजूत चाफळ येथें सूर्यमूर्तीची स्थापना झाल्यानंतर होऊन गेलेल्या ग्रंथकारांनीं प्रचलित केली असावी असा तर्क होतो. हा तर्क खरा किंवा खोटा ठरणें हें अधिक संशोधनावर अवलंबून आहे हें खरें असलें तरी हा मुद्दा चर्चा करण्यास योग्य आहे असें वाटतें.

---

# १३. बाजीरावाच्या कर्नाटकांतील स्वाऱ्या

१. बाजीरावाच्या कर्नाटकात झालेल्या स्वाऱ्यांसंबंधीं अनेक चुकीच्या समजुती प्रचलित आहेत. त्यांचें व त्या ज्या आधारांवर प्रचलित झाल्या त्यांचें निराकरण करणें हें महत्त्वाचें, उचित व समयप्राप्त असलें तरी, तें सामान्य वाचकांस नीरस व कंटाळवाणें वाटण्याचा संभव आहे. तेव्हां येथें अस्सल, समकालीन व प्रमाणभूत अशा साधनांवर उभारलेली या स्वाऱ्यांची हकीकत प्रथम देऊन नंतर एका विस्तृत टीपेंत जुन्या हकीकतींमध्यें आढळणारी विसंगति, अज्ञान, चुका, इत्यादींचा यथामति आविष्कार करण्याचें योजिलें

आहे. बाजीरावानें इ. १७२५–२६ सालांत एक आणि १७२६–२७ सालांत एक अशा दोन स्वाऱ्या कर्नाटकांत केल्या; पहिल्या स्वारीचा रोख व मार्ग कर्नाटकाच्या पूर्व भागांत तर दुसरीचा पश्चिम भागांत होता. पहिली स्वारी संपवून बाजीराव परत सातारा-पुण्याकडे आला आणि पुन्हा दुसऱ्या स्वारीसाठीं कर्नाटकांत गेला. म्हणून या दोन्ही स्वाऱ्यांचें वर्णन पृथक्पणें देणेंच उचित आहे.

२. पहिल्या स्वारीची योजना केव्हां मुक्रर झाली हें समजत नाहीं; पण सेनापति खंडेराव दाभाडे व प्रतिनिधी श्रीनिवासराव यांमधील मतभेद शाहूनें इ. १७२५ सप्टेंबर ११ चे सुमारास मिटविले, एकी करून दिली आणि सेनापतीचें समाधान केलें[1]. याच सालाच्या दसऱ्यास प्रतिनिधीस स्वारीवर रवाना करण्याचें ठरविलें; तसेंच त्याच्या मदतीसाठीं सेनापति व सरलश्कर सुलतानजी निंबाळकर यांची योजना करून त्यांस प्रतिनिधीच्या विचारानें स्वामिकार्य करण्याची आज्ञा दिली[2]. स्वारीची योजना आखतांना प्रथम बाजीरावास या स्वारींत धाडण्याचा शाहूचा मानस कदाचित् नसावा[3]; पण पुढें बाजीरावासही या स्वारीवर धाडण्यांत आलें. तेव्हां या स्वारीचें आधिपत्य बाजीरावाकडे नसून प्रतिनिधीकडे होतें असेंच म्हटलें पाहिजे.

३. शाहूनें खंडेराव दाभाड्यास आज्ञा केली होती तरी त्यानें स्वतः न जातां चार हजार फौजेसह आपला मुलगा त्र्यंबकराव दाभाडे यास व सोमवंशी पवार यास त्याचे फौजेसह प्रतिनिधीच्या मदतीस पाठविलें[4]. चौघांचीं सैन्यें २४-१२-१७२५ च्या अगोदर पंढरपुरास एकत्र जमलीं व दुसरे दिवशीं स्वारीवर निघालीं तीं चिंचोली, बनपुरी (बेगमपुरी), बावची, शंख, बावनगर, तेलसिंग (तेलसंग), बिदरगी (बीदरी), गलगले, कोलबर (कोल्हार), काळगी, मारूळ, नरेगल, हणमंतसागर, यलबरगे, संगिनहाळ (संगमहाळ), दुधोळ (मुधोळ), या गांवीं मुक्काम करीत ता. १२-२-२६ ला बेदहटीस आलीं व तेथें ९ दिवस तळ ठोकून राहिलीं[5]. येथें ता. १४-२ ला अब्दुल-गफ्फार पठाण बाजीरावास येऊन भेटला[6]. हा कोण, कोठला, कोणत्या हेतूनें बाजीरावास येऊन भेटला व भेटींतून काय निष्पन्न झालें या

विषयीं कांहींच माहिती मिळत नाहीं. पण हा सावनूरच्या नबाबाचा पूर्वज असून मराठ्यांशीं मैत्री करावी व तिच्या जोरावर कर्नाटकांत स्वतःच्या सत्तेची वाढ करावी या उद्देशानें आला असावा. याच सुमारास इकडे साताऱ्यास शाहूकडे सोंधेंकरांकडून मदतीची याचना करण्यासाठीं पत्रें व माणसें आलीं. तेव्हां शाहूनें जोवनमाफक खंडणी घेऊन सोंधें संस्थानाचें रक्षण करण्याचें ठरविलें आणि त्याविषयीं बोलाचाली करण्यासाठीं गोपाळ राम नांवाच्या मनुष्यास ता. २१।२।१७२६ रोजीं प्रतिनिधि व प्रधान यांजकडे धाडलें.[७] याच तारखेस मराठी सैन्यानें आपला तळ हलविला आणि सिदगी, तिगरी, हंपसागर, जेकोगली ( कोगली ), ईटहली, धिलचोड ( बिलचोड ), चित्रदुर्ग, जानेकल या गांवीं मुक्काम करीत तें ता. २०।३।१७२६ रोजीं हयग्रीव नदीच्या उत्तर तीरावर आलें. तेथें त्यानें ता. ६।४।१७२६ पर्यंत तळ दिला होता. ही[८] नदी म्हैसूर संस्थानांतील चित्रदुर्ग (चितळद्रुग) जिल्ह्याच्या दक्षिण भागांत असल्यानें मराठी सैन्यानें पाऊण चितळद्रुग जिल्हा पददलित केला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. या वेळीं सैन्य स्वारीवर निघून पक्के तीन महिने झाले होते तरी, या स्वारींतील मुख्य व्यक्तींपैकीं एकानेंहि स्वारीची हकीकत शाहूस कळविण्याची काळजी घेतली नाहीं. तेव्हां त्यानें प्रधान, प्रतिनिधि, सेनापति व सरलश्कर या चौघांसहि ता. २१।३।१७२६ रोजीं एक खरमरीत पत्र लिहून स्वारीची झालेली व पुढें होणारी हकीकत कळविण्याविषयीं कानउघाडणी केली.[९] ता. ७।४।१७२६ रोजीं मराठी सैन्य परत फिरलें व जानेकल, कडफा, हिरेहाळ, फुलेहाळ, हरपनहळ्ळी, सिंगटानूर, नगेडहाळ, हंदगोळ या गांवीं मुक्काम करीत ता. ६।५।१७२६ रोजीं धारवाड जिल्ह्यांतील कुरोटी गांवीं आलें.[१०] अजूनहि सैन्यप्रमुखांपैकीं कोणीहि शाहूस स्वारीचें वर्तमान कळविलें नव्हतें. यामुळें त्यानें पुनः पूर्वीप्रमाणेंच एक पत्र पाठविलें.[११] ता. ९।५।१७२६ रोजीं सैन्य कुरोटीहून निघालें तें दुरगुड (मुरगुड), गोकाक, बहे-बोरगांव, कालगांव, कोडोली या गांवांवरून ता. २३।५।१७२६ रोजीं साताऱ्यास आलें.[१२]

४. इ. १७२६ च्या पावसाळ्याच्या आरंभीं लक्ष्मेश्वर परगण्याचा देशमूख खानगौडा आणि सुरेराव यांनीं सावनूरच्या नबाबानें त्यांजवर कहर केल्यामुळें शाहूकडे मदतीची याचना केली. शाहूनें त्यांस मदतीचें आश्वासन देऊन दसऱ्यास आपण फौज रवाना करूं असें ता. २०।७।१७२६ च्या पत्रानें कळविलें आणि इकडे बाजीराव प्रधान, खंडेराव दाभाडे सेनापति व सुलतानजीराव निंबाळकर सरलश्कर यांस फौजा जमविण्याचा हुकूम केला.[१३] या हुकमानंतर सुमारें दोन महिने गेले तरीही फौजा जमल्या नाहींत. तेव्हां शाहूनें आपल्या हातानें या स्वारीचे हेतू निवेदन करणारीं पत्रें प्रधान व सेनापति यांस लिहिलीं आणि विजयादशमीच्या मुहूर्तानें पंढरपूरच्या रोखें जाण्याबद्दल निकड लाविली.[१४] याचा परिणाम होऊन दोघेही स्वारीवर निघाले. सरलश्कर मात्र यांचे सांगातीं गेला नाहीं असें दिसतें. कारण यानंतर पुढें दोन महिन्यांनीं म्हणजे ता. १८।११।१७२६ रोजीं शाहूनें सरलश्करास पाठविलेल्या पत्रांत प्रधान व सेनापति असे दोघेच फौजेनिशीं दक्षिण प्रांतीं मसलतीस गेल्याचा व स्वतःचे दोन हजार स्वार हुजूर पाठविण्याबद्दलचा उल्लेख आहे.[१५]

५. या स्वारीचा मार्ग पूर्वीच्या स्वारीप्रमाणें सपाट प्रदेशावरून नव्हता. एव्हां स्वारीस सह्याद्रीच्या लगत्यानें सुरवात झाली. सैन्यें साताऱ्याजवळून ता. २१।१०।१७२६ ला निघालीं तीं वडगांव, चंचे (चरे)गांव, पाटणें, सुपें, जाखळें–पोकळें, कोडोली, कोगनोळी, जत्र, सामानगड, दऊ, बेळगांव, उचेगांव, मुनोळी, इटणी (इटगी), रमेट (मेट) या गांवांवरून ता. १३।१२। १७२६ ला सोंधें येथें आलीं व १९ तारखेपर्यंत तेथें मुक्कामास राहिलीं. गेल्या वर्षीं शाहूनें सोंधेंकरांना मदतीचें आश्वासन दिलें होतें. त्याच्या परिपूर्तीसाठीं सैन्यें या बाजूस आलीं असावीत. येथून राळें (निसराळें), इसनूर (लूर), जडें, गरूर, उडगणी, बिदनूर, अजमपूर, बाणावर, हसन, तीफूर (तष्टूर) या गावांवरून ता. १३।१२।२७ ला सैन्यें श्रीरंगपट्टणास आलीं व जवळ जवळ एक महिना त्यांनीं तेथें काढला.[१६] याच सुमारास साताऱ्याकडे कांहीं

मनसुब्याचा प्रसंग आल्यामुळें शाहूनें प्रधान व सेनापति यांस परत बोलाविलें.[१७] त्यामुळें म्हणा किंवा परत फिरण्याचा समय आला म्हणून म्हणा, ता. ८।३।२७ ला सैन्यें परत निघालीं तीं चंद्रापट्टण (चन्नरायपट्टण), हयग्रीव, जडें, साबराणी, हिजड्याचा गांव, उचेगांव, डुकरवाडी, नेसरी, कापशी, पिंपळगांव, शिरोळ, आईतवडें, वाटळोज (?), वसंतगड येथें मुक्काम करीत ता. २७।४।१७२७ ला साताऱ्यास परत आलीं.[१८]

६. या स्वाऱ्यांचा हेतु व फलित यांविषयीं नीट माहिती मिळत नाहीं. म. रा. चिटणीसकृत थोरले शाहू महाराज यांचें चरित्र व राजवाडे खंड २ यांत वर्णिल्याप्रमाणें स्थळें, किल्ले, सोडवावे व पाळेगार, मांडलीक राजे यांच्यापासून ठरावाप्रमाणें खंडण्या घ्याव्या, हा हेतु असल्यास तो कितपत साध्य झाला हें समजणें कठीण आहे. मी स्वतः हेतु व फलित यांची नीट कल्पना यावी म्हणून ८।१० दिवस पुणें येथील पेशवे दप्तरांत बाजीरावाची रोजकिर्द बारकाईनें तपासली. विशेषतः जमेकडील बाजू लक्षपूर्वक पाहिल्या. तेव्हां मला असें आढळलें कीं, जमेकडील बहुसंख्य नोंदी कर्ज काढून उभारलेल्या पैशाच्या आहेत. घासदाण्याच्या कांहीं नोंदी आहेत; पण त्यांतील रकमा फार लहान आहेत. खंडणी व सरदेशमुखी वगैरे हक्क यामुळें जमा झालेल्या रकमा अगदींच क्वचित् आहेत.[१९] यावरून असें वाटतें कीं, या दोनहि स्वाऱ्यांत पाळेगार, मांडलीक राजे व इतर यांकडून खंडणी वगैरेंच्या रूपानें द्रव्यप्राप्ति मुळींच झाली नाहीं. यामुळेंच बाजीरावाच्या एका पत्रांत श्रीरंगपट्टणच्या स्वारींत हाल झाल्याचा उल्लेख आहे.[२०] ठाणीं बसविण्याचा उद्योग कितपत यशस्वी झाला हें समजण्यासही साधन नाहीं. पण लक्ष्मेश्वर देसाई, सोंधेंकर, इत्यादींकडून मदतीची याचना केली गेली, त्या अर्थी मराठ्यांच्या सामर्थ्याविषयीं कर्नाटकांतील लोकांच्या अनुकूल व चांगल्या कल्पना असाव्या आणि दोन स्वाऱ्यांत द्रव्यप्राप्ति झाली नसली, तरी मराठ्यांचा नक्ष त्या बाजूस राहण्याच्या कामीं या स्वाऱ्यांचा चांगला उपयोग झाला असावा.

७. या स्वारीची संकलित हकीकत ग्रँट डफचा मराठ्यांचा

इतिहास,[२१] राजवाडे २ रा खंड,[२२] मराठी रियासत मध्यविभाग,[२३] प्रतिनिधि घराण्याचा इतिहास दुसरा खंड,[२४] इत्यादि पुस्तकांतून दिली असली तरी तीमध्यें अनेक प्रकारच्या चुका झालेल्या आहेत. त्यांतील मुख्य अशा– (१) ही स्वारी फत्तेसिंग भोसले याच्या आधिपत्याखालीं निघून तींत रघूजी भोसले सामील झाला होता. (२) या स्वारीचे हेतु (अ) तंजावरचे राजे तुळजोजी व मुराररराव घोरपडे यांच्या मदतीनें किंवा त्यांस मदत करून कर्नाटकांतील स्थळें, किल्ले, सोडवावे; (आ) पाळेगार, मांडलीक राजे, यांजपासून ठरावाप्रमाणें खंडण्या घ्याव्या, हे असल्याचें प्रायः सर्वजण समजत आले आहेत. (३) या स्वारींत त्रिचनापल्लीस दादखानाशीं लढाई होऊन त्रिचनापल्ली हातीं आली व ती मुरारराव घोरपड्यास दिली गेली, अशीही कांहींनीं समजूत करून घेतली आहे. (४) ही स्वारी १७२५–२६ सालांत मिळून एकच वर्ष चालली असें रियासतकारांखेरीज सर्वांनींच मानलें आहे. (५) या स्वारींत असलेल्या सरदारांमध्यें एकोपा नसल्यामुळें सैन्याचे अतिशय हाल झाले असें सर्वांनीं कबूल केलें आहे.

८. ह्या चुका होण्याचें कारण म. र. चिटणीसकृत थोरले शाहू महाराज यांचें चरित्र होय. यांत वरील सर्व चुका केल्या आहेत. बहुधा याच बखरीचा आधार घेऊन ग्रँट डफनें फत्तेसिंग भोसल्यास या स्वारीचा अधिपति बनविलें. ग्रँट डफ व बखर यांचा आधार दुसऱ्या खंडास घेतलेला आहेच. तेव्हां त्यांतहि ही चूक आहेच. दुसऱ्या खंडावर विसंबून राजवाडेहि तेंच गृहीत धरून बसले. राजवाड्यांच्या दुसऱ्या खंडानंतर शाहू छत्रपति रोजनिशी प्रसिद्ध झाली. तींत दक्षिणेकडील पहिली स्वारी प्रतिनिधीच्या आधिपत्याखालीं निघून तींत या शिवाय प्रधान, सेनापति व सरलश्कर असे तिघेच प्रमुख लोक होते असें स्वच्छ सांगितलें असतां, रा. ब. सरदेसाई यांनीं डफ व राजवाडे यांचीच री कशी ओढली हें समजत नाहीं. या पहिल्या स्वारीच्या वेळेस फत्तेसिंग नेमका कोठें होता हें समजत नाहीं. पण २६–२७ च्या दुसऱ्या स्वारीच्या ऐन वेळीं फत्तेसिंग व कान्होजी भोसले हे कलबरगें, आळंद, मळखेड

या बाजूस होते हें शाहू रोजनिशीवरून स्पष्ट होतें. (क. २३, २४, २६). मग रा. ब. सरदसाई फत्तेसिंग पहिल्या स्वारींत व कान्होजी कर्नाटकाच्या दोन्ही स्वाऱ्यांत होता असें कसें म्हणतात(पृ. २०८)? बखरकार व राजवाडे या स्वारींत तंजावरचे तुळजोजी राजे यांचा संबंध आणतात; पण तो चुकला आहे. तुळजोजी इ. १७६३ मध्यें गादीवर आला. तेव्हां १७२५–२७ मधील स्वाऱ्यांत त्याचा संबंधच येऊं शकत नाहीं. रा. ब. सरदेसाई यांनीं या स्वारीशीं तंजावरच्या राजाचा संबंध आहे असें गृहीत धरलें. फक्त १७२५-२७ मधील तंजावरचा राजा सरफोजी याचें नांव तुळजोजीच्या ऐवजीं घातलें; पण हा संबंध दाखविणारें समकालीन साधन उपलब्ध नाहीं. यामुळें बखरींतील विधानाबद्दल निर्वाळा देतां येत नाहीं. शिवाय बाजीरावाचे बाळाजी बाजीराव रोजनिशी खंड २ मध्यें दिलेले मुक्काम एवढेच काय ते कर्नाटकांतील स्वाऱ्यांचे मुक्काम असें गृहीत धरल्यास दोनही स्वाऱ्यांत मराठी सैन्यें तंजावर-कडे मुळींच गेलीं नव्हतीं असें म्हटलें पाहिजे. मुरारराव घोरपडे, त्रिचनापल्ली व दादखान यांचा या स्वाऱ्यांशीं संबंध होता, असें राजवाडे गृहीत धरतात याचें आश्चर्य नाहीं; पण इ. १९२० सालापर्यंत बरींच साधनें प्रसिद्ध झाल्यावरहि रा. ब. सरदेसाई तो संबंध धरून चालतात याचें नवल वाटतें. बाजीरावाचे मुक्काम वस्तुस्थितिनिदर्शक असतील, तर दोनही स्वाऱ्यांत मराठी सैन्य त्रिचनापल्लीपर्यंत गेलेंच नव्हतें. मग तेथें दादखानाशीं लढाई होऊन त्रिचनापल्ली हस्तगत होणें व तेथें फत्तेसिंगानें मुराररावास स्थापणें या गोष्टी कोठून घडणार ?

९. वास्तविक ही हकीकत इ. १७४१ च्या सुमाराची आहे असें दिसतें. तेव्हां रघूजी व फत्तेसिंग भोसले त्रिचनापल्लीकडे जाऊन त्यांनीं मुराररावास त्रिचनापल्ली दिली असावी. इतिहाससंग्रहांतील ऐतिहासिक चरित्रें या प्रकरणांत पृ. ८१ वर तशा तऱ्हेचा स्पष्ट उल्लेख असणारा तह छापला आहे. पेशवे दप्तर खंड २० लेखांक २१ हेंच सांगत आहे. तेव्हां बखर व तीवर विसंबणारे राजवाडे, सरदेसाई, वगैरेंच्या हातून या स्वारीचा इ. १७२५–२७

मधील स्वाऱ्यांशीं संबंध जोडण्यांत चूकच झाली आहे असें म्हटलें पाहिजे. विशेषतः रघूजी भोसल्याचा संबंध दाखविणारीं पत्रें या स्वारीविषयीं नव्हत असें निश्चित समजण्यास हरकत नाहीं.

१०. ही स्वारी दोन वर्षें चालली होती किंवा दोन वर्षांत मिळून दोन स्वाऱ्या झाल्या, हें बाजीरावाचे मुक्काम व शारोमधील कलमें यांवरून अगदीं स्पष्ट होत असल्यानें एक वर्ष कालाविषयीं अधिक चर्चा करण्याचें कारणच उरत नाहीं. या स्वाऱ्यांपैकीं श्रीरंगपट्टणच्या मोहिमेंत हाल झाले हें बाजीरावानें स्वतःच कबूल केलें आहे. चित्रदुर्गच्या अर्थात् पहिल्या स्वारीत हाल झाले कीं नाहींत हें व या हालांचें कारण सरदारांतील बेकी कीं काय हें समजण्यास साधन नाहीं. यासाठीं राजवाडे खंड ३, ले. १०९ चा आधार घेतां येणार नाहीं. कारण त्यांत उल्लेखिलेल्या स्थळांना वेढण्यास या दोन्ही मोहिमा चालू असतां कोणीच गेलें नाहीं. तो लेख मराठ्यांच्या या पुढील केव्हां तरी झालेल्या एखाद्या मोहिमेसंबंधीं असावा. तेव्हां त्याच्या आधारानें दोन्ही स्वाऱ्यांत मराठ्यांचे अतिशय हाल झाले, असें अनुमान काढणें युक्त नव्हे.

---

**१.** पेशवे दप्तर (पेद) खंड २०, ले. ४. **२.** शाहू रोजनिशी (शारो) क्र. १६ व १५७. **३.** शारो क्र. १७. **४.** शारो क्र. १५, पेद खंड ३०, पृ. २७६. **५.** बाळाजी बाजीराव रोजनिशी (बाबापेरो) खंड २, पृ. २२६. **६.** राजवाडे खंड २, पृ. ५३; पेद ३०, पृ. २७७. **७.** शारो क्र. १९६. **८.** बाबापेरो खंड २, पृ. २२६. **९.** शारो क्र. १५ व १६. **१०.** बाबापेरो खंड २, पृ. २२६ **११.** पेद ३०, पृ. २७७. **१२.** बाबापेरो खंड २, पृ. २२७. **१३.** शारो क्र. २७. **१४.** शारो क्र. १९. **१५.** शारो क्र. २२. **१६.** बाबापेरो खंड २, पृ. २२७. **१७.** शारो क्र. २५. **१८.** बाबापेरो खंड २, पृ. २२७, २२८. **१९.** मी हें सर्व स्मृतीनें लिहीत आहे. पण रोजकिर्द पाहण्याचें काम नुकतेंच केलें असल्यानें स्मृति अगदीं ताजी आहे. **२०.** ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर चरित्र व पत्रव्यवहार लेखांक ३२, पृ, ४०. **२१.** इ. १९२१ ची आवृत्ति, १ ला खंड, पृ. २६७. **२२.** प्रस्तावना पृ. ३०, गर्भ पृ. ५३. **२३.** पृ. २४५. **२४.** पृ. ६१

# १४. निजाम महाराष्ट्रांत कसा राहिला ?

१. कांहीं दिवसांमागें हैद्राबाद प्रश्नानें धारण केलेलें गंभीर स्वरूप, हिंदूंची त्या संस्थानांत होत असलेली कुचंबणा व त्यांवर चालू असलेला जुलूम जगजाहीर झाल्यामुळें सामान्यतः सर्वच हिंदवासियांच्या आणि विशेषतः महाराष्ट्रियांच्या मनांत वारंवार एक प्रश्न उभा रहात आला तो हा कीं, आम्ही मराठ्यांनीं, अर्थात् छत्रपती, पेशवे व त्यांचे सरदार यांनीं, हिंदुस्थानभर धुमाकूळ घालून गुजरात, माळवा, मध्य हिंदुस्थान, इत्यादि प्रदेशांत आज तागायत चालू असणारीं आपलीं राज्यें स्थापिलीं. पण पुणें या राजधानीच्या जवळ असणारें निजामाचें राज्य कसें नाहीं बुडविलें? राजपुतान्यांत जाऊन रजपुतांची रग जिरविणाऱ्या आम्ही अस्तनीं-तील निखारा असणाऱ्या निजामास कसें जिवंत ठेविलें ? गंगा-यमुना नद्यांच्या अंतर्वेदींत राहणाऱ्या पठाण–रोहिल्यांच्या घरांत शिरून त्यांना 'दे माय धरणी ठाय' करणाऱ्या आमच्या पूर्वजांनीं निजामाला कसें सहीसलामत सोडलें? पेशावरांत मोठ्या तोऱ्यानें भगवा झेंडा व जरीपटका फडकविणाऱ्या आम्हा शूरांचें स्वतःच्या परसामध्यें असलेल्या निजामाकडे कसें दुर्लक्ष झालें ? कलकत्त्या-पर्यंत भरारी मारून मराठा डिच खणावयास लावणाऱ्या आमच्या पूर्वजांनीं घरांतल्या शत्रूची इतकी गय कशी केली? मद्रासच्या इंग्रजांना व पाँडिचेरीच्या फरासिसांना धमकावणाऱ्या आमच्या बापदाद्यांनीं ढुंगणाजवळ असलेल्या निजामास कसें मोकळें ठेवलें ? निजामाविषयीं अशी काय आपुलकी, अडचण किंवा भीति वाटत होती कीं, त्यांनीं निजामास सुरक्षित राहूं दिलें व जगूं दिलें ? जवळच्या शत्रूस प्रथम नामशेष केलें पाहिजे एवढी साधी गोष्ट कशी त्यांच्या ध्यानांत आली नाहीं ? त्यांची केवढी ही घोडचूक ? ही एवढी साधी गोष्ट त्यांस उमगून त्यांनीं कांहीं खटपट केली असती तर आज तेथील हिंदूंची अशी शोचनीय अवस्था कधींच झाली नसती; किंबहुना हैद्राबाद संस्थानही अस्तित्वांत राहिलें नसतें.

२. याच ऐतिहासिक प्रश्नांत उत्तर-दक्षिण वादहि डोकावतो. त्यास गंभीर असें स्वरूप कधींच आलें नाहीं हें खरें; तरी त्याचे मधून मधून पडसाद मात्र उठतात. पेशव्यांनीं, अगोदर दक्षिण जिंकावी कीं प्रथम उत्तर पादाक्रांत करावी, याविषयीं विचार करून धोरण ठरविलें होतें कीं नाहीं ? अगोदर दक्षिणेंत हात-पाय पसरावे असें म्हणणारा पक्ष त्या वेळीं अस्तित्वांत असतां त्याकडे दुर्लक्ष करून उत्तरेस भराऱ्या मारल्या आणि मुघल पादशाहाशीं करार करून पानिपतचें अरिष्ट आपणांवर ओढवून घेतलें; त्या ऐवजीं निर्णायक दक्षिणेंत आपली कर्तबगारी खर्च केली असती तर निजामाचें अस्तित्व राहिलें नसतें; येवढेंच नव्हे तर हैदरासारखा शत्रूहि उत्पन्न झाला नसता व मराठ्यांचें दक्षिणेंत एकछत्री राज्य झालें असतें. हा फायदा आमच्या पूर्वजांच्या कसा ध्यानांत आला नाहीं ? या दोन्ही प्रश्नांचीं विस्तृत उत्तरें येथें देणें शक्य नाहीं. फक्त पेशवे-निजाम संबंधाचें तेवढें येथें दिग्दर्शन करतों.

३. निजाम हा दिल्लीच्या मुघल बादशाहाचा नोकर होता. त्याची बदली करणें, त्यास नोकरींतून काढून टाकणें, त्यास गैर-वर्तन केल्याबद्दल शिक्षा करणें, इत्यादि सर्व अधिकार त्या बाद-शाहांनीं प्रसंगोपात्त बजाविलेहि होते. अर्थात् निजाम मेल्यानंतर किंवा त्याच्या जिवंतपणीहि दक्षिणची सुभेदारी त्याजकडे किंवा तद्वंशजांकडे राहिलीच पाहिजे अशी तात्त्विक परिस्थिति नव्हती. पण मुघली साम्राज्य मोडकळीस आल्यानें मूलतः त्यांत आनुवंशिक, विशिष्ट देशसंबद्ध सुभेदार नसतांहि पुढें उत्पन्न झाले. निजाम हा अशांपैकींच एक कालक्रमानें बनला. त्याच्या दीर्घायुष्यानें त्यास या कामीं फार मदत केली.

४. मराठ्यांनीं दिल्लीहून सनदा आणल्या व स्वीकारल्या याचा अर्थ त्यांनीं मुघल अधिराज्य कबूल केलें असा कांहीं जण करतात; पण याचा अर्थ ते दिल्लीच्या पादशाहीचे निजामासारखे नोकर होते असा होत नाहीं. ते रजपुतांसारखे मांडलीक बनले असेंहि नव्हे. दक्षिणेंतील त्यांच्या स्वराज्यास मान्यता होती येवढेंच नव्हे तर दक्षिणेंतील सुभ्यांतून चौथाई, सरदेशमुखी व इतर हक्क

वसूल करण्याचा त्यांचा हक्कहि मान्य झाला होता. या सनदांमुळें कांही तोटे व कांही फायदे झाले आहेत. त्यांचा हिशेब आपणांस येथें करावयाचा नाहीं. पण या सनदांच्या आधारावरच त्यांनीं दक्षिणेंत अनिरुद्ध संचार केला व त्यांच्या जोरावरच त्यांनीं निजामाशीं लढाया देऊन त्याचा अधिकाधिक प्रदेश गिळंकृत करण्याचें साधून घेतलें येवढें मात्र खरें.

५. याच सुमारास दिल्ली दरबारांत परदेशांतून आलेले तुर्क, अफगाण, पठाण इत्यादींची (१) तुराणी, आणि परकी इराणी, स्थायिक मुसलमान व रजपूत, जाट, इत्यादि मांडलीक आणि गिरासे, मवासी यांची (२) इराणी, अशा दोन फळ्या पडल्या. पहिला पक्ष बाहेरच्या तर दुसरा अंतर्गत साह्यकारांच्या जोरावर दिल्लीची बादशाही टिकवूं पाहात होता. कम्रुद्दीनखान, निजाम वगैरे पहिल्या तर खानदौरान, सवाई जयसिंग व मराठे इत्यादि दुसऱ्या पक्षांत समाविष्ट होते. मराठ्यांस उत्तरेकडून वारंवार बोलावणीं येऊं लागल्यानें तिकडे जाण्यांत त्यांची नवीन प्रदेश हस्तगत करणें व केंद्र सत्तेवर ताबा मिळविणें या दोन्ही दृष्टींनीं वेगानें प्रगति होऊं लागली. तिच्या जोरावर ते इकडे आपल्या हक्कांच्या अमलबजावणीसाठीं अधिक जोराचे व धिटाईचे प्रयत्न करूं लागले. त्यामुळें दिवसेंदिवस निजामाचा येथील आब कमी होऊं लागला; येवढेंच नव्हे तर त्याच्या ताब्यांतील प्रदेशाचाहि संकोच होऊं लागला. कसा तें येथें थोडक्यांत दाखवितों.

६. कोणतीहि कृति होण्यापूर्वी प्रथम तिजविषयीचा विचार मनांत येतो, नंतर तिचा उच्चार होतो आणि पुढें ती आचरणांत आणली जाते. प्रत्येक कृति सामान्यतः या तीन पायऱ्यांनीं होत असते. एखादी व्यक्ति उच्चाराची पायरी गाळून एकदम आचारावर उडी मारते. व्यष्टीला हें शक्य असतें; पण समष्टींत हें शक्य होत नाहीं. एखादी कृति करण्याविषयीं विचार समाजांतील एखाद्या व्यक्तीच्या डोक्यांत आला तर त्या विचाराचा उच्चार करून तो सर्व समष्टीच्या डोक्यांत उतरविणें भाग असतें. त्याशिवाय समाज तो विचार आपलासा करूं शकत नाहीं; त्या विचाराप्रमाणें आचार

करण्याची समाजाची तयारी होत नाहीं. या दृष्टीनें समाज किंवा राष्ट्र यांतील नेत्यांचे उच्चार कृतीचा अर्थ उलगडण्यासाठीं ध्यानांत घ्यावे लागतात. त्या उच्चारांवरून कृतीमागील हेतु ध्यानांत येतो. कधीं कधीं कृति उच्चाराच्या मानानें पुष्कळच कमी प्रमाणांत झालेली आढळेल. अशा वेळीं उच्चार करणाऱ्यांमध्यें तदनुरूप कृति करण्याचें सामर्थ्य नव्हतें असें म्हणतां येईल. पण उच्चारांवरून हेतु स्पष्ट होतात हें कबूल केलेंच पाहिजे.

७. निजामाला समूळ उखडून टाकण्याचा त्या वेळचे महाराष्ट्राचे पुढारी पेशवे यांचा हेतु होता कीं नाहीं, हें समजण्यासाठीं पेशव्यांचे उच्चार तपासून पाहतां येण्यासारखे आहेत. विशेषतः दुसऱ्या व तिसऱ्या पेशव्यांच्या कालांत निजामाशीं वारंवार हर्षामर्षाचे प्रसंग आले असल्यानें त्या कालांतील निजामाविषयींचीं पत्रें वाचून पाहिल्यास आपणांस आवश्यक ती माहिती मिळण्याचा संभव आहे. हे उच्चार मनुष्य केव्हां करतो ? एखादी अचाट कृति करून तिचें इष्ट असें फळ आपल्या पदरांत पडण्याचा संभव दुरंदेशीनें दिसूं लागला व त्याच्या जोरावर अनुयायांस कर्मप्रवृत्त करावयाचें असलें म्हणजे पुढारी फलाची स्पष्ट कल्पना अनुयायांपुढें मांडतो, त्या कल्पनेप्रमाणें आचरण घडलें तर बहुधा अपेक्षित फायदा होतो. तो झाला नाहीं तरी उच्चार शिल्लक राहतोच आणि धोरण समजण्यास तो मदत करतो.

८. इ. १७३७ च्या अखेरीस पहिल्या बाजीरावानें निजामास भोपाळांत पूर्णपणें कोंडलें होतें. निजामाची स्थिति तेव्हां इतकी हलाखीची व अनुकंपनीय झाली होती आणि स्वतःच्या युद्धकौशल्यानें बाजीरावानें मराठी सैन्याच्या संख्येचा व दाबाचा जो देखावा उत्पन्न केला होता तो सुदैवानें खरा असता व त्याच्या जोरावर त्यानें पाहिजे त्या अटी लादल्या असत्या, तरी त्या निजामास कबूल कराव्या लागल्या असत्या. किंवा तो हट्टानें लढाईस उभा राहता तर त्याला सर्वनाश व कदाचित् आत्मनाश करून घ्यावा लागला असता. अशा वेळीं बाजीरावानें 'हे ठिकाणीं लागल्यावर अवघी दक्षिण निर्वेध होईल, अवघ्यांनीं या समयीं या कामांत चित्त

घालावें' असे उद्गार काढले आहेत. हे कशाचे द्योतक आहेत? हे निजाम दक्षिणेंत असावा अशी इच्छा दाखवितात कीं नसावा अशी मनीषा व्यक्त करतात? निजामास बुडवावयाचें नव्हतें तर इकडे बाजीरावानें तुटपुंज्या सैन्यानिशीं निजामास कोंडण्याची गरज काय होती ? आणि दक्षिणेंतून निजामास जी मदत पोचण्याचा संभव होता, ती तोडण्यासाठीं अनेक लहान-मोठ्या सरदारांस बरोबर घेऊन चिमाजी आप्पानें जो आटापिटा केला तो करण्याची आवश्यकता कुठें होती ? (ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र, ले. ३३–३६)

९. वरच्यासारखे उद्गार काढण्याचा प्रसंग बाजीरावाच्या कारकिर्दींत पुन्हा लवकरच आला. नादिरशाहाच्या स्वारींत दिल्लीमध्यें झालेल्या उत्पातांतून डोकें वर काढण्याची निजाम वगैरे दिल्लीचे मुत्सद्दी खटपट करीत असतां, इकडे दक्षिणेंत निजामाचा मुलगा नासिरजंग हा मोठें सैन्य घेऊन बापाकडे जाण्याचा प्रयत्न करूं लागला. बाजीरावही उत्तरेच्या स्वारीवर निघाला होता. तेव्हां दोघांचा एकमेकांशीं संघर्ष होणें अपरिहार्य झालें. सुमारें दोन-तीन महिने गोदातीरावर ऊनसावलीचा खेळ खेळल्यावर इ. १७४० च्या फेब्रुवारीच्या अखेरीस निजामाचा मुलगा नासिरजंग व बाजी–चिमाजी यांची गाठ औरंगाबादेजवळ पडली; तेव्हां उत्तरेंतून किंवा दक्षिणेंतून, कोठूनही नासिरजंगास मदत मिळण्याचा संभव उरला नव्हता. या वेळीं पेशव्यांच्या मदतीस छत्रपतींच्या आधीन असलेले सर्व सरदार आले असते तर नासिरजंगाचा पुरा नाश होऊन सर्व दक्षिण मोकळी झाली असती. हेच विचार चिमाजी आप्पा किंवा बाजीराव यांपैकीं कोणी तरी 'राजश्री स्वामी..... साऱ्या फौजा कुमकेस पाठवितील तर सा सुभे दक्षण मोकळी व्हावी यैसा समय आहे' किंवा 'जर ये समई महाराजांनीं तमाम फौजांस आज्ञा करून पुस्तवानी केली तर मोगलाचे निर्मूल करावें यैसे आहे,' असे उद्गार व्यक्त केले आहेत. हे विचार 'सहा सुभे दक्षिण मोकळी व्हावी अशी इच्छा दर्शवितात कीं न व्हावी असें सांगतात ? (पुरंदरे दप्तर १।१३९; ऐतिहासिक संकीर्ण साहित्य ७।६)

१०. बाळाजी बाजीरावाच्या तीन-चार पत्रांमध्यें या पेशव्याची निजामाविषयीं काय कल्पना होती हें स्पष्ट झालें आहे. इ. १७४८ मे २२ ला निजाम मेल्यावर इ. १७४९ च्या मे–जून मध्यें नासिरजंग अनेक उद्देशांनीं दिल्लीस जाणाच्या खटपटींत होता. पण शिंदे-होळकर आडवे आल्यामुळें तो नर्मदा तीरावरूनच परत फिरला. पुढें इ. १७५० मध्यें कर्नाटक जिंकण्यासाठीं दक्षिणेंत गेला असतां ता. ५।१२।१७५० रोजीं त्याचा खून झाला. त्यानंतर सुभेदारीवर कोणी यावें हें ठरलेलें नव्हतें. निजामाच्या मुलीचा मुलगा हिदायत मुहीउद्दीन व नासिरजंगाचे भाऊ सर्वच दक्षिणच्या सुभेदारीकरितां झटत होते. यामुळें त्यांमध्यें कलहच चालू होता. इतक्यांत सावनूर, कर्नूळ व कडपें येथील नबाब व निजामी सैन्य यांची लडाई होऊन हिदायत मुहीउद्दीन ता. ३।२।१७५१ रोजीं मारला गेला. अर्थात् या वेळीं निजामास बुडविण्याची फार नामी संधी आली होती. तिचा पुरेपुर फायदा घेण्यासाठीं ताराबाई-रामराजा प्रकरण महादोबा व नाना पुरंदरे, त्रिंबकराव पेठे, इत्यादींवर सोपवून बाळाजी बाजीराव निजामावर निघाला तो गदवालपर्यंत गेला, खानदेश सुभ्याची त्यानें तात्पुरती जप्ती केली आणि औरंगबादेंतून पैसा उकळला. इकडील सर्व मुलूख जप्त करावा तर पुरेशी फौज नव्हती. तेव्हां त्यानें शिंदे–होळकरांस दोन पत्रें लिहिलीं. त्यांत 'सा सुभे दक्षिण सोडवावी' 'सा सुभे दक्षण सोडवावो या कामाचो पाळी [आली] आहे, श्रीकृपा आहे तरी सर्वही मनावर घेऊन करतील' असे स्पष्ट उद्‌गार काढले आहेत (ऐतिहासिक पत्रें यादी वगैरे लेख ९९, ९२). हे उद्‌गार पेशव्यांना निजाम पाहिजे होता याचें कां द्योतक आहेत ? तिसरें पत्र याच भागानगरच्या स्वारींत असल्याच्या वेळचें असून त्यांत 'महाराष्ट्राचे तों ते परमद्वंदी त्यास पथ्यावर ठेवावे' असे उद्‌गार आहेत (हिंगणे दप्तर १।४७). हे उद्‌गार निजाम आपला पक्का शत्रू असून त्यास इतरत्र उल्लेख केल्याप्रमाणें ठिकाणीं ठेवावें असें आपलें ध्येय असल्याचें पेशवे मानीत होते हें अगदीं स्पष्ट करतात. चौथें पत्र याहूनही स्पष्ट आहे. शाहू व बाळाजी बाजीराव यांच्या

कारकिर्दीत ताराबाई प्रायः नजरकैदेंतच होती. पण तिचे व यांचे वाद मात्र नंतरच्या काळांत जोरावले. इ. १७५८ मध्यें असाच वाद होऊन त्यांत पेशवे व ताराबाई यांचे जाबसाल झाले आहेत. त्यांत बाळाजी बाजीरावानें तिजवर पुढील आरोप केले आहेत. ' साहेबी गायकवाडास हुजूर आणिले, रामदासपंतास कागदपत्र लिहिले, बापूजी नाइकास नेले, यमाजीपंताचें पारिपत्य योजिलें, रात्रंदिवस सेवकास विरोध पडे ऐसीं राजकारणें होत जातात, मोगल केवळ हिंदू राज्याचा शत्रू त्यास देखील अनुसंधानें होत असतात'...... यांतील इतर आरोपांविषयीं सध्या आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. पण अवतरणांतील वाक्यांत पेशवे निजामास काय समजत हें मात्र उत्तम तऱ्हेनें स्पष्ट होतें (इतिहाससंग्रह—पेशवे दफ्तर सनदापत्रांतील माहिती ले. ८).

११. या दृष्टीनें पेशवाईतील व खाशा पेशव्यांपैकीं एक भाऊसाहेब यांचे उद्गारहि मननीय आहेत. इ. स. १७५० च्या शेवटीं आलेल्या संधीविषयीं बाळाजी बाजीरावाप्रमाणें अगदीं स्पष्ट शब्द नसले तरी 'आणापा गेलियावर आई खाली येईलसें वाटतें होईल त्याप्रमाणें काम करणें लौकीक दूर जालिया पुढे मोगलाईंत फार उपयोग आहे. मागे निर्वेध जाले तरी चौघे सरदार जमा करून खामखा मोगल ठिकाणींच लावितो ' (पुरंदरे दप्तर १।२६०) असे त्यानें उद्गार काढले आहेत. तेव्हां त्याच्याहि डोक्यांत मोगलांस निष्क्रिय करण्याचा हेतु घोळत होता हें आपणांस कबूल केलें पाहिजे. पण भाऊसाहेबानें उद्गीरच्या मोहिमेनंतर पानिपतच्या स्वारीकडे लक्ष लागलें असतां काढलेले उद्गार चुलता व चुलत भाऊ यांच्या इतकेच स्पष्ट आहेत. 'तिकडील पेचामुळें इकडे आटोपावें लागलें नाहीं तर सारी दक्षिण मोकळी होती' (राजवाडे १।१६६) हे उद्गार पेशव्यांना दक्षिणेविषयीं काय वाटत होतें हें सम्यक् रीतीनें दाखवीत नाहींत काय ?

१२. निजाम-मराठे हर्षामर्षाचे आचाराच्या दृष्टीनें तीन भाग करतां येतात. (१) मुत्सद्देगिरीच्या बळावर कार्य साधणें, (२) किरकोळ कुरापती काढणें व हिसकाहिसकी करून प्रदेश दाबणें.

(३) स्वारी शिकारी करून मुलूख वळकावणें. या प्रत्येक भागांत समावेश करण्यासारखे अनेक लहान-मोठे प्रसंग आहेत. त्या सर्वांची माहिती द्यावयाची म्हणजे एक मोठा प्रबंधच लिहावा लागेल. त्या सर्वांची नुसती त्रोटक चर्चा करावयाची तरी कित्येक पानें खर्ची घालावीं लागतील. तेंहि येथें शक्य नसल्यानें त्यांपैकीं मुख्यांचा सामान्य परिचय मात्र येथें सादर करतों.

१३. पेशवे निजामाशीं उसंत न घेतां एकसारखे भांडत राहिले नाहींत हें खरें. त्यांच्या निजामाशीं झालेल्या लढायांत मधून मधून खळ पडत असे हें कांहीं खोटें नाहीं. या लढायांतून नेहमीं सारखीच प्राप्ति झाली असेंहि म्हणतां येत नाहीं. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, पेशवे निजामास आपला मित्र मानीत असत. बरेंच वेळां लढाई थांबली याचा अर्थ कांहीं मुदतीसाठीं केलेला तो शस्त्रसंधी होता असाच करावा लागतो. नाहीं तर इ. १७४९ मध्यें प्रत्यक्ष भांडण तंटा नसतां आणि नासिरजंग उत्तरेंत दिल्लीस जाऊं लागण्याच्या वेळीं मराठ्यांनीं त्याच्या वाटेंत आडवें येण्याचें कारण काय ? दिल्लीस जात असतां मराठ्यांनीं आपणांस आडवूं तर नयेच पण तिकडे उत्तरेस होळकर व सफ्दरजंग यांचा स्नेह आणि इकडे दक्षिणेंत मरहूम निजाम व पेशवे यांचा स्नेह असल्यामुळें मराठ्यांनीं आपल्या दिल्लीगमनास सर्व प्रकारें साह्य करावें, या हेतूनें नासिरजंगानें महाराव जानोजी जसवंत निंबाळकर यास पेशव्यांकडे पाठविलें असतां ‘ राजश्री मल्हारबा देशास येणार; त्याची भेटी जालिया वर्तमान मनास आणून तुम्हासी जाबसाल करणे तो करून. येसे करिता तुम्ही जाल तरी मार्गीं फौजा आहेत, तुमची स्थित राहून जाणे होणार नाही; याज-करिता तूर्त न जाणे (हिंगणे दप्तर खंड १, ले. ४०) असें साफ उत्तर देऊन निंबाळकरास परत लावण्याचें कारण काय ?

१४. इ. स. १७५२ मध्यें मराठ्यांनीं निजामाचा सर्वांत थोरला मुलगा गाझीउद्दीन यास दिल्लीच्या बादशाहाकडून दक्षिणच्या सुभेदारीचीं वस्त्रें देववून मुद्दाम दक्षिणेंत कशासाठीं आणिलें, हा विचार करण्यासारखा मुद्दा आहे. याचें लहानपणा-

पासूनचें सर्व आयुष्य दिल्लीस गेलें होतें. निजामाच्या पश्चात् त्याचे कांहीं किताब व कांहीं कामें याजकडे चालू होतीं. मराठ्यांनीं त्यास इकडे आणलें नसतें तर त्यानें आपण होऊन दक्षिणच्या सुभेदारीची आकांक्षा धरून इकडे येण्याचें साहस केलें नसतें. पण एक तर निजामाच्या पश्चात् दक्षिणच्या सुभेदारीचा स्वाभाविक वारस नासिरजंग हा तर मेलाच; पण स्वतःस सुभेदारीचा वारस समजणारा निजामाचा नातू हाहि मारला गेला. शिवाय येथें सलाबत, बसालत व निजामअली असे जे निजामाचे मुलगे होते त्यांपैकीं कोणी सुभेदारी घ्यावयाची हें ठरलेलें नव्हतें. अशा वेळीं जेवढा फायदा करून घेतां येईल तेवढा घ्यावा अशा विषयीं बाळाजी बाजीरावाचा प्रयत्न चालू होता. या वेळीं औरंगाबादचा व्यवस्थापक सय्यिद लश्करखान होता. त्याचा व नानासाहेबाचा स्नेह असावा. तेव्हां त्यानें दोनचार पत्रें धाडून त्यास उपदेश केला कीं, 'औरंगाबाद व बऱ्हाणपूर दोन्ही सुभे व खजाना ऐसे आमचे हवाला करावा; ... आपले सर्व प्रकारें जागीर मनसब घेऊन आमचे हातून बरें करून घ्यावें किंवा फेरोजजंगास स्थापावे; तो न आल्यास नासिरजंग याचा लेक अथवा भाऊ यास उभे करून आम्हांस कर्ज परिहारार्थ व फौजेचे एक वर्षाचे बेगमीस ऐवज द्यावा; असें कांहींच केलें नाही म्हणजे जो येऊन शहर वेढील त्याचे हवाला करून भेटावें; निरोप घेऊन दिलीस जावें अथवा मकेस जावें; ऐसें करावें यांत काय फळ आहे ? जो जवानमर्द आहे त्याने दोष येत नाहीं ऐसा समय पाहून आपलें कार्य मित्रकार्य संपादून कीर्तीस पात्र व्हावें उचित असे'. पण या उपदेशाप्रमाणें सय्यिद लश्करखान वागण्यास तयार झाला नाहीं; तेव्हां नानासाहेबानें बऱ्हाणपूर किंवा खानदेश सुभा तर तात्पुरता जप्तच केला. औरंगाबाद सुभा जप्त करावा तर सैन्य गुंतून पडतें. म्हणून भली मोठी खंडणी घेऊन नानासाहेब परत फिरला आणि पुढील वर्षीं निजामाच्या थोरल्या मुलास दक्षिणेंत आणण्याचें राजकारण मराठ्यांना करावें लागलें. तो मराठ्यांच्या हातांतलें बाहुलें बनूनच येथें आला. तो सुभेदारीवर टिकता तर दक्षिणची

सुभेदारी मराठ्यांच्या कडेच येती. पण तो ऐन वेळीं औरंगाबादेस विषप्रयोगानें मेला व मराठ्यांचें वर्षाभराचें राजकारण फुकट गेलें (राजवाडे ३।३७२ ए।३७४).

१५. किरकोळ कुरापती काढून मराठ्यांनीं निजामाचा प्रदेश मिळविण्याचा प्रयत्न केल्याचींहि कांहीं उदाहरणें आहेत. निजामाच्या मृत्यूपूर्वीं कांहीं दिवस निजामाचे गडगडा व जीवधन हे किल्ले बळकाविण्याचा प्रयत्न झाला होता. इ. १७५१ मध्यें तात्पुरता जप्त केलेला खानदेश सुभा हा पचविण्यासाठीं कांहीं दिवस लागले. गाझीउद्दीनला दक्षिणेंत आणल्यावर त्यानें वऱ्हाडच्या पश्चिमेकडील तापी व गोदावरी यांमधील सामान्यतः सर्व प्रदेश मराठ्यांना देण्याचें कबूल केलें होतें. त्याच्या पश्चात् इ. १७५२ च्या अखेरीस तोच प्रदेश सलाबतजंगानें मराठ्यांस दिला. पण वस्तुतः औरंगाबाद व वऱ्हाड या सुभ्यांत असलेले माणिकपुंज, राजदेहर, वेताळवाडी, चाळिसगांव व दौलताबाद नामक पांच परगणे आणि सुमारें १६ किल्ले वरील तापी-गोदावरी प्रदेशांत किंवा खानदेश सुभ्यांत मोडतात या सबबीवर मल्हारराव होळकरानें दाबले होते. याबाबत बाळाजी बाजीरावानें दोन पर्याय सुचविले : (१) ‘करारावर नजर देऊन आपल्या मनानें त्यास किल्ले देऊन तह पक्का करावा. (२) अथवा या गोष्टीवर मोगल न आइके तरी जो विचार करणें तो सारियाने एकमते करून करावा, झुजावें, मोगल नाहींसा करावा (राजवाडे ३।४३२,४३३; चंद्रचूड दप्तर १।१९). पण विचारांतील सामोपचार प्रभावी ठरल्यानें पांची परगणे व आठ निकामी किल्ले बळकाविण्यांत आले. अहमदनगर किल्ला परत करण्यांत येऊन हर्ष, चावंड, रामसेज व आणखी चार-पाच किल्ले घेण्याचें कारस्थानहि अशा किरकोळ सामोपचारी कुरापतींपैकींच आहे. याखेरीज मराठ्यांचा दक्षिणेकडील अनिरुद्ध संचार, स्वाऱ्या व हक्कवसुली आणि उत्तरेंत बादशाहाशीं होणारे करार निजामी सत्तेवर शांततेनें होणारे प्रहारच होते. त्या योगें निजामाचें महत्त्व कमी होऊन तो अलग पडूं लागला होता.

१६. दक्षिणेंत हजारों गावें स्वराज्य व मोगलाई अशीं दुतर्फी

अमलाचीं होतीं. तेथील वार्षिक वसूल गोळा करण्यासाठीं जसे मराठे अधिकारी जात तसे मुघली अधिकारी येत किंवा दोघांचेहि अधिकारी कायम असत. दुतर्फा अमलाचीं गांवें नसलीं तरी चौथाई, सरदेशमुखी वगैरे हक्क वसूल करण्यासाठींहि बादशाही म्हटल्या जाणाऱ्या प्रदेशांत मराठे अधिकृतरीत्या जात. अशा वेळीं छत्रपति व पेशवे आणि निजाम यांमध्यें ज्या मानानें दिलजमाई किंवा कुरसता असेल त्या मानानें हर्षामर्षाचे, वर्दळीचे अथवा चकमकीचे प्रसंग येत. अशा वेळीं एका पक्षास दुसऱ्या पक्षाचा मोठा त्रास वाटे. येवढेंच नव्हे तर विरुद्ध पक्षाच्या कायमच्या नेस्तनाबूदीचे विचारहि मनांत, बोलण्यांत व कृतींत येत.

१७. मराठे–निजाम हर्षामर्षाचे कालदृष्टया चार खंड पडतात. पहिला इ. स. १७२४ मधील साखरखेडल्याच्या लढाईपर्यंतचा. दुसरा भाग या लढाईनंतर ते इ. स. १७६३ मधील राक्षसभुवनच्या लढाईअखेरपर्यंत. तिसरा भाग खडर्याच्या लढाईअखेर व चौथा खंड मराठी राज्याच्या विनाशापर्यंतचा.

१८. यांपैकीं पहिल्या खंडात मराठ्यांचें धोरण जेणेंकरून दक्षिणेंतील मुघली सुभेदाराचें आसन अस्थिर, डळमळीत, धोक्याचें व त्यास त्रासदायक होईल असे उद्योग करण्याचें होतें. मग तो निजाम, मुबारिझ किंवा आणखी कोणी असो. पण १७२४ मध्यें साखरखेडल्याच्या लढाईत सुभेदार निजामास जय मिळून त्याचा प्रतिस्पर्धी मुबारिझखान मारला गेल्यामुळें, निजामाचा पाय दक्षिणेंत पक्का रोवला गेला. तेव्हां इ. १७२४ पासून मराठे – निजाम संबंधाचा दुसरा खंड सुरू झाला.

१९. दुसऱ्या कालखंडाच्या सुमारें चाळीस वर्षांत मराठ्यांच्या निजामाशीं १ पालखेड (इ. १७२८), २ भोपाळ (इ. १७३७), ३ गोदावरी (इ. १७४०), ४ बहादुरभंडा (इ. १७४७), ५ असीअुंवरी (इ. १७४८), ६ औरंगाबाद-हैदराबाद (इ. १७५०–५१), ७ कुकडी-घोडनदी (इ. १७५१–५२), ८ सिंदखेड (इ. १७५६–५७), ९ उदगीर (इ. १७५९—६०), १० उरळी (इ. १७६१–

६२), ११ राक्षसभुवन (इ. १७६२–६३) अशा अकरा लढाया अगरस्वाऱ्या झाल्या. यांपैकीं कोणत्याहि प्रसंगीं तहांत मराठ्यांनीं निजामाचे लहानमोठे लचके तोडले नाहींत, नवीन किल्ले घेतले नाहींत, नवे हक्क उत्पन्न केले नाहींत, असें प्राय: झालें नाही.

२०. इ. १७२८ च्या पालखेडच्या लढाईनंतर मुंगी–शेगांव येथें झालेल्या तहांत अनेक ठाणीं, गांवें, इत्यादि सोडून देण्याच्या व अनधिकृत वसूल परत भरणा करण्याच्या अटी तर आहेतच; पण दक्षिणेंतील हर एक काम पेशव्यांच्या सल्ल्यानें झालें पाहिजे, कोल्हापूरच्या संभाजी राजास निजामानें आश्रय देतां कामां नये, दक्षिणच्या चौथाई-सरदेशमुखीच्या सनदांस मान दिलाच पाहिजे, या विशेष शर्ती आहेत. भोपाळच्या वेढ्यानंतर इ. १७३८ मध्यें सराई दुराहा येथें तह झाला. त्यांत माळवा आणि नर्मदा व चंबळा यांमधील मुलूख यांच्या सुभेदारीच्या व जहागिरीच्या सनदा, तसेंच खर्चाबद्दल पन्नास लाख रुपये येवढ्या बाबी दिल्लीच्या बादशाहाकडून निजामानें मिळवून द्यावयाच्या अशा अटी होत्या. इ. १७४० मधील गोदावरी लढाईच्या निमित्तानें खरगोण व हांडे हीं दोन सरकारें मराठ्यांकडे आलीं. यांत एकंदर ५८ महाल असून त्यांचें उत्पन्न दहा लाख सदतीस हजार रुपये होतें.

२१. इ. स. १७४८ च्या असी-अंबरीच्या तहामुळें मराठ्यांस कोणती प्राप्ति झाली हें समजत नाहीं. पण इ. स. १७५०–५१ च्या हैद्राबाद स्वारीमुळें मराठ्यांना खानदेश सुभा व बरीच मोठी रक्कम मिळाल्याचें दिसतें. इ. स. १७५१–५२ च्या कुकडी-घोडनदीच्या लढाईंत विशेष प्राप्ति झाली नाहीं; पण इ. स. १७५२ च्या अखेरीस खानदेश सुभा मराठ्यांच्या कायमचा ताब्यांत आला. इ. स. १७५७ च्या सिंदखेडच्या मोहिमेमुळें पंचवीस लक्षांचा प्रदेश मराठ्यांना मिळून शिवाय नळदुर्गचा किल्ला मराठ्यांच्या पदरांत पडला. इ. स. १७५९–६० सालीं उद्‌गीरची मोहीम यशस्वी रीत्या संपविल्यामुळें साठ लक्षांचा मुलूख, अंबड, फुलंबरी, नांदेड, विजापूर, ब्ऱ्हाणपूर हीं गांवें, असीरगढ व दौलताबाद हे किल्ले एवढी प्राप्ति मराठ्यांस झाली. निजामाचे मुलगे, निजाम अली व

सलाबतजंग यांनीं अनुक्रमें एलिचपूर व हैद्राबाद येथें राहिलें पाहिजे आणि निंबाळकरांनीं निजामाच्या चाकरींत रहावयाचें नाहीं, असे ठराव झाल्यामुळें निजामी सामर्थ्याचे तीन तुकडे होऊन एक तुकडा गळला आणि दोन तुकडे विलग पडले. एवढेंच नव्हे तर सलाबतनिजामअलीपैकीं पहिला मूळचाच निष्क्रिय असल्यानें व दुसऱ्यास निष्क्रिय बनविल्यामुळें निजामाचा रेचच मोडला गेला. इ. १७६१–६२ च्या उरळीच्या लढाईंत मराठ्यांची सर्वस्वी सरशी झाली असतांहि राघोबानें कांहींसा आतबट्ट्याचा तह केला, असा सूर तत्कालींच निघाला होता; पण तेव्हांहि रामचंद्रराव जाधव निजामाकडून फुटून मराठ्यांकडे आला. इ. १७६३ च्या राक्षसभुवनच्या लढाईचा परिणाम म्हणजे मराठ्यांना पंच्याऐंशी लाखांचा मुलूख मिळाला. दुसरा कालखंड येथें संपला.

२२. तिसरा कालखंड खर्ड्याच्या लढाईपर्यंत सुमारें एकतीस वर्षांचा. या काळांत निजामानें वेळोवेळीं मराठ्यांना मदत केली; म्हणून मराठ्यांनीं मित्रत्वाच्या नात्यानें त्यास स्वप्राप्तीपैकीं कांहीं परत केली; पण इ. १७९५ मध्यें निजाम दुराग्रहास प्रवर्तून खर्ड्याच्या लढाईचा प्रसंग घडल्यामुळें व त्यांत निजाम पराभूत झाल्यामुळें मराठ्यांनीं प्रायः असा सर्व मुलूख परत मिळविला. भोसले व पेशवे यांची जी बाकी निजामावर चढली होती ती सर्व त्यानें रोख फेडावी किंवा तिच्या बदल्यांत मुलूख लावून द्यावा; निजामास बदसल्ला देणारा त्याचा दिवाण मशीरुल्मुल्क यास निजामानें पेशव्यांच्या हवाली करून त्यानें पेशव्यांच्या कैदेंत रहावें; इत्यादि अनेक अटी निजामावर लादल्या गेल्या. या वेळीं दक्षिणेंत कोठेंहि गोवध होऊं नये आणि मुसलमानानें हिंदूंच्या धर्मास खलश करूं नये अशाही दोन अटी पेशव्यांनीं सुचविल्या होत्या. येथें तिसरा कालखंड पुरा झाला व निजाम-मराठे संघर्षहि प्रायः संपलाच म्हणावयाचा.

२३. येथपासून पुढील चौथ्या कालखंडांत पेशवे, निजाम वगैरेंचीं इंग्रजांशीं उघड किंवा अंतस्थ भांडणें सुरू होऊन त्यांत इंग्रजांनीं दोघांसही नमविलें.

२४. स्वाऱ्यांमुळें झालेल्या तहांचा वर जो तपशील दिला आहे त्यावरून दिसून येईल कीं, मराठ्यांनीं सामान्यतः प्रत्येक वेळीं निजामाचा अधिकाधिक प्रदेश मिळविण्याचा प्रयत्न केला. पण या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. तहामध्यें मिळालेलें प्रत्यक्ष पदरांत पाडून घेण्यासाठीं मराठ्यांना पुष्कळ प्रयत्न करावे लागत. त्यासाठींहि भांडणें, झगडे, तंटे होत. कारण कोणताही निजाम तहाच्या अटींची अमलबजावणी कधींच प्रामाणिकपणें करीत नसे. या तंट्यांत कांहीं प्रदेश पुन्हा निजामाकडे परतही जाई; पण एकंदरीनें प्रगती होई एवढें मात्र निश्चित.

२५. वर जी त्रोटक माहिती दिली आहे तीवरून वाचकांच्या एवढें लक्षांत येण्यास हरकत नाहीं कीं, मराठी स्वराज्यांतील लोकांस निजाम नको होता हें त्यांनीं उच्चार व आचार या दोहोंनीं सिद्ध केलें आहे. तो अजिबात बुडाला नाहीं याचें कारण मराठ्यांनीं आवश्यक तेवढा सर्व प्रयत्न केला नाहीं असें फार तर म्हणतां येईल. पण या म्हणण्यांतही कांहीं दोष आहे हें दाखविणें शक्य आहे. कसें तें पहा.

२६. शिवाजी महाराजांनीं जंजिऱ्याच्या सिद्दीस उखडून टाकण्याची फार खटपट केली; पण तो उखडला गेला नाहीं. महाराज आपली सर्व शक्ति एकवटून सिद्दीचा पाडाव करण्याचा प्रयत्न करते तर सिद्दी कदाचित् निर्बल होऊन मोडला गेला असता; पण मग महाराजांचा दक्षिणदिग्विजय जन्मासच आला नसता आणि देशावरही त्यांचें राज्य कितपत झालें असतें हा प्रश्नच आहे. तद्वत् मराठ्यांनीं निजामाचा नायनाट करण्यावर जर आपलें सर्व लक्ष एकवटलें असतें, तर निजामाचा फडशा कदाचित् पूर्णपणें उडाला असता; पण तिकडे उत्तरेंत बादशाहींतील ऱ्हासामुळें उत्पन्न झालेल्या अवकाशांत नादिरशाह, अब्दाली यांसारखे मानव्याचे शत्रू कायमचे येऊन बसले असते. तो अवकाश भरून काढावा म्हणून मराठे उत्तरेंत गेले, त्यांनीं पानिपतचा आघात आपणांवर ओढवून घेतला व सहन करून बादशाहींत आपल्याबद्दल एवढा

विश्वास उत्पन्न केला कीं, बादशाह इंग्रजांना सोडून मराठ्यांकडे आला व त्यांच्या मदतीनें गादी चालवूं लागला.

२७. औरंगजेबाच्या पाडावाच्या अगोदरपासूनच निर्वीरमुर्वीतलम् अशी समजूत होऊन मराठ्यांना अखिल हिंदुस्थानांतील सर्व प्रश्न आपण सहज सोडवून दाखवूं असा आत्मविश्वास वाटूं लागला होता. सर्व विरोधक कस्पटासमान ते लेखूं लागले. कांहीं राष्ट्रकूट ताम्रपटांतून आलेलें 'नीतेस्तद्धि फलं यदात्मपरयोराधिक्यसंवेदनम्' हें तत्त्व ते विसरले. येथेंच त्यांची चूक झाली. पादाक्रान्त केलेला सर्व मुलूख कायमचा आपल्या ताब्यांत ठेवतां येईल इतकें लश्कर किंवा मनुष्यबळ त्यांजपाशीं नव्हतें. किंवा जिंकलेल्या प्रदेशांतून कांहीं वर्षें सरकारला प्राप्ति झाली नाहीं तरी चालेल; पण प्रदेश सोडणार नाहीं असें म्हणण्याएवढें द्रव्यबळ नव्हतें. आणि तैमूर, नादिर, अब्दाली यांप्रमाणें क्रूर कर्में करून दशहत उत्पन्न करणें उच्च संस्कृतीमुळें त्यांना त्याज्य वाटत होतें. तसेंच साम्राज्यवादी पाश्चिमात्यांचें बुद्धिबळहि त्यांच्याजवळ नव्हतें. यामुळें सोपे म्हणून हात घातलेले सर्व प्रश्न अपेक्षेप्रमाणें लवकर सुटले नाहींत. ते सोडवीत असतांच मिळालेला वेळ परचक्रामुळें संपून गेला. यामुळें कांहीं प्रश्न अर्धवटच राहिले. परचक्र कां आलें; आवश्यक मनुष्य, द्रव्य व बुद्धि हीं तीनही बळें मराठ्यांना कां मिळवितां आलीं नाहींत, इत्यादि प्रश्न फार मोठे असून त्यांचीं उत्तरें हा स्वतंत्र विषय आहे. तसेंच नागपूरकर भोसल्यांचे निजामाशीं कसकसे संबंध आले हा स्वतंत्र विषय असल्यानें तो येथें गाळला आहे.

---

# १५. हा घ्या मराठे अटकेपार गेल्याचा पुरावा

१. नुकतेंच ता. १ व २ जून १९४३ रोजीं पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेनें एक विद्वत्संमेलन बोलाविलें होतें. त्या प्रसंगीं रियासतकार रावबहादुर गो. स. उर्फ नानासाहेब सरदेसाई यांनीं

केलेल्या अध्यक्षीय भाषणांत अनेक वादग्रस्त व गैरलागू मुद्दे आणि विधानें आलीं होतीं. पण मला येथें त्यांनीं केलेल्या फक्त एका विधानाविषयीं खुलासा करावयाचा आहे. भाषणाच्या ओघांत त्यांनीं ठासून व बजावून सांगितलें कीं, मराठ्यांनीं अटकेवर झेंडे लाविले ही निव्वळ थाप आहे. तीस कोणताहि आधार नाहीं. अशी थाप मारण्यांत आपणांस जरी मोठा अभिमान वाटत असला, तरी तिचा उच्चार करणें आपण सोडून दिलें पाहिजे. माझ्या मतें वरील विधान थाप नसून पूर्णपणें वस्तुस्थितिनिदर्शक असल्यानें त्याबाबतचा पुरावा सभेपुढें मांडण्यासाठीं मी रा. ब. सरदेसाई यांजकडे परवानगी मागितली. पण दुःखाची गोष्ट अशी कीं, मला त्या वेळीं परवानगी न देतां माझा पुरावा वर्तमानपत्रद्वारा प्रसिद्ध करण्यास त्यांनीं सांगितलें आणि स्वतः मात्र समारोपाच्या भाषणांत वरील विधानाचा पुनरुच्चार करून ती निव्वळ थाप आहे असें पुनरुद्‌घोषित केलें ! म्हणून मला माझा पुरावा वर्तमानपत्रद्वारें व जाहीर रितीनें मांडणें आवश्यक झालें आहे.

२. इ. स. च्या अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत उत्तर हिंदुस्थानांत एक मोठी बातमी पुरविणारी संस्था अस्तित्वांत आली होती. तीमध्यें हिंदू, मुसलमान वगैरे अनेक जमातींचे लोक काम करीत असावेत असें दिसतें. हे लोक दिल्ली, लाहोर, पेशावर, काबूल, इत्यादि ठिकाणीं राहून आणि मध्य आशिया, अफगाणिस्थान, पंजाब, काश्मीर, दिल्ली वगैरे अनेक प्रांतांतील पूर्णपणें विश्वास्य अशी माहिती एकत्र करून ती निरनिराळ्या राज्यकर्त्यांस पुरवीत असावे. अशा रीतीनें माहिती एकत्र केलेल्या बातमीपत्रास अखबार म्हणतात. अशा प्रकारचे पुष्कळ अखबार पेशव्यांकडे येत. हे बहुधा बातम्यांचें महत्त्व व वैपुल्य यांच्या अनुरोधानें एक आठवडा ते एक महिना एवढ्या अंतरानें पाठविले जात. नमुन्यादाखल पांच फार्सी अखबार मी ऐतिहासिक फार्सी साहित्याच्या दुसऱ्या खंडांत 'काबूलचीं बातमीपत्रें' या मथळ्यानें प्रकाशित केले आहेत. यांमध्यें तारखा, नांवें व तपशील यांचें इतकें बाहुल्य असतें कीं, यांत दिलेली एकंदर हकीकत खरी मानणें भाग पडतें. निदान

खोटी मानण्यास कारण सापडत नाहीं. अशा दोन अखबारांमध्यें मराठे अटकेच्याही पलीकडे पेशावरपर्यंत पोचल्याचे निर्देश आहेत.

३. पैकीं पहिला अखबार दुसऱ्या आलमगीरच्या पांचव्या जुलूसमधील रबिलाखर महिन्याच्या १८ व्या तारखेचा (इ. १७५८ डिसेंबर २०) असून याच्या आरंभीं, हे अखबार लिहिण्याच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें याच्या पूर्वीं व याच वर्षाच्या रबिलावल महिन्याच्या विसाव्या तारखेस (इ. १७५८ नोव्हेंबर २२) पाठविलेल्या अखबाराचें सार दिलें आहे. त्यांत राव मल्हारजी होळकर व राव जनकोजी शिंदे यांनीं पाठविलेले तुकोजी वगैरे शिलेदार प्रथम लाहोर, गुजरात शाहदौला या बाजूस होते व पुढे ते पेशावरास पोचले (. . . रसीदन तुकोजी वगैरह सिलहदारान फिरिस्तादहाए राव मल्हारजी होलकर जनकोजी सिंधिया दर पिशावर व पेश्तर अझ सूबह लाहोर व गुजरात शाहदौला . . .) असा स्पष्ट निर्देश आहे. ही गोष्ट नोव्हेंबर २२ पूर्वीं अर्थात् ऑक्टोबर मध्यें बहुधा झाली असली पाहिजे.

४. याच अखबारांत पुढें सांगितलें आहे कीं, 'राव मल्हारजी होळकर व राव जनकोजी सिंधिया यांनीं पाठविलेले शिलेदार नरसोजी पंडित व तुकोजी वगैरे, जे मीर हसन अलीखान व खाजा मिर्झाखान यांच्या इच्छेप्रमाणें पेशावराहून लाहोरकडे याव यास निघाले होते. . .अशी बातमी आली.' (खबर रसीदह के नरसोजी पंडित व तुकोजी वगैरह सिलहदारान फिरिस्तादहाए राव मल्हारजी होलकर व राव जनकोजी सिंधिया के अझ पिशावर बमूजब तलब मीर हसन अलीखान व खाजा मीर्झाखान आजिम लाहूर शुदह बूदन्द . . .)

५. दुसरा अखबार उपर्युक्त आलमगीरच्या सहाव्या जुलूसच्या शाबान सतरा या तारखेचा (इ. १७५९ एप्रिल १५ चा) असून त्यांत पांचव्या जुलूसमधील रज्जब महिन्याच्या अखेरी (इ. १७५९ मार्च २९) नंतरची हकीकत ग्रथित केली आहे. तींतही 'बातमी आली कीं, साहिबजी पटेल पेशावराहून कूच करून लाहोर सुभ्यांत दाखल होऊन तेथें असलेले राव मल्हारजी व जनकोजी शिंदे

यांचे शिलेदार तुकोजी खंडोजी कदम वगैरे यांस भेटले (खबर रसीद के साहिबजो पतेल अझ पिशावर कूच कर्दह बसूबह लाहोर दाखिल शुदह तुकोजी खंदोजी कदम वगैरह सिलहदारान राव मल्हारजी व राव जनकोजी सिंधिया के दर आंजा इकामत मो दाश्तन्द मुलाकात नमूदन्द) असें स्वच्छ सांगितलें आहे.

६. मला वाटतें वरील तीन अवतरणांवरून एवढें सिद्ध होऊं शकेल कीं, तुकोजी खंडोजी कदम, नरसोजी पंडित, साबाजी शिंदे इत्यादींपैकीं कांहीं शिलेदार इ. १७५८ च्या आक्टोबर, नोव्हेंबर मध्यें अटकेपलीकडे ५० मैलांवर पेशावरला गेले होते व इ. १७५९ च्या मार्च-एप्रिलमध्यें कांहीं जण परत फिरले.

७. हे अखबार पुणें येथील श्रीयुत कृष्णराव केशवराव उर्फ बाळासाहेब पारसनीस यांच्या कृपेनें मला पहावयास मिळाले असून कोणाहि जिज्ञासूस ते मजकडे पहावयास मिळतील. पेशवे दप्तर खंड २७, ले. २१८ वरून सर जदुनाथ सरकार यांनीं अशी समजूत करून घेतली आहे कीं, मराठे चिनाब नदीच्या पलीकडे केव्हांच गेले नव्हते आणि म्हणून त्यांनीं, मराठ्यांनीं अटकेवर झेंडे फडकविले या रूढ समजुतीस इग्नरंट बोस्ट (फॉल ऑफ दि मुघल एंपायर १ ली आवृत्ती खंड २, पृ. ७५-७६ व टीप) असें म्हटलें आहे. परंतु वरील लेखाची तारीख इ. १७५८ एप्रिल २१ ही असल्यानें यावरून मराठे सामान्यतः एप्रिल अखेरपर्यंत चिनाबचे पलिकडे गेले नव्हते एवढेंच सिद्ध होईल. फार्सी अखबारांतील माहिती यापुढील काळांतील असल्यानें वरील लेखानें होणाऱ्या समजुतींत आतां दुरुस्ती केली पाहिजे आणि मराठे अटकेपार गेले होते ही रूढ समजूत विश्वसनीय मानली पाहिजे.

---

## १६. मराठ्यांचा अटकेपार झेंडा

१. पेशवे दप्तर (पेद) खंड २७ क्रमांक २१८ या लेखावरून प्रा. सरकार यांनीं अशी समजूत करून घेतली कीं, मराठे चिनाबच्या

पलीकडे कधींच गेले नव्हते. म्हणून त्यांनीं, मराठ्यांनीं अटकेवर झेंडे फडकविले या रूढ समजुतीस अज्ञानाची (खोटी) फुशारकी म्हटलें. महाराष्ट्र साहित्य परिषदेनें इ. १९४३ जूनच्या १२ तारखेस भरविलेल्या विद्वत्संमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें रा. ब. गो. स. उर्फ नानासाहेब सरदेसाई यांनीं जें भाषण केलें, त्यांतही त्यांनीं वरील पत्राच्या आधारानें मराठ्यांनीं अटकेवर झेंडे लावले ही निव्वळ थाप आहे; ती मारण्याचें आपण सोडून दिलें पाहिजे; मराठे चिनाबच्या पलीकडे कधींच गेले नव्हते असें ठासून व बजावून सांगितलें. त्यांच्या वरील विधानाविरुद्ध असलेला पुरावा त्यांनींच दिलेल्या सल्ल्याप्रमाणें मी वर्तमानपत्रांत (केसरी २।७।१९४३) प्रसिद्ध केला. तदनंतर रा. ब. सरदेसाई ता. ११।७।४३ रोजीं भा. इ. सं. मंडळांत याच विषयावरील चर्चेसाठीं आले होते. ते कशा-साठीं येणार याची मला माहिती नसल्यामुळें माझी तयारी नव्हती. चर्चेच्या वेळीं रा. ब. सरदेसाई यांनीं आपल्या विधानांत थोडा बदल केला व अटकेपर्यंत मराठ्यांचा अमल कधीं बसला होता तें दाखविलें पाहिजे असा मुद्दा काढला. प्रा. शेजवलकर यांनीं या मुद्द्यावर त्यांचेंच काय पण कोणाहि अनाग्रही मनुष्याचें समाधान होईल असा समर्पक पुरावा दाखवून दिला. त्यानंतर मलाहि अधिक पुरावा उपलब्ध झाला. हा सर्व पुरावा येथें मांडून वाद-ग्रस्त विषयाचा पुनः एकदां थोडक्यांत उपन्यास करीत आहे.

२. श्री. नानासाहेब सरदेसाई यांचें मूळ विधान 'मराठे चिनाबच्या पलीकडे गेलेच नव्हते' असें होतें. त्यावर प्रा. सरकार ज्यांना महत्त्व देतात अशा दिल्ली दरबारच्या व पेशव्यांकडे आलेल्या फार्सी पण अप्रसिद्ध अखबारांवरून मीं दाखवून दिलें कीं, मरा-ठ्यांनीं चिनाबच काय पण अटकेजवळ सिंधू नदीहि ओलांडून पेशावरपर्यंत धडक मारिली होती. पेशावर हें कांहीं हिंदूंच्या यात्रेचें पवित्र ठिकाण नव्हतें कीं, तेथें तुकोजी (होळकर), खंडोजी कदम, साबाजी पाटील (शिंदे), नरसो पंडित अशा वरिष्ठ सेना-धिकाऱ्यांनीं सैन्यासह जावें; किंवा पेशावर म्हणजे काश्मीरप्रमाणें नंदनवन नव्हे कीं, तेथें विलासांच्या लालसेनें मराठे गेले असतील.

बाकी मराठ्यांनीं आपल्या विलासलोलुपतेचें प्रदर्शन केलेलें फारसें दिसून येत नाहीं. उलट निदान या वेळीं कर्ज कसें फिटेल याचीच त्यांना चिंता व खंत लागलेली प्रत्ययास येते. तेव्हां पेशावरास जाणें ही मराठ्यांची शुद्ध रणविजययात्रा होती. आपला अमल बसवून पैसा कसा मिळवितां येईल हेंच मराठे या स्वारींत पहात होते. पण मी दिलेला हा पुरावा इतरांना खात्रीचा वाटला, तरी श्री. नानासाहेब सरदेसाई यांना तेव्हां कबूल नव्हता असें दिसलें. म्हणून त्यांच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध झालेला पुरावाच येथें दाखल करतों. त्यानें श्री. नानासाहेब यांचें समाधान होईल असें वाटतें.

३. रा. ब. सरदेसाई यांनीं मराठी रियासत मध्यविभाग ३, पानिपत प्रकरण यामध्यें (पृ. ९८ ते १०० पर्यंत) 'इतिहाससंग्रह' मधून (ऐतिहासिक स्फुट लेख भाग ४ था, पृ. ३९) उद्धृत केलेलें पत्र फार महत्त्वाचें आहे. हें रघुनाथरावानें ता. ४ मे १७५८ रोजीं बाळाजी बाजीरावास लिहिलें आहे. यांत पुढील वाक्यें आहेत. 'आम्ही तरी काबूलचा सुभा अबदुल रहीमखान स्वामीनी पाठविला त्यास देतो...मामलत थोडीबहूत अटकेअलीकडील करीत आहो. पलीकडील तूर्त होत नाही. खटपट मात्र करितो.' यावरून अटकेपलीकडील प्रदेशावर अमल बसवून पैसे वसूल करण्याची खटपट चालू होती येवढें स्पष्ट होतें. पेशवे दप्तर खंड २७, ले. २१८ हेंही पत्र फार महत्त्वाचें आहे. यामध्येंही इ. १७५८ च्या मार्च एप्रिलमध्यें मराठ्यांनीं सरहिंद, लाहोर, जिकल्यावर अब्दालीचा मुलगा तैमूर व सरदार जहानखान यांनीं पळ काढला. तेव्हां मराठी फौजा त्यांच्या पाठीमागें लागल्या व चिनाब नदीपर्यंत पाठलाग करीत आल्या. तेथें त्यांचे बुनगे, तोफखाना, वगैरे मराठ्यांच्या हातास आले. जहानखान मात्र 'सडा ती-चौ हजारा-फौजेनसी चिनाब नदीपार उतरोन पळाला...दक्षिणी फौज पहिले दिलीआलाकड आली नव्हती. ते चिनाब नदीपर्यंत पोचली. **चिनाबेस पाणी थोडें असते तरी अटकपरियंत जाती सहात (?) मात्र आट (क) पार होऊन गेली.'** इत्यादि मजकूर विशेषतः खिळचाचें वाक्य आहे. त्या वाक्यांतील 'सहात' शब्द पेशवे दप्तराच्या

संपादकांना नीट लागला नाहीं. त्यामुळें त्यांनीं त्यापुढें प्रश्नचिन्ह घातलें आहे. माझ्या अल्पमतीप्रमाणें 'सहात' ऐवजीं 'सबात' असें वाचन केलें (ह ऐवजीं ब वाचतां येईल हें जुन्या मोडीच्या वाचकांना सहज पटेल.) म्हणजे शब्द स्पष्ट होऊन वाक्याचा उलगडा होतो. अरबीमध्यें 'सुबत्' शब्दाचें बहुवचन 'सबात' असें होतें. सुबनचे अर्थ Bodies of ten or eleven horsemen, blocks especially scattered असे दिले असल्यानें मी सबातचा अर्थ येथें घोडदळाच्या पण सड्या व अनियमित तुकड्या असा करतों. शिवाय कोशांत सबातचा ट्रूप्स असा अर्थ दिलाहि आहे. तात्पर्य ज्या पत्राचे आधारानें श्री. नानासाहेब सरदेसाई मराठे चिनाबच्या पलीकडे गेले नव्हते असें म्हणाले, तेंच पत्र मराठे चिनाबच्याच काय पण अटकेच्याहि पलीकडे इ. १७५८ च्या एप्रिल महिन्यांतच गेले होते असें स्पष्ट सांगत आहे. अर्थात् या वेळीं मराठे जहानखानाच्या पाठलागाकरितां अटकेपार गेले असले पाहिजेत हें उघड आहे. मग जहानखान किंवा दुसरा कोणी अब्दालीचा सरदार अथवा खुद्द अब्दाली काबूलकडून चालून येत असल्याची गंधवार्ताही नसतां इ. १७५८ च्या आक्टोबर-नोव्हेंबरमध्यें किंवा इ. १७५९ च्या मार्च-एप्रिलमध्यें लाहोर ते अटक भागावर अमल बसविण्याकरितांच ठेवलेले तुकोजी होळकर, साबाजी पाटील (शिंदे), वगैरे त्यांच्या कार्याचाच एक भाग म्हणून पेशावरपर्यंत गेले होते इ. अखबारांतील माहिती खरी मानण्यांत धोका कसला?

४. चर्चेच्या दिवशीं श्री. नानासाहेब सरदेसाई यांना मराठ्यांनीं अटकेपर्यंत अमल बसविल्याचा पुरावा पाहिजे होता. त्याचा खुलासा असा:—जहानखान पळून गेल्यानंतर अटकेच्या आरचा व बहुधा पारचाहि मुलूख मोकळा झाला होता आणि लाहोर प्रांतांत मराठ्यांचा अमल बसलाच होता असें दिसतें. कारण शिंद्यांचे दिवाण दाभोळकर यांच्या संग्रहांतील एका अप्रसिद्ध व बहुधा इ. १७५८ च्या मे महिन्याच्या मध्याच्या सुमारास रघुनाथरावानें लिहिलेल्या पत्रांत स्पष्ट कळविलें आहे कीं, 'अटकेपर्यंत मोकले आहे. दोन चार छावण्या केल्या तर वजीर पातशाखेरीज करून

आपलाच क्रोडीचा मुलक बल्की दिडाचा सुटेल.' तेव्हां पेशव्यांसच योग्य वाटलें म्हणून म्हणा किंवा अंताजी माणकेश्वरानें, 'लाहोरचा बंदोबस्त अटकेपर्यंत खासा जाऊन करणें' असा हुकूम जनकोजी शिंद्यास पाठविण्याबद्दल पेशव्यांकडे विनंती केल्यावरून म्हणा (पेशवे दप्तर खंड २७, ले. २३१) पेशव्यांनीं बहुधा इ. १७५८ च्या सप्टेंबरांत जनकोजी शिंद्यास 'नाही तर ... पुढे अटकपावेतो जाऊन पैका मिळे ते करणे' अशी एक वैकल्पिक आज्ञा केल्याचें आढळतें (पेशवे दप्तर खंड २, ले. ९८). हल्ली उपलब्ध असलेल्या दळणवळणांच्या साधनाभावीं पूर्वीच्या कार्यकर्त्या सेनानायकांना मुख्यतः स्वतःच्याच अक्कलहुशारीनें वागावें लागे. यामुळें हा पत्रव्यवहार चालू असतांना तिकडे शिंदे-होळकरांपैकीं बहुधा तुकोजी होळकर, सावाजी शिंदे, वगैरेंनीं अटकपर्यंतच्या मुलखावर अमलही बसविला होता असें दिसतें. कारण वरील दोन पत्रांच्या लेखनकालाच्या सुमारास म्हणजे ता. ५।९ १७५८ रोजीं पादशाही हरकारे राजा केशवराव यानें पेशव्यास लिहिलेल्या पत्रांत 'पूर्वील मुलकाखेरीज लाहोरचा सुधा अटक पावेतो दो करोडाचा मुलक या साली महाराजाचा जाला. आता पश्चिमेस मुलतान, काबल.व पूर्वेस बंगालला, व अयोध्या, प्रयाग राहिली. त्यांत कित्येक मुलक महाराजाखालींच आहे. कुरुक्षेत्र व प्रयाग व वाराणसी व गया येथे यवनाचे नाव कशास? महाराजां-सारिखा गोब्राह्मण प्रतिपालक असता हा मनोरथ संपूर्ण विश्वाचा जाला पाहिजे एका वरसाचे काम असे.' अशीं विधानें आहेत (पेद २१।१६३). राजा केशवराव एक सुप्रसिद्ध हरकारा आणि दिल्लीचा पादशाह व पेशवे या दोघांच्याहि अत्यंत लोभांतला मनुष्य असल्यानें त्याच्या विधानांस महत्त्व आहे. तेव्हां या पत्रलेखनकालाच्या सुमारास अटकेपर्यंत व कदाचित् पलीकडेही मराठ्यांचा अमल बसला होता असें दिसतें. यापुढें प्रा. शेजवलकरांनीं चर्चेच्या दिवशीं नजरेस आणलेले दोन कागद घ्या. हे मंडळ-संग्रहांतील चंद्रचूड दप्तरापैकीं असून दोन्ही प्रसिद्ध होऊन अनुक्रमें २३ व ९ वर्षे झालीं आहेत. हे कागद दोन भासत असले तरी वस्तुतः दोन्ही मिळून

एकच पत्र आहे (खंड १, क्र. ४९ व खं. २, पृ. ४ पुा ४). हें पत्र बहुधा तुकोजी होळकरानें इ. १७५९ नोव्हेंबरच्या सुमारास त्यास मल्हाररावानें पाठविलेल्या पत्राच्या उत्तरादाखल लिहिलें आहे. यांत मल्हाररावानें 'तुम्ही अटकपर्यंत बंदोबस्त केला, परंतु सरकारात पैसा पाठविला नाही ' असें लिहिल्यामुळें तुकोजी 'पैका जो आला तो रा साबाजी पाटलानी घेतला ' किंवा 'या प्रांतातील सरंद व दुवाब लाहोर प्रांत मुलतान व आटक येथील जो वसूल आला तो सिदी (ट्टीकबेग) यानीच घेतला' असें लिहीत आहे. अटकपर्यंत अमल बसल्याखेरीज पैका वसूल होणार नाहीं हें उघड आहे.

५. या सर्व पुराव्यांवरून मराठ्यांनीं अटकेवर झेंडे लाविले म्हणजे अटकेपर्यंत अमल बसविला; एवढेंच नव्हे तर ते अटकेपारही गेले होते हें सिद्ध होत नाहीं काय? या बाबत पुढील तीन उतारे संकलन व बखर–वाङमय यांतील असले तरी लक्ष्य आहेत.

रघुनाथरावानें इ. १७५८ मध्यें उत्तरेंत काय केलें तर हें— लाहूरचा सुभा संदीपबेग याचा पुत्र कैदेंत होता त्यास पांच हजार फौजेनिशीं चाकरीस ठेवून त्याचा दिवाण लक्ष्मीनारायण म्हणोन जातीचा कायस्थ होता, बरा कर्ता मनुष्य होता, त्याचे स्वाधीन करून पंजाब व मुलतान सुभा अटकेपर्यंत मुलूख काबीज करून ठाला माघाऱ्या केल्या (जोशी शं. ना.–भाऊसाहेबांची बखर ७ वी आवृत्ति पृ. ३४, कलम ४१)

(शिंदे) शतद्रूपर्यंत गेले. लाहोरचा सुभा आदिनाबेग, त्याचा पुत्र भेटला. त्याचे विचारे साबाजी शिंदे व त्र्यंबक बापूजी यांस १५००० फौज देऊन लाहोर, मुलतान व काश्मीर व पंजाब अटकेपर्यंत मुलखाचे जप्तीस पाठविले (राजवाडे २।१५२).

अब्दालीचा वकील म्हणतो—मागे राजश्री नानासाहेब व राजश्री भाऊसाहेब यांणीं आपल्या पराक्रमानें अटकेपर्यंत मुलूख काबीज केला. अटकेपलीकडे ठाणीं घालावीं, चितोड व द्वारका व गुजराथ आदिकरून खालसा मुलूख केला (रघुनाथ यादव–पानिपतची बखर, ५ वी आवृत्ति, पृ. २ व २०).

---

# १७. अब्दालीच्या स्वभावचित्राची रूपरेखा

१. कोणत्याहि लोकांचा इतिहास कसा असेल हें समजून घ्यावयाचें असेल तर त्यांमध्यें प्रसृत असलेलें तत्त्वज्ञान कशा प्रकारचें आहे हें पाहिलें पाहिजे. याच्या उलट त्या लोकांच्या इतिहासावरून त्यांचें तत्त्वज्ञान कोणत्या स्वरूपाचें असलें पाहिजे, याविषयीं योग्य कल्पना करता येते. जी गोष्ट समाजाची किंवा लोकांची तीच व्यक्तीचीही आहे. कोणाही कर्तबगार पुरुषाच्या ठिकाणचे गुणावगुण जर आपणांस पूर्णपणें समजून आले तर त्याच्या हातून घडलेल्या कृत्यांच्या स्वरूपाविषयीं आपणांस कयास करता येणें शक्य आहे. तसेंच त्यानें केलेल्या कृत्यांवरून त्याच्या ठिकाणीं कोणते गुणावगुण वास करीत होते किंवा त्याच्या मनावर कोणत्या तत्त्वज्ञानाचा पगडा विशेष होता हें सहज सांगतां येईल. हीच दृष्टि आपण पानिपतच्या रोमहर्षक प्रसंगाला जर लावली तर आपणांस असें दिसेल कीं, या युद्धांत दोन कर्तबगार पुरुष मुख्य होते. एक अब्दाली व दुसरा भाऊसाहेब. पैकीं भाऊसाहेब हे आपल्यापैकींच असल्यानें आणि पानिपतविषयीं व पेशवाईच्या बऱ्यावाईट हकीकती आपल्या कानावरून गेल्या असल्यामुळें त्यांविषयीं आपणांस साधारण कल्पना आली असण्याचा संभव आहे व तीवरून भाऊसाहेबांचा स्वभाव, गुणदोष व तत्त्वज्ञान यांविषयीं मराठ्यांच्या इतिहासवाचकांनीं कांहीं कल्पना बांधली असण्याचा संभव आहे. पण अहमदशाहाचें तसें नाहीं. अहमदशाह हा हिन्दुस्थान देशांत रहात नव्हता. तो येथें ५-७ वेळां आला. त्यानें बरीच उलथापालथ केली व निघून गेला. त्याच्या या स्वाऱ्यांचें व त्या स्वाऱ्यांत त्यानें येथें केलेल्या कृत्यांचें विस्तृत वर्णन देणारे ग्रंथ फार थोडे आहेत व त्यांतही इ. १७५६-५७ व इ. १७५९-६१ या दोन कालखंडांत झालेल्या स्वाऱ्यांचीं वर्णनेंच काय तीं विस्तृत अशीं दिलेलीं आहेत. त्यांतून मराठी पत्रें व फार्सी तवारिखा या सर्वांत त्याचें स्वभाववर्णन करणारीं स्थळें थोडींच आहेत. असें जरी आहे तरी, आपण जोंपर्यंत त्याच्या स्वभावचित्राची सूक्ष्म पहाणी करणार नाहीं तोंपर्यंत

त्यानें केलेल्या कृत्यांचा नीट उलगडा करतां येणार नाहीं. अशा प्रकारची पाहणी करणें हें त्रासाचें नसलें तरी कालावधीचें खास आहे. तदभावीं अब्दालीचें सुंदर स्वभावचित्र आपणांस पहावयास मिळणार नाहीं हें खरें असलें तरी रूपरेखा पाहतां येणें कठीण नाहीं. तेव्हां येथें मी त्याच्या स्वभावाची रूपरेखा काढण्याचा प्रयत्न करतों. ही वाचकांस अब्दालीची ओळख पटण्यास खात्रीनें उपयोगी पडेल.

२. अहमदशाह स्वभावानें अतिशय गरीब होता. कधीं कधीं या गरिबीचा कडेलोट होत असे व त्याच्या हाताखालचे लोक त्याच्या हुकमाविरुद्ध वागत आणि त्याला टाकून बोलण्यासही कमी करीत नसत. अशा प्रसंगीं अहमदशाह मनाविरुद्ध बोलणारे व करणारे यांच्याविषयीं क्षमावृत्तीच धारण करीत असे. याविषयीं एक मजेदार गोष्ट त्याचा चरित्रकार मुहम्मदखान बारुक्झाई यानें सांगितली आहे ती अशी—

३. एकदां अब्बास कुलीखान बयात याच्या ताब्यांत असलेलें इराणांतील निशापूर शहर घेण्यासाठीं तो गेला असतां त्याला बरेच दिवसपर्यंत आपल्या सैन्याचे पगार देणें शक्य झालें नाहीं. यामुळें चिडून जाऊन त्याच्या सैन्यांतील लोकांनीं एकत्र होऊन बादशाही खजिना लुटला. याची तक्रार खजिनदारानें अहमदशाहाकडे नेली. पण त्यानें कांहींच हालचाल केली नाहीं. यामुळें खजानची रागावला व अपशब्द बोलूं लागला. यावर अब्दालीनें येवढेंच सांगितलें कीं, 'अरे मूर्खा मी त्यांच्याच मदतीनें महत्पदास चढलों आहे व त्यांना मी स्वतःचे भागीदार म्हणत आलों आहे. तेव्हां हा खजिना माझा व त्यांचा दोघांचाही आहे. अर्थात् त्यांना गरज लागेल त्या वेळीं खजिन्यांतून पैसा घेण्याचा त्यांना अधिकारच आहे. मी जर त्यांस पैसे घेऊं दिले नाहींत तर परमेश्वराचा अपराधी होईन. या गोष्टीवरून त्याच्या ठिकाणीं सहनशीलता व गरिबी किती होती हे जसें दिसतें त्याप्रमाणें आपल्या शिपायांना खूष ठेवण्यासाठीं आपल्याच लोकांनीं केलेली मानहानिही प्रसंगी तो कशी गिळून टाकी हें समजून येतें (Indian Antiquery = IA, Vol.XVI, P.302). त्याच्या अत्यंत गरीब स्वभावाचें याच चरित्रकारानें आणखीही एक उदा-

हरण दिलें आहे. पानिपतच्या लढाईनंतर अहमदशाह कंदाहाराला गेला. तेथें गेल्यावर त्याच्या मनांत उत्तम हवेच्या ठिकाणीं एक शहर वसविण्याचें आलें.पण त्यासाठीं त्यानें जी जागा पसंत केली,ती अलुक्झाई जमातींतील एका पोटजमातीच्या ताब्यांतील प्रदेशापैकीं होती व त्या जमातीस अहमदशाहानें आपल्या जागेंत शहर वसवावें हें आवडेना. म्हणून त्यानें आपला हा बेत सोडून दिला व दुसऱ्या एका जागेवर शहर वसविण्याचें ठरविलें. या वेळीं जागेची मालकी बारुक्झाई नांवाच्या जमातीकडे होती. तिनेंही त्याच्या बेतास विरोध केला; तेव्हां त्यानें आपला नवीन बेतही सोडून दिला. कारण पूर्वीप्रमाणेंच या जमातीलाही आपण दुखवूं नये असें त्यास वाटलें. शेवटीं त्याचें नातें व त्याच्या विषयीं सहानुभूति असलेल्या पोपलझाई जमातीनें जागा दिल्यावर तेथें त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें अहमदशाही नांवाचें शहर बांधलें (IA, XVI, P. 299-300).

४. त्यानें आपल्या मुलकी व लश्करी नोकरींत पाश्चात्य व हिंदी कसबी लोक ठेविले होते. या लोकांच्या साहाय्यानें त्यानें आपला तोफखाना सुधारला होता असें म्हणण्यास जागा आहे (IA, XVI, 297-300). तथापि त्याच्या सैन्यांत कडक शिस्त होती असें वाटत नाहीं. कारण अनेक वेळां त्याच्या हुकमाशिवायच त्याचे लोक लुटालूट वगैरे करीत ( IA, XVI 27). पानिपतसारख्या लढाया मारूनही त्यांचा फायदा त्यास घेतां आला नाहीं याचें कारण म्हणजे त्याचे शिरजोर असलेले शिपाई व सेनापति येथें बरेच दिवस एकसारखे राहण्यास व विशेषतः उन्हाळ्याचे दिवस येथें काढण्यास अत्यंत नाखूष असत. शिपायांचा वारंवार अंत पाहणें हेंही सेनापतीस फायदेशीर नसतें. यामुळें उत्तम लढाया मारून जो फायदा करून घ्यावयाचा तो त्यास घेतां आला नाहीं; येवढेंच काय पण अलेक्झांडरसारख्या जगज्जेत्यासही आपल्या शिपायांच्या कलाप्रमाणें वागावें लागून आपल्या आकांक्षा सोडून द्याव्या लागल्या.

५. त्याच्या सैन्यांतील लोकांवर त्याची योग्य जरब नसण्याला त्याच्या स्वभावांतील स्वजनांविषयीं किंवा स्वतःच्या सैनिकांविषयीं सौजन्य हेंही एक कारण असूं शकेल व त्याचें उदाहरण वर दिलेंच

आहे. पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं शत्रूलाही त्याची भीति वाटत नसे. उलट तो स्वजनांशीं जितकें सौजन्य दाखवी तितकीच निष्ठुरता व क्रूरपणा तो शत्रूच्या बाबतींत दाखवी. हिंदुस्थानांत ज्या ज्या वेळीं तो आला त्या त्या वेळीं त्यानें मथुरा, दिल्ली, पंजाब वगैरे ठिकाणीं भयंकर कत्तली, लुटालूट, जाळपोळ वगैरे गोष्टी केल्या व त्यामुळें येथील जाट, मुसलमान, शीख, मराठे, इत्यादींच्या मनांत त्याजविषयीं विलक्षण दहशत बसली होती. लुटालूट, कत्तल, जाळपोळ इत्यादि निष्ठुरपणाचे प्रकार राज्य व द्रव्य यांच्या तृष्णेनें तो स्वधर्मीयांशींही करण्यास कमी करीत नसे. मग परधर्मीयांची गोष्ट कशास पाहिजे? या त्याच्या निष्ठूर वृत्तीचें उदाहरणही मोठें बोधप्रद आहे. इ. स. १७५६–५७ सालीं तो हिंदुस्थानांत आला असतां दिल्लीच्या मुक्कामांत त्यानें दिल्लीचा मयत वजीर कम्रुद्दीनखान याचा मुलगा इन्तिजामुद्दौला यास दोन कोट रुपये देण्याच्या करारावर वजीर केलें. पण नेमलेल्या दिवशीं त्या रकमेपैकीं एक कोट रुपयांचा पहिला हप्ता त्यास मिळण्याचा रंग दिसेना. यामुळें त्यानें इन्तिजामुद्दौल्यास लाकडी खोडयांत घालण्याची धमकी दिली. तेव्हां लाचार होऊन त्यानें शुअलापुरी बेगमेपाशीं पैसे असल्याचें सांगितलें. बेगमही चटकन् पैशाची तजवीज करीत नाहीं असें पाहतांच त्यानें तिच्या बोटांच्या नखांतून लोखंडी खिळे ठोकण्यास फर्माविलें (IA, XXXVI ,47,48). याचा योग्य तो परिणाम होऊन त्यास सुमारें ८३ लाखांची प्राप्ति झाली. पैसे न मिळते तर यमदूतांशीं स्पर्धा करणाऱ्या त्याच्या नसक्चींनीं योग्य रीतीनें चाकरी बजाविण्यास कमी केलें नसतें. अशी खात्री असल्यामुळें त्यानें केवळ दहशतीनेंच अनेक कामें उरकलीं. अब्दालीच्या या निष्ठूर व लोभी वृत्तीचें वर्णन एका मराठी पत्रांत उत्कृष्ट रीतीनें केलें असून तें येथें दिल्यावाचून माझ्यानें राहवत नाहीं. हें वर्णन अब्दाली इ. स. १७५६।५७ सालच्या स्वारींत दिल्लीस राहिल्यावेळचें आहे. पत्रलेखक म्हणतो, 'अब्दालीचे वर्तमान तरी दिलीत किल्यात आहे. खानखानाचे मायेपासून तीन करोड रुपये घेतले व

खानखानास वेगळाच ताणून क्रोड रुपये घेतले. वजिरापासून ५० लक्षांचे जवाहीर व नक्त ५० लाख घेऊन कैदेत ठेवले आहे व खानखानही कैदेत आहे. कुल शहरात सध्या खणत्या लाविल्या आहेत. पाच रुपये पावेतो माणसापासून निघाले ते घेऊन खजिन्यात दाखल करतो. शहरात जो ज्याचे घरी राहिला तो त्याचेच म्हणून वर्तणूक करतो. माणसे बहुत मारली गेली व स्त्रिया बहुत भ्रष्टिल्या. कित्येकानी प्राण दिले व कित्येकानी जलप्रवाह केला. जितक्या बादशाहजाद्या होत्या, तितक्यास आपले लोकास विवाह करून दिल्या. जितक्या पातशाहाच्या बायका व शाहाजाद्यांच्या होत्या त्या आपले घरात निका पढून घातल्या. जेथवरी चांगली बायको हिंदूची होती तेथवर लोकानी बाटविल्या व आपल्या घरात घातल्या. (पेशवे दप्तर भाग २१, ले. १०४). हें वर्णन दिल्लींतून तत्कालीं लिहिलेलें असल्यामुळें त्यांत सत्याचा अंश फार आहे हें सांगावयास नकोच. त्यानें मथुरा, वृंदावन व जाटांचें ठाणें बल्लमगढ या ठिकाणीं जी कत्तल, जाळपोळ व लुटालूट केली त्यांचें विस्तृत पण अंगावर शहारे आणणारें वर्णन, या गोष्टी ज्यानें स्वतः पाहिल्या अशा एकानें केलें आहे. त्यावरून त्याच्या ठिकाणीं क्रूरपणा, निष्ठुरता वगैरे गोष्टी किती मोठ्या प्रमाणांत होत्या हें वरील दोन्ही वर्णनांपेक्षांही अधिक उत्तम कळून येतें (IA, XXXVI, 59,60,62).

६. अब्दालीची जरब किंवा दहशत शत्रुपक्षीयांस किती वाटत असे हें अनेक ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून चांगलें स्पष्ट होत आहे. पानिपतच्या लढाईनंतर इ. स. १७६२ सालीं शीखांचा पाडाव करण्यासाठीं तो हिंदुस्थानांत आला होता. त्या वेळचें वर्णन वाकिआत-इ-दुर्रानीमध्यें एके ठिकाणीं आलें आहे. त्यांत या पुस्तकाचा कर्ता अब्दुलकरीम म्हणतो, ‘एक दिवशीं रात्रीं तो एकदम उठला व कांहीं घोडेस्वार आपल्या बरोबर घेऊन हिंदुस्तानांत आला. ज्या वेळीं तो जंदियालला पोहोंचला त्या वेळीं त्याजबरोबर फक्त १०।१२ लोक होते. तरी त्याच्या नांवाची दहशत लोकांस इतकी बसली होती कीं, तेथील शीख सैन्य ही बातमी ऐकतांच पळून गेलें. भाऊसाहेबांनीं अब्दालीशीं ठासून लढाई दिली हें खरें;

पण त्यांच्या पत्रांत अनेक ठिकाणीं अब्दालीच्या सैन्याच्या नुसत्या आवईनें मराठी ठाणेदार आपलीं ठाणीं टाकून पळत असत असें नमूद असून अशा लोकांच्या बाबतींत 'तिकडे त्यांची फौज आली तर ठाणेदार मरत न पळत' (राज. १।२१७), 'यद्यप पेंच पडल्यास झुंजत, परंतु कांहीं भय मानून कांहीं जागा न सोडीत' (सदर२०८) असें करण्याबद्दलचा हुकूम त्यानें गोविंदपंत बुंदेल्यास पाठविला आहे. येवढेंच नव्हे तर 'जो ठाणें टाकून अवाईनेंच येईल त्याचें पारपत्य तुम्ही उत्तम प्रकारें करावें (सदर १९५) अशी परवानगी भाऊसाहेबांनीं गोविंदपंत बुंदेल्यास देऊन टाकली होती. अब्दालीच्या भयानें लोक गर्भगळित होऊन घरेंदारें सोडून पळून जात असत व शहरें ओस पडत अशा प्रकारचे अनेक उल्लेख आले आहेत. फौज बाळगून राहणाऱ्या लोकांचीही अशीच स्थिति होती (पेशवे दप्तर २१।१०३, १०७; राज. १।६३, १४१-१४३).

७. तो अनुभवानें हळूहळू शहाणा होत गेला. यामुळें मागील अनुभवाचा उपयोग करून घेण्यांत त्याचा हातखंडा असे. याविषयीं एक बोधप्रद हकीकत आहे ती अशी:- इ. ११६३ मध्यें अहमदशाहानें इराणचा राजा शाहरुख याला उखडून टाकण्यासाठीं प्रथम हिरात येथें असलेल्या त्याच्या सरदारास मारून हिरात घेतलें. नंतर मशहद येथें असलेल्या शाहरुख यासही बेजार करून त्याजकडून आपणांस अनुकूल असा तह करविला. यानंतर निशापूर घेण्याच्या उद्देशानें त्यानें आपला मोर्चा त्या शहराकडे वळविला. तेथील सरदार अब्बास कुलीखान यास कळून चुकलें कीं, आपला टिकाव अहमदशाहापुढें लागणार नाहीं. तेव्हां त्यानें आपलया चुलत्याच्या सल्ल्यावरून निराळाच डाव टाकला. या वेळीं कडक हिवाळा सुरू होण्यास दोन महिने अवकाश होता. अब्बास कुलीखानानें अब्दालीशीं एकदम तहाचें बोलणें सुरू केलें व तें दोन महिने लांबविलें. दोन महिन्यांनंतर ज्या वेळीं कडक हिवाळा सुरू झाला तेव्हां अहमदशाहास कोणत्याही प्रकारच्या हालचाली करणें अशक्य झालें. एवढेंच नव्हे तर पूर्वी तरतूद केलेली नसल्यामुळें निशापूरचा वेढा चालू ठेवणें म्हणजे स्वतःच्या सैन्याचा पुरा नाश हेंही त्यास

कळून चुकलें. एव्हां त्याच्या हेंही पक्कें ध्यानांत आलें कीं, अब्बास कुलीखानानें आपणांस तहाचें बोलणें सुरू करून पूर्णपणें फसविलें. या वेळीं त्याच्या मनांत अब्बास कुलीखानाविषयीं राग व सूड यांच्या भावना अवश्य उत्पन्न झाल्या असल्याच पाहिजेत. पण आपला तोल अविचाराच्या बाजूस जाऊं न देतां किंवा लोक आपणांस काय म्हणतील याची बिलकूल पर्वा न करतां तो तेथून हिरातला निघून गेला. हिरात येथें गेल्यावरही कडक थंडीमुळें त्याच्या सैन्याचा नाश व खराबी फार झाली. यावरून नमतें कोठें घ्यावें व कोठें घ्यावयाचें नाहीं म्हणजेच पर्यायानें सारासारविचारशक्ति ही त्याच्या ठिकाणीं जागृत होती असें दिसून येतें. या वेळचा कटु अनुभव तो जन्मांत कधीं विसरला नाहीं. हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांत अनेक ठिकाणीं याच युक्तीचा अवलंब करून शत्रुसैन्यें जेरीस आणण्याचे त्यानें प्रयत्न केले व बहुतेक ठिकाणीं त्याचे प्रयत्न यशस्वीही झाले (IA, XVI, 266, 267). उदाहरणार्थ तहाची थाप देतां देतांच दत्ताजीचा नाश नजीबखानानें घडवून आणिला. भाऊसाहेबांशींही अब्दालीची तहाची वाटाघाट बरेच दिवस चालू होती. दोन्ही वेळां तहाची वाटाघाट निष्फळ ठरल्यावर दोघांनाही दिसून आलें कीं, आपणांस शत्रुपक्षानें फसविलें आहे. भाऊसाहेब फसले गेले असा मराठी पत्रांचा जरी आशय नसला तरी युद्धाचे अगोदर मराठ्यांच्या लश्करांत महागाई व अब्दालीच्या लश्करांत स्वस्ताई, मराठ्यांना रसद पोहोचेना व अब्दालीस मात्र भरपूर रसद मिळत होती. नाना फडणिसाच्या पत्रांत 'लश्कर गडबडलें' सारखे असलेले विचार या गोष्टी काय दाखवितात ? ही तहाची भूलथाप देण्याची युक्ति त्यानें आपल्या हिंदुस्थानावरील पहिल्या स्वारींत स्वतःचा पराजय होत असतांनाही उपयोगांत आणली होती. तिचा परिणाम असा झाला कीं, या स्वारींत जरी त्यानें माघार घेतली तरी तसें करण्यांत त्याचें नुकसान शक्य तितकें कमी झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याच्या या वर्तनाचें सार मॅकिएव्हेलीनें 'war is strategem' या सूत्रांत केलें आहे. या सूत्राप्रमाणें त्यानें अनेक ठिकाणीं आचरण केलें हें मात्र खरें.

८. अब्दालीच्या युद्धपद्धतींत आणखीही एक विशेष आहे. तो बहुधा जेथून त्याचें भय कमी अशा ठिकाणाहूनच अगदीं अनपेक्षितपणें येत असे. यामुळें शत्रुसैन्यांत एकदम गडबड उडून जाई. तसेंच लोकांच्या अपेक्षेपेक्षांही लवकर तो चालून येत असे. यामुळेंही त्याच्या शत्रूंमध्यें गडबड उडे. 'अब्दाली अकस्मात आला' अशा प्रकारचे उल्लेख आढळतात (राजवाडे १।१५०). या गडबडीचा योग्य तो फायदा घेतल्याशिवाय तो कधींच राहात नसे. याचीं उदाहरणें त्यानें केलेल्या स्वाऱ्यांत पदोपदीं आढळतात व युद्धांतील डावपेचांविषयीं एके ठिकाणीं चांगलें पहावयास सापडतें. इ. स. १७५६।५७ च्या स्वारींत एकदां समशेर बहादर, अंताजी माणकेश्वर, जाट, वगैरेंनीं त्याला त्रास देण्यास सुरवात केली. तेव्हां त्याजवर त्यानें अब्दुस्समदखानास सांगितलें कीं, तूं आपल्या सैन्यासह लपून बैस व शंभर लोकांना त्यांच्यावर पाठीव. या शंभर लोकांनीं मारामारी करीत व माघार घेत लपलेल्या लोकांपर्यंत यावें व नंतर लपलेल्या लोकांनीं बाहेर पडून शत्रूचा मोड करावा. या युक्तीप्रमाणें वागून अब्दुस्समदनें जय मिळविला (IA, XXXVI, 48,49). असें करीत असतां त्यास मोठाल्या मजली कराव्या लागत व त्याप्रमाणें तो करीत असावा असें त्यानें अनेक वेळां लोकांना दिङ्मूढ केल्यावरून वाटतें. याचमुळें भाऊसाहेबांच्या एका पत्रांत 'चाळीस कोस पन्नास कोस धावतात' अशी वदंता अब्दालीविषयीं लिहिलेलीं आढळते (राज. १।२६१). पण याविरुद्ध एका तवारिखेत 'तो एक दिवस पांच कोस जाई व दुसरे दिवशीं मुक्काम करी. एखादे दिवशीं जास्त चाल झाली तर तो एकापेक्षा जास्त दिवस मुक्काम करी असें विधान आहे (IA,XXXVI, 155). मला वाटतें हें विधान कांहींसें अपुरें असावें. या नियमास अपवाद एकसारखे घडत असले पाहिजेत. याशिवाय भाऊसाहेबांच्या पत्रांत दिलेली समजूत तत्कालीं प्रचलित होणें शक्य नाहीं. प्रसंगविशेषीं आलेली संधी साधण्यासाठीं जिवावर बेतण्याचा ज्यांत संभव आहे अशा प्रकारचें धाडस करण्यासही तो कमी करीत नसे. याचें उत्तम उदाहरण पानिपतच्या युद्धांतच

आपणांस पहावयास सांपडतें तें असें:– कुंजपुऱ्यास अब्दुस्समद-खान व कुतुबशाह यांचा भाऊसाहेबांनीं पाडाव केला हें समजल्याबरोबर अहमदशाहास राग आला व त्यांच्या मदतीस जाण्यासाठीं किंवा मराठ्यांशीं लढण्यासाठीं त्यानें ताबडतोब यमुना उतरण्याचें ठरविलें; पण यमुनेस पाणी फार होतें. तेव्हां आपल्या हाताखालच्या खास गुलामांच्या सैन्यास नदी उतरण्याची त्यानें आज्ञा केली. पलीकडे उताराच्या रखवालीस असलेल्या मराठी सैन्यानें नदी उतरणाऱ्या लोकांवर गोळ्या झाडण्यास सुरवात केली. तेव्हां हा स्वतः पुढें झाला व नदी उतरूं लागला. हें पाहून त्याच्या लोकांस स्फुरण चढलें व बंदुकींच्या माऱ्यास न जुमानतां त्याचें बहुतेक सैन्य अलीकडे आलें (IA, XVI, 272).[1] अशा धाडसी लोकांबद्दल मॅकिएव्हेलीनें एके ठिकाणीं म्हटलेंच आहे कीं, ' I certainly think that it is better to be impetuous than cautious, for fortune is a woman and it is necessary, if you wish to master her, to conquer her by force...and therefore, like a woman, she is a friend to the young, because they are less cautious, fiercer and master her with greater audacity.

९. अहमदशाह एखाद्या फकिराप्रमाणें रहात असे. तो अगदीं सामान्य मनुष्याप्रमाणें कपडे घाली व त्यामुळें कधीं कधीं तो शत्रूस ओळखूंही येत नसे (IA, XVI, 302; E. D. VIII, 10). त्याला लोकांनीं आपणांस लवून सलाम करावे म्हणजे स्वतःस लोकांनीं फार पूज्य समजावें हें आवडत नसे व म्हणून त्यानें लोकांस चालू पद्धतीनें सलाम करण्याची बंदी करून त्याजपुढें येतांना फक्त डोक्यास हात लावावा असें मुलाकरवीं फर्माविलें होतें (सदर). तो विद्वानांचा एवढा मोठा चहाता होता कीं, दर शुक्रवारीं विद्वान व वृद्ध लोकांना एकत्र बोलावून शास्त्रें व इति-

१ याबाबत मराठी बखरी व पत्रें यांतून नदीला उतार नसल्यामुळें अब्दालीचें सैन्य नदी उतरून येतांना थोडें खराब झालें असें सांगितलें आहे. त्याचबरोबर भाऊसाहेबांनीं दिल्ली ते कुंजपुऱ्यापर्यंत असलेल्या उतारांचें रक्षण होण्याची व्यवस्था केल्याचे उल्लेख अस्सल पत्रांतून आले आहेत.

ह्यास यांवर चर्चा करवी व त्यांचा सन्मान करीत असे (सदर).

१०. तो मुसलमानी धर्मांतील आचारविषयक आज्ञा उत्तम तऱ्हेनें पाळीत असावा. त्याबद्दल इतर धर्मीय लोक त्यास नांवेंही ठेवणार नाहींत. पण सामीन यानें निरनिराळ्या ठिकाणीं अहमदशाह अब्दालीच्या तोंडांत किंवा अहमदशाहाविषयीं बोलतांना इतरांच्या तोंडांत जीं वाक्यें घातलीं आहेत तीं वस्तुस्थितिनिदर्शक अशीं मानलीं तर अहमदशाह परधर्माचा–विशेषतः हिंदूंचा– मोठा द्वेष करीत असावा असें म्हणतां येतें (IA, XXXVI, 62, 63, 65). या द्वेषाचें अगदीं हिडीस उदाहरण सामीननें मथुरेच्या कत्तलींत स्वतः पाहिलें होतें व त्याचें त्यानें वर्णन केलें आहे तें असें :– मी यमुनेच्या कडेला बैराग्यांच्या व संन्याशांच्या कित्येक झोपड्या पाहिल्या. त्यांपैकीं प्रत्येकींत मनुष्याच्या मुंडक्याच्या तोंडास गाईचें मुंडकें लागेल अशा बेतानें दोन्ही मुंडकीं एकमेकांस बांधून टाकलेलीं होतीं (IA, XXXVI, 62).

११. अब्दालीच्या स्वभावचित्राची रूपरेखा थोडक्यांत वर वर्णन केल्याप्रमाणें काढतां येईल. ही रूपरेखा आरंभींच सांगितल्याप्रमाणें जरी स्वभावचित्र पूर्णपणें डोळ्यासमोर उभें करीत नाहीं तरी त्याची ओळख पटवून देण्यास पुरेशी आहे असें वाटतें.

---

# १८. निजामाचें वुइल व सरकारांचा भ्रम

१. 'मॉडर्न रिव्ह्यू' या सुप्रसिद्ध इंग्रजी मासिकाच्या इ. १९४८ ऑगस्टच्या अंकांत पृ. १०३, १०४ वर सर जदुनाथ सरकार यांचा 'पहिला आसफजाह ते उस्मान अली' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. याच लेखाचा अनुवाद 'विशाल भारत' या हिंदी मासिकाच्या इ. १९४८ ऑगस्टच्या अंकांत आला आहे. मला त्यांच्या या संपूर्ण लेखाविषयीं येथें कांहीं एक म्हणावयाचें नाहीं. पण या लेखांत प्रसिद्ध केलेल्या एका पत्राकडे माझे मित्र प्रा. रा. वि. ओतूरकर यांनीं लक्ष वेधिल्यावर मला दिसून आलें कीं, त्यांनीं या

लेखांत त्या पत्राविषयीं एक भ्रम उत्पन्न केला आहे त्याचें निरसन करणें आवश्यक आहे. तेव्हा तें येथें थोडक्यांत करतों.

२. या लेखांत आरंभींच सर जदुनाथ सरकार यांनीं 'हैदराबादच्या निजामानें एक मृत्युपत्र अथवा वुइल करून ठेवलें होतें आणि त्यांत त्यानें गंभीरपणें आपल्या वारसांना बजाविलें आहे कीं, असें सांगून पुढें त्या वुइलमधील पहिल्या दोन कलमांचें इंग्रजी भाषांतर, त्याचा मूळ फार्सी पाठ, ज्या कागदावरून त्यांनीं हीं दोन कलमें घेतलीं त्याचा त्या दोन कलमांपर्यंतचा फोटो इत्यादि गोष्टी दिल्या आहेत. हा मूळ कागद निजाम सरकारच्या दप्तरखान्यांत असल्यामुळें त्याच्या अधिकृततेविषयीं व प्रामाणिकतेसंबंधीं प्रश्न उत्पन्न करणें शक्यच नाहीं असें सरसाहेबांनीं ठासून सांगितलें आहे. पण सर जदुनाथ सरकार यांनीं यांत सर्वत्र चुकाच चुका करून ठेविल्या आहेत. अर्थात् त्यांनीं करून ठेवलेला घोटाळा नाहींसा करण्याचें काम येथें करणें आवश्यक आहे. हें तथाकथित वुइल हदीकतुलआलम या ग्रंथांत फार पूर्वी प्रकाशित झालें आहे हें येथें नमूद करतों.

३. या दोन कलमांचा म्हणजेच फोटोंतील एकंदर नऊ ओळींपैकीं उण्यापुऱ्या दोन ओळींचा पाठ इंग्रजी लिपींत देत असतांना त्यांनीं (अ) मुळांत असलेले शब्द इंग्रजी पाठामध्यें मधून मधून गाळले आहेत. (आ) मधल्या दोन ओळींचा पाठ अजीबात दिला नाहीं ( कदाचित् त्यांना त्यांचा पाठ देण्याची जरूरी वाटली नसेल). (इ) शब्दांचें विपरीत वाचन दिलें आहे. (ई) शब्दांची आनुपूर्वी बदलली आहे. (उ) दुसऱ्या कलमाच्या मूळ पाठांत नसलेले शब्द इंग्रजी पाठांत आणून दाखविले आहेत. (ऊ) या सर्वांचें कारण दिसतें तें असें कीं, फोटो दिला पत्राचा आणि लिप्यंतर दिलें हदीकतुलआलममधील (दुसरें पुस्तक, पृ. १७९). या गडबडगुंड्याविषयीं मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं, ही बौद्धिक फसवाफसवी आहे.

४. 'हें वुइल' कशावरून हा मुख्य प्रश्न आहे. फोटोंतील पहिली ओळ नमनार्थक किंवा मंगलार्थी असून दुसऱ्या ओळीच्या आरंभीं **विसाया** हा शब्द आहे. हा **वसियत** शब्दाचें बहुवचन आहे. त्याचे

अर्थ कोशांत उपदेश, आज्ञा, इच्छा, शेवटच्या इच्छेचे शब्द असे दिले आहेत. तेव्हां येथें वुइल म्हणजे मृत्युपत्र असाच अर्थ घेण्याची आवश्यकता आहे कोठें ? कै. रा. ब. पारसनीस यांनीं इतिहास-संग्रहांत या तथाकथित वुइलचा मराठी अनुवाद दिला आहे. (पेशवे दप्तरांतील सनदापत्रांतील माहिती पृ. ३१७). तेथें त्यांनीं या प्रकरणास 'निजामुल्मुल्क यांनीं मृत्युसमयीं मुलास केलेला उपदेश' असा मथळा दिला असून अनुवाद संपूर्ण वाचला म्हणजे हें वुइल नसून उपदेश कसा आहे तें उत्तम तऱ्हेनें प्रतीत होतें. मात्र या अनुवादाच्या शेवटीं दिलेली माहिती या तथाकथित वुइलचा नकलीपणा उत्तम तऱ्हेनें सिद्ध करीत आहे.

५. या तथाकथित वुइलच्या प्रस्तावांत (मुख्यतः ओळ २ व ३) **मघफरतमाब** इत्यादि मेलेल्या मनुष्यास लावावयाच्या विशेषणांनीं युक्त आसफजाह यांनीं सोमवार ता. ४ जमादिलाखर हि. ११६१ रोजीं झालेल्या स्वतःच्या महाप्रयाणाच्या वेळीं नबाब नासिरजंग **शहीद** यास बऱ्हाणपूर येथें केलेला उपदेश असें विधान आहे.

६. कागद प्रामाणिक किंवा अधिकृत ठरावयाचा तर त्यांतील कालाचा तपशील अचूक असला पाहिजे. येथें तसा दिसत नाहीं. या तथाकथित वुइलमध्यें हि. ११६१ जमादिलाखर ४ या तारखेस सोमवार (दूशंबा) होता म्हणून सांगितलें आहे. पण गणितानें शनिवार येतो. तेव्हां येथें वार तरी चुकला असेल किंवा तारीख तरी चुकली असावी. सर्वत्र ४ जमादिलाखर हीच तारीख दिली आहे. तेव्हां वार चुकला असला पाहिजे हें उघड आहे. अधिकृत कागदांत अशी चूक होतां कामा नये; पण झाली आहे त्या अर्थी हा कागद या तारखेनंतर केव्हां तरी लिहिला असून त्यांत वार अंदाजानें दडपून दिला आहे यांत शंका नाहीं.

७. पहिला निजाम ता. २१।२२ मे १७४८ रोजीं बऱ्हाणपूर येथें मेला. नासिरजंग ता. ५ डिसेंबर १७५० रोजीं मारला गेला अर्थात् शहीद बनला. या प्रस्तावांत मरणोत्तर योजावयाचीं विशेषणें पहिल्या निजामास लाविलीं असल्यानें हा कागद पहिल्या निजामाच्या मरणानंतर लिहिला असला पाहिजे आणि नासिर-

जंगास शहीद हें विशेषण लावलें असल्यानें हा कागद नासिर-जंगाच्या खुनानंतर लिहिला असला पाहिजे हें उघड आहे. सर्व लिखाण एक टाकी असल्यानें प्रस्ताव मागाहून दुसऱ्या कोणी जोडला असें म्हणण्याची सोयच नाहीं. पहिला निजाम जिवंत असतांना त्यानें हें वुइल केलें असतें तर तो स्वतःला उपर्युक्त मृत्युदर्शक विशेषणें कशीं लावून घेईल आणि आपल्या जिवंत मुलास शहीद = हुतात्मा हें विशेषण कसें लावील?

८. अशा परिस्थितींत हा कागद निजाम सरकारच्या दप्तर-खान्यांत असण्याऐवजीं निजामाच्या अत्यंत मूल्यवान् खजिन्याच्या पेटींत ठेवलेला व सोनेरी शिडकाव असलेल्या वेलपत्ती किनारीच्या मोहरेदार कागदावर मोत्यासारख्या सुवर्णाक्षरांनीं लिहिलेला असता, तरी त्याचा अधिकृतपणा व प्रामाणिकपणा सिद्ध होण्याची यत्किंचित् शक्यता नव्हती.

९. सध्या मंडळांत मजकडे या तथाकथित वुइलची एक प्रत आली आहे. तीमध्यें सर जदुनाथ सरकारांच्या प्रतीप्रमाणें मूर्ख-पणाचा प्रस्ताव नाहीं आणि कै. रा. ब. पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलेल्या उपदेशाच्या अखेरीस असल्याप्रमाणें उपसंहार किंवा समाप्तीहि नाहीं. याच्या आरंभीं आसफजाहाचा निजामुद्दौला यास बऱ्हाणपुरीं केलेला उपदेशलेख (वसियतनामा) एवढेंच काय तें सांगितलें आहे. पारसनिसांनीं दिलेल्या अनुवादाच्या शेवटीं 'येणें-प्रमाणें गोष्टी सांगितल्या ते वेळेस नासिरजंग षहीद यांस दुःख जालें ... या लिहिण्याची नकल नि(जि)याउद्दी(द्दीन)हुसेन यांचे हातची होती. ते सदरासदर (सद्रुस्सुदूर) .... कै. आसफजाह यांचे होते. नासिरजंग यास बोलावण्यापूर्वीं कैलासवासी याजपाशीं बसलेच होते. या गोष्टी ऐकून पेन्सिलीनें कागदावर लिहून ठेविल्या. परंतु ... मुडद्याबरोबर रोजास जाऊन कबरेचे मुजावर जाहले व पुढें सात महिन्यांनीं वारले, असा मजकूर आहे. यांतील गैर-लागू मजकूर मीं गाळला आहे. ही हकीकत खरी कीं खोटी हें सांगतां येत नाहीं. कारण हिला उपोद्बलक पुरावा मला आढळला नाहीं. पण ही खरी मानावयाची तर असें म्हटलें पाहिजे कीं, मूळ

उपदेश—वुड्ल नव्हे—सद्रुस्सुदूर जियाउद्दीन हुसेनखान यानें पेन्सिलीनें लिहिला आणि मग त्याच्या ता. ५।१२। १७५० नंतर प्रती झाल्या. अशा अनेक प्रतींपैकीं एक सर जदुनाथ सरकार यांस मिळाली आणि त्यांनीं तीस प्रमाणपत्र दिल्यामुळें वाचकांची दिशाभूल झाली आहे. सर जदुनाथ सरकार यांच्या कागदाचा प्रामाणिकपणा ठरविण्याच्या याच पद्धति असतील तर त्यांच्या अभिनव ज्ञानास कोपरांपासून हात जोडतों आणि तसल्या ज्ञानापासून आम्हांस दूर ठेव अशीच परमेश्वरास प्रार्थना करतों.

---

# १९. मराठ्यांचे दिल्लीचे वकील हिंगणे

१. सध्याप्रमाणेंच पूर्वीं प्रत्येक महत्त्वाच्या तीर्थाच्या ठिकाणीं कांहीं तीर्थोपाध्ये असत. तीर्थयात्रा करणारा मनुष्य अशांपैकींच एखाद्यास आपला तीर्थोपाध्याय बनवी. मग त्या मनुष्याच्या वंशांतील इतर पुरूष त्या तीर्थोपाध्यायाच्या वंशजांकडे आपलें तीर्थोपाध्येपण चालवीत. मराठ्यांचे दिल्लीचे पिढीजाद वकील हिंगणे यांचें घराणें निदान मिर्झा राजा जयसिग इ. १६२६ मध्यें प्रथम दक्षिणेंत आला तेव्हांपासून जयपूरच्या कछवाहांचे नाशिकचे तीर्थोपाध्ये बनलें होतें. त्या वेळीं या घराण्यांतील पुरूष जानभट तीर्थोपाध्याय होता. जानभटाचा मुलगा पुरुषोत्तम, नातू पद्माकर, पणतु गोविंद व खापरपणतु महादेवभट. हा महादेवभट जयसिहाचा पणतु सवाई जयसिह याचा तीर्थोपाध्याय बनला.

२. महादेवभटाची हुशारी पाहून बाळाजी विश्वनाथ त्यास दिल्लीच्या वारींत आपल्या बरोबर घेऊन गेला होता असें कोठें तरी अस्सल साधनांत वाचल्याचें स्मरतें. पहिल्या बाजीरावाच्या कारकिर्दींत प्रथम प्रथम महादेवभट मराठ्यांच्या इतर अनेक वकिलांप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील सवाई जयसिहादि निरनिराळया संस्थानिकांकडे आणि दिल्लीच्या बादशाहींतील इराणी पक्षापैकीं खाने दौरां,यादगारखान, इत्यादि उमराव मुत्सद्यांकडे वकिलीसाठीं

जाऊं लागला. महादेवभटानें आपलीं कामें एवढ्या चतुराईनें केलीं कीं, मराठ्यांच्या इतर तत्सम वकिलांच्या मनांत त्याजविषयीं मत्सरभावना निर्माण झालेली दिसते. बाबाजी गणेश नांवाचा वकील बाजीराव चिमाजीस एका प्रकरणांत लिहितो, 'महादेव-भटजीचे लेखिले वेदप्रमान केले न पाहिजे ल्हाण चाकराचाहि विश्वास करून गैवर केला पाहिजे.' यावरून महादेवभटाविषयीं पेशव्यांच्या मनांत कोणत्या दर्जाचा विश्वास होता हेंहि स्पष्ट होतें.

३. तथापि महादेवभट स्वत: आपल्या परीनें कामें उत्तम तऱ्हेनें उरकण्याची खटपट करीत होताच. त्याचा परिणाम असा झाला कीं, इ. १७३९ मधील नादिरशाहाच्या दिल्लीवरील स्वारीनंतर बाबूराव मल्हार, बाबाजी गणेश, धोंडो गोविंद, यादवराव, इत्यादि मराठ्यांचे उत्तरेंतील सर्व वकील महादेवभटापुढें फिके पडले आणि अख्या उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांच्या वकिलीचें काम केवळ महादेवभटाकडेच आलें. या सुमारास त्याच्या चार मुलांपैकीं बापू, दामोदर व पुरुषोत्तम हे वयानें मोठे झाले असल्या-मुळें वकिलीच्या कामांमध्यें उण्या-अधिक प्रमाणांत महादेवभटास मदत करूं लागले होते. चौथा मुलगा दिवाकर अथवा देवराव हा ल्हान असल्यानें नाशिकास होता. या अवधींत महादेवभटाचें वजन जयपूर दरबारांत फारच वाढलें असावें. कारण इ. १७४३ मध्यें सवाई जयसिह मरतांच त्याचा मुलगा ईश्वरसिंह यानें दिल्ली-दरबारीं असलेला जयपूरचा वकील राव कृपाराम यास दूर करून महादेवभटाकडेच जयपूरतर्फेच्या वकिलातीचें काम सोपविलें. पण लवकरच इ. १७४४ च्या आरंभीं एका ल्हानशा बाचाबाचीचें चक-मकींत रूपांतर होऊन तींत महादेवभट व त्याचा मुलगा बापू हे जखमी झाले आणि महादेवभट त्याच दिवशीं वारला. पेशव्यांनीं महादेवभटाचा दुसरा मुलगा दामोदर महादेव यास लिहिलेल्या एका पत्रांत महादेवभटाविषयीं 'तुमचे बाप शाहाणे, प्रामाणिक, योग्य होते' असा अभिप्राय व्यक्त केला आहे. यावरून महादेव-भटाच्या कर्तबगारीची काहींशीं कल्पना करतां येईल.

४. महादेवभटानंतर त्याचे मुलगे बापू, दामोदर व पुरुषोत्तम

हे बापाच्या जागीं वकिलीचें काम करूं लागले. पैकीं बापू प्रायः दिल्लीस राहून बादशाह व इतर मुत्सद्दी यांजकडील काम सांभाळी आणि दामोदर व पुरुषोत्तम हे वकिलीच्या कामानिमित्त निर-निराळे राजे, सुभेदार, सरदार, यांजकडे जाऊन येऊन असत म्हणजे फिरते असत. उत्तरेंतील सर्वच वकिलातीचें काम यांजकडे आल्या-मुळें यांना अनेक ठिकाणीं आपले प्रतिनिधि नेमावे लागले. पैकीं जयपूरचे प्रतिनिधि गोविंद तमाजी व धर्मराव तमाजी यांचीं हिंगण्यांकडे आलेलीं पत्रें तपासलीं तर ते आपलें काम फार नेकीनें बजावीत होते असें दिसतें. महादेवभटाच्या तीन कर्त्या मुलांपैकीं दामोदर हा सर्वांत शहाणा होता असा पेशव्यांचा अभिप्राय आहे. बापू त्याच्या पत्रांवरून व पेशव्यांच्या अभिप्रायावरून मगरूर, शिवराळ व यामुळेंच कामांतून गेलेला पेशव्यांना दिसला. वकिलानें परराज्यांत वकिलीच्या जागीं खाजगी स्थावर-जंगम मिळकती करूं नयेत असा अलिखित नियम त्या वेळींहि होता. पण हिंगणे बंधूंनीं तो मोडून दिल्लीच्या आसपास स्थावर मिळकती केल्या-मुळें ते मराठ्यांची बाजू ठासून मांडीत नाहींत अशा प्रकारच्या तक्रारी शिंदे, होळकर, रघुनाथराव, सखारामबापू, इत्यादींनीं अने-कदां केल्यावरून इ. १७५४ व इ. १७५७ अशा दोन सालीं त्यांज-कडील वकिली काढली गेली होती. परंतु कांहीं लक्ष रुपये नजर घेऊन ती पुनः दोन्ही वेळां त्यांस बहाल केली गेली. इ. १७५६-५७ मध्यें अहमदशाह अब्दालीच्या दिल्लीवरील स्वारींत यांना दिल्ली सोडावी लागली. यांच्या अनुपस्थितींत त्यांच्या घरास द्रव्यासाठीं खणती लावण्यांत आली. इकडे दामोदर महादेवहि आजारी पडून इ. १७५७ मध्यें झाशीस मरण पावला. तथापि त्यांची वकिलात बंद पडली नव्हती. बापू व पुरुषोत्तम हे दोघेच आतां दिल्लीच्या वकिलातीचें काम पहात होते. इ. १७६६-७२ च्या दरम्यान बापू मेला. पण तोंवर धाकटा भाऊ देवराव मोठा होऊन पुरुषोत्तमास साह्य करूं लागला होता. इ. १७८३ मध्यें पुरुषोत्तम वारला. पण त्याच्या अगोदरच त्याचा मुलगा गोविंद वकिलातीचें काम पाहूं लागला होता. देवरावाचा मुलगा दामोदर हा पुढें मोठा झाल्यावर

तोहि गोविंद पुरुषोत्तमास मदत करूं लागलेला दिसतो. खुद्द देवराव फिरता राहून वकिलातीचें काम करी. इ. १८०३ मध्यें दिल्ली इंग्रजांच्या ताब्यांत गेली व इ. १८०७ मध्यें देवराव मेला. तरीहि दिल्लीची वकिलात बंद पडली नव्हती. पण इ. १८१८ मध्यें पेशवाई बुडाल्यामुळें मूळ मराठी सत्ताच संपुष्टांत आली. तेव्हां हिंगणे घराण्यास आपला दिल्लीचा गाशा गुंडाळावा लागला. त्या वेळीं कोणी ग्वाल्हेरीस, कोणी झांशीस, तर कोणी मूळ वतनी गांव चांदोरी (नाशिक) येथें येऊन राहिले. या तीनही ठिकाणीं या घराण्यांतील पुरूष आज विद्यमान आहेत.

५. अशा तऱ्हेनें सुमारें ७५ वर्षें हिंगणे घराण्यांत मराठ्यांची दिल्लीची वकिली चालली व तन्निमित्त त्या घराण्यांतील अनेक पुरूष आपल्या खाजगी व वकिलातीच्या परिवारासह दिल्लीस राहिले. एवढ्या अवधींत ते केवळ भाड्याच्या घरांत राहात असतील असें वाटत नाहीं. कागदपत्रांवरून तर असें दिसतें कीं, हिंगण्यांना वकिलातीसाठीं जंत्राच्या (जंतर-मंतर = नव्या दिल्लींत असलेली व सवाई जयसिहानें उभारलेली वेधशाळा) आवारांत जागा मिळाली होती व तेथें त्यांनीं वकिलातीच्या इमारती बांधल्या होत्या. मला वाटतें थोडा अधिक शोध घेऊन ती जागा निश्चित करतां आल्यास पहावें आणि तेथें मराठी वकिलातीचें स्मारक म्हणून एक इमारत उभारावी व तिचा उपयोग महाराष्ट्रांतून कामासाठीं दिल्लीस येणाऱ्या लोकांना उतरण्यासाठीं करावा.

६. पण जंत्रांतील हवेली ही दिल्ली शहराच्या कोटाबाहेर पडली. शहरपन्हयांतहि एक हवेली असावी म्हणून चांदणी-चौकाच्या वाटेवर पण कोटांत राजा गोविंदराय म्हणून कोणा उमरावाची हवेली होती ती, तो मेल्यावर इ. १७५९ च्या मेमध्यें त्या वेळचा मुघल बादशाह दुसरा आलमगीर यानें पुरुषोत्तम महादेव याच्या नावानें करून दिली. हिचाहि पत्ता लावण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे.

७ हिंगणे घराण्याकडे मराठ्यांच्या दिल्लीच्या वकिलातीचें काम असतांना त्यांजकडे पेशवे व त्यांचे सरदार आणि वकिलातीचे

प्रतिनिधि यांजकडून गेलेलीं कित्येक पत्रें राजवाडे खंड ६ आणि हिंगणे दप्तर खंड १ व २ यांत प्रसिद्ध झालीं असून आणखी कित्येक फार्सी-मराठी पत्रें भा. इ. सं. मंडळांत प्रकाशनाची वाट पहात आहेत. वकिलांनीं पेशव्यांकडे किंवा पेशव्यांनीं वकिलांकडे पाठविलेलीं पण बरीचशीं उत्तर पेशवेकालीन पत्रें इतिहाससंग्रहांत प्रकाशित झालीं आहेत.[1]

## २०. एका ग्रंथाचें चमत्कारिक जीवन

१. सुमारें ५।७ महिन्यांपूर्वीं सावनूरचे माझे वकील मित्र श्री. प्रल्हादराय रित्ती मोडी लिपींत व कर्नाटकी मराठी भाषेंत लिहिलेलें एक सुमारें २५० पृष्ठांचें फुलस्केप आकाराचें हस्तलिखित मजकडे घेऊन आले. त्याच्या प्रत्येक पृष्ठावर दिलेरजंग दिलेरबहाद्दूर असा सावनूर नबाबांचा फार्सी शिक्का असल्यानें हें हस्तलिखित पूर्वीं त्यांच्या किताबखान्यांत असलें पाहिजे यांत शंका नाहीं. त्यांत सावनूर नबाबांची मुळापासून इ. १८६०–६५ पर्यंतची हकीकत असून त्यास दिलेरजंगी असें नांव दिल्याचें आढळलें. हें पुस्तक थोडें चाळून पाहिल्यावर माझ्या एका मुंबईकर मित्रानें सुमारें १०–१२ वर्षांपूर्वीं सावनूर नबाबांविषयीचें एक उर्दू किंवा फार्सी हस्तलिखित मला दाखविल्याचें स्मरण झालें. या मित्रानें पुरविलेल्या माहितीवरून त्या पुस्तकाचा मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयांत मी शोध घेतला. तेव्हां तेथील ग्रंथसंग्रहांत फार्सी भाषेंतील व छापील असें दिलेरजंगी नांवाचें पुस्तक मिळालें. पुढें धारवाडास गेलों असतां याच फार्सी पुस्तकाची आणखी एक प्रत आढळली. हें

1 महादेवभट व त्याचे मुलगे त्यांच्या तोडीचा किंवा यांहून काकणभर सरसच असा अमृतराव शंकर नांवाचा आणखी एक मराठ्यांचा वकील होता. त्याचा संचार तर सर्व भारतभर चाललेला आढळतो. तोहि इ. १७५८ च्या आरंभीं एका लहानशा चकमकींत मारला गेला. त्याजकडील कागदपत्र प्रकाशित होणें अगदीं आवश्यक आहे.

पुस्तक लिथो प्रेसमध्यें छापलें असल्यानें दोहोंमध्यें वास्तविक फरक असण्याचें कारण नाहीं. पण मुंबईच्या प्रतीचा विशेष हा कीं, तींत सावनूरचा वंश आणि त्यामधील चार नबाब यांचीं रंगीत पण हातानें काढलेलीं चित्रें घातल्याचें आढळलें. हें पुस्तक हि. १२५५ म्हणजे इ. १८३९ मध्यें बहुधा मुंबईस छापलें असावें. पण विद्यापीठी प्रतींत कोणी तरी मागाहून पांच चित्रें घातलीं. पण मौज पुढेंच आहे. धारवाडास अधिक शोध घेतां या फार्सी पुस्तकाचा मराठी साररूप अनुवाद मोडी लिपींत व कर्नाटकी मराठी भाषेंत इ. १८६० सालीं लिथो पद्धतीनें छापलेला आढळला. या गोष्टीचा निर्देश त्या पुस्तकाच्या शेवटच्या पानावर केला आहे तो असा: धारवाड येथें सुपरिटेंडेंट रिविन्यु सर्वे दक्षण मराठ कंत्री यांचे छापखान्यांत मेहेरबान अब्दुल दलेलखां दलेल जंग बहादुर यांनीं दिलेलें बुकावरून यांचेच निरोपाप्रमाणें छापलें सन १८६० इसवी. अब्दुल दलेलखान यांनीं दिलेलें पुस्तक माझ्या वकील मित्राच्या पुस्तकाहून कांहींसें निराळें होतें यांत शंकाच नाहीं.

२. या छोट्याशा हकीकतीवरून दिसून येईल कीं, एका सामान्य पुस्तकानें वीस वर्षांच्या अवधींत चार रूपें धारण केलीं. मग जेव्हां छापखाने नव्हते, लहान मोठ्या प्रत्येक पुस्तकाच्या प्रती हातानेंच कराव्या लागत, तेव्हां त्या करतांना किती फरक पडत असेल? आणि प्रतींचें पौर्वापर्य, सरसनिरसता ठरविणें किती कठीण जात असेल याची कल्पनाच केलेली बरी. एवढ्यासाठींच हजारों हस्तलिखितें जमविणें आवश्यक असतें.

---

## २१. कागलचे घाटगे

१. आपल्या 'सकाळ' पत्राच्या ८ डिसेंबर १९५५ च्या अंकांत विजापूरची एक बातमी छापली आहे. तींत विजापुराजवळ जालगेरीच्या वाटेवर दर्गा गांवची महार मंडळी श्रमदानानें विहीर खणण्याचें काम करीत असतां त्यांना सुमारें दोन पुरुष खोलीवर

अचानक एका मोठ्या पायऱ्यांच्या हौदाचा किंवा विहिरीचा पत्ता लागला. या हौदाभोवतीं उत्तम फरशी केलेली आढळली असून हौदास भरपूर पाणी लागल्यामुळें खोदण्याचें कामही बंद ठेवावें लागलें. या गोष्टीचा आणखीही तपशील देऊन शेवटीं या हौदाचे आसपास सर्जेराव घाटगे यांचें जुनें निवासस्थान होतें म्हणतात अशा तऱ्हेचें विधान आहे. आपल्या बातमीदारानें हें विधान कशाच्या आधारावर केलें हें मला समजण्यास मार्ग नाहीं. पण मी आज बरेच महिने विजापुरास घाटग्यांची जागा कुठें असेल याच्या शोधांत आहे. विजापुरांतील माझ्या मित्रांना लिहून कांहीं पत्ता लागतो कां असा प्रयत्न मी करून पाहिला; पण त्यांत मला म्हणावें तसें यश आलें नाहीं. तथापि मी घाटग्यांच्या जागेचा शोध करण्यास तरी कसा प्रवृत्त झालों हें सांगितल्यास विजापूरचा एखादा स्थाईक व चौकस मनुष्य याविषयीं आणखी शोध घेण्याची शक्यता आहे, हें जाणून मी माझ्या प्रयत्नाविषयीं थोडेंसें लिहीत आहे.

२. गेल्या वर्षी शिवचरित्रसंशोधनाच्या कामासाठीं कोल्हापुरास गेलों असतां तेथील सरकारी दप्तरखान्यांतील कागदपत्रांचे रुमाल तपासण्याचा प्रयत्न केला. विशेषतः तेथील फार्सी कागदपत्रांचे सुमारें तीस रुमाल मीं तपासले. त्यांत तर विशेष महत्त्वाचे कागद आढळले नाहींत. हां! कांहीं पत्रसंग्रहांचीं बांधीव पुस्तकें होतीं; पण एक तर मला ते सर्व पत्रसंग्रह बारकाईनें तपासण्याएवढी तेव्हां सवड नव्हती आणि अशा पत्रसंग्रहांत मूळ पत्रांच्या हस्तें परहस्तें मिळविलेल्या नकला असल्यामुळें पुराव्याच्या दृष्टीनें अशा पत्र-संग्रहांना दुय्यम स्थान असतें. म्हणून मी त्यांवर लक्ष केंद्रित केलें नाहीं. पण तेथील अधिकारी श्री. शिंदे यांनीं त्या दप्तरखान्यांत कागलच्या घाटग्यांकडील सुमारें तीस फर्मानें असल्याचें माझ्या निदर्शनास आणलें. तेव्हां एखाद्या अधाश्याप्रमाणें मीं त्या फर्मानांची तात्काल तपासणी केली. त्यावेळीं मला त्या कागदांत पुष्कळ चमत्कार आढळले. चमत्कार म्हणजे अविश्वास्य,अद्भुत असें कांहींच नव्हतें; पण त्यांत विद्वानांनीं केलेलीं विधानें सपशेल खोटीं ठरविणारी व अगदींच नवीन अशी पुष्कळ माहिती आढळली. उदाहरणार्थ रा.

ब. डॉ. सरदेसाई यांनीं आपल्या मराठी रियासतीच्या उत्तर विभागाच्या तिसऱ्या खंडांत कागलच्या सर्जेराव पदवीधारी तुळजोजी उर्फ सखाराम (हें चूक दिसतें; तुळजोजी सखारामाचा बाप आहे असें वाटतें) घाटग्याची माहिती दिली आहे (इ. १७९७). पण त्याचें पूर्ववृत्त कांहीं दिलें नाहीं. फॉरेस्टसारखा साक्षेपी व सरकारी दप्तरखान्यांत काम करणारा विद्वान् तर The family is of modern origin असा शेरा मराठा सीरीजच्या पहिल्या खंडांत मारतो आणि सखाराम व त्याचा भाऊ विश्वासराव या दोन पुरुषांपासूनची माहिती देण्यास सुरवात करतो. कैफियती, यादी, वगैरे या पुस्तकांत अशींच अगदीं मामुली माहिती दिली आहे. तीवरूनही घाटग्यांचें घराणें किती पुरातन असावें याविषयीं कांहींच कल्पना करतां येत नाहीं. उलट कल्पना करावयाचीच झाली तर हें घराणें अगदीं अलीकडचें म्हणजे पेशवाई अखेरअखेरचें आहे असें म्हणावें लागेल.

३. उलट या फर्मानांपैकीं एकही औरंगजेबाच्या काळानंतरचें आढळलें नाहीं. यामुळें माझ्या पुढें प्रश्न आहे तो हा कीं, तुळजोजी घाटगे आणि या फर्मानांत आलेले घाटगे यांचा वांशिक संबंध कसा लावावयाचा? या घाटगे घराण्याचे आणखी विशेषत: पेशवाईतील कागदपत्र पाहिले म्हणजे तुळजोजीची फर्मानांतील लोकांशीं वांशिक सांखळी जुळवितां येईल व जुळविली पाहिजेही. पण इथें सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, विद्वान् हें घराणें आधुनीक म्हणून सांगून बसले आणि फर्मानें तर हें घराणें अत्यंत प्राचीन मराठी घराण्यांपैकीं एक आहे असें सिद्ध करीत आहेत. या फर्मानांपैकीं केवळ इ. १६५४ चें एक फर्मान आहे तेवढ्याचाच विचार केला तरीही पुष्कळ मुद्द्यांवर चांगला प्रकाश पडत आहे. पण प्रथम फर्मान सदरांत पडणाऱ्या कागदांचें महत्त्व समजावून घेतलें पाहिजे.

४. फर्मान म्हणजे खाजगी कागद नव्हे किंवा एखाद्या लुंग्यासुंग्या अधिकाऱ्यानें सोडलेला हुकूमही नव्हे. फर्मान म्हणजे देशांतील सर्वश्रेष्ठ सत्ताधाऱ्यानें केलेली आज्ञा असते. ती आज्ञा होण्यापूर्वीं आज्ञाविषयाची अगदीं खालच्या थरांतील अधिकाऱ्यांपासून ते

सर्वश्रेष्ठ सत्ताधाऱ्यापर्यंत चौकशी झालेली असते. नंतर सर्वश्रेष्ठ सत्ताधाऱ्यानें केलेला निर्णय त्या फर्मानांत अंतर्भूत असतो. आतां हे निर्णय नेहमींच न्यायबुद्धि अगदीं जागृत ठेवून केलेले असतात असें म्हणतां येणार नाहीं. सध्याच पहा ना, जो निर्णय एका जज्जाच्या मतें अगदीं न्याय्य असतो तोच दुसऱ्याच्या मतानें चुकीचा ठरतो. वशिला, लाचलुचपत, इत्यादींचा कांहींही संबंध नसतां केवळ कोणत्या पुराव्यास किती महत्त्व द्यावयाचें व विशिष्ट कायदा किंवा नियम याचा अर्थ कसा करावयाचा या मुद्द्यांवर मतभेद होऊन खालच्या कोर्टांतील निर्णय वरच्या कोर्टांत फिरविला जातो. मग पूर्वींच्या जमान्यांत असें होत असल्यास त्यांत नवल कसलें ? तथापि सर्वश्रेष्ठ सत्ताधाऱ्यानें केलेला निर्णय व त्यासाठीं त्यास पुरविलेली माहिती यांचा फर्मानांत समावेश असेल तर त्या फर्मानास फार महत्त्व आहे. अशा प्रकारचें हें फर्मान आहे एवढें सांगून त्यांतील माहितीकडे वळतों.

५. हें मुहम्मद आदिलशाहानें हि. १०६४ म्हणजे इ. १६५४ मध्यें दिलें आहे. या फर्मानांत कित्येक लक्ष्य गोष्टी नमूद केल्या आहेत त्या अशा:—या घराण्याचें मूळचें आडनांव सूर्यवंशी होतें. एकदां या घराण्याचे पूर्वज लखमोजी व रामोजी हे रसद घेऊन बेदरास चाललेअसतां एका घाटांत त्यांना कांहीं सैनिकांनीं अडविलें. तेव्हां त्यांनीं त्या शिपायांना दूर सारून घाट घेतला व दळणवळणास मोकळा केला. म्हणून त्यांस घाट घे-घाटगे-घाडगे असें आडनांव पडलें. याच घराण्यांतील कांहीं लोक विजयनगरच्या रामराजाच्या म्हणजे राक्षसतागडीच्या अथवा लोकांत प्रसिद्ध असलेल्या तालिकोटच्या लढाईत पतन पावले. या घराण्यांत लखमोजीच्या वंशांत अनुक्रमें लखोजी-गंगोजी-सांबाजी-विठोजी-कोयाजी हे पुरूष झाले. कोयाजीला रामोजी, तुकोजी, जाखोजी व विठोजी असे चार मुलगे होते. पैकीं तुकोजीचा मुलगा विरोजी. पुढें याच वंशांत पदाजी व त्याचा मुलगा नरसोजी हे झाले. हे सर्वजण आदिलशाही सेवक होते. पण याच घराण्यांतील आबाजी, राघोजी व विठोजी हे हरामखोरी करून निजामशाहीचे चाकर बनले. नरसो-

जीलाः पदाजी, आबाजी व मुंतोजी असे निदान तीन मुलगे होते. पैकीं पदाजीचा मुलगा सर्जेराव आणि आबाजीचा अनसोजी. अशा रीतीनें कागलच्या घाटगे घराण्यांत सामान्यतः इ. १६५० पर्यंत होऊन गेलेल्या बावीस पुरुषांचीं नांवें या एकाच फर्मानांत आलीं आहेत.

६. कागलची मूळ देसगत म्हणजे देशमुखी कोणी मिळविली हें या फर्मानावरून सांगतां येत नाहीं; पण सर्जेराव हा या घराण्यांतील अत्यंत कर्तृत्ववान पुरूष असावा. आदिलशाहींतून यालाच विजापूर येथें वाडा, विहीर, लश्कराच्या बराकी, बाग, इत्यादींसाठीं ६०० गज लांब व १७५ गज रुंद म्हणजे एक लाख पांच हजार चौरस वार इतकी जमीन बहाल केल्याचें हि. १०६२ म्हणजे इ. १६५२च्या मुहम्मद आदिलशाहाच्या दुसऱ्या एका फर्मानावरून कळून येतें. पुण्यांतील लोकांना या जागेची कल्पना द्यावयाची तर या जागेचा विस्तार शनवारवाड्याच्या जागेच्या साडेतीन पट मोठा होईल.या जागेच्या खाणाखुणाही फर्मानांत दिल्या आहेत त्या अशाः– ही शहापूर पेठेंत अराब्याबाहेर (गाड्यांच्या तात्पुरत्या कोटाबाहेर ) पण पेठेच्या भुसारवली दरवाजाच्या बाजूची हजऱ्यापासून लड नांवाच्या ओढ्यापर्यंत, तसेंच कोटाच्या बाजूस सार्वजनिक रस्त्यापर्यंत होती. अशा वर्णनाची जमीन कोठें येऊं शकेल किंवा महार मंडळींना सापडलेला हौद या जमिनींत पडूं शकेल कां, हें पाहण्याचें काम विजापूरच्या स्थानिक व चोकस मंडळींनीं मनावर घेतलें तरच होऊं शकेल. आदिलशाही कारकिर्दींत अनेक ब्राह्मण-मराठे सरदारांचीं घरें व वाडे विजापुरास असतील. मी अशा अनेक घराण्यांचे कागदपत्र पाहिले आहेत. पण एकांतही एखाद्या घराण्याला एवढी मोठी जमीन विजापूरच्या परिसरांत दिल्याचें आढळलें नाहीं.

७. कागलच्या घाटग्यांना सर्जाराव अशी आनुवंशिक पदवी लावल्याचें आढळतें ती याच सर्जेरावामुळें असावी. वर उल्लेखिलेल्या लोकांपैकीं पदाजी व आबाजी हे मलिक रैहान नांवाच्या आदिलशाही सरदाराबरोबर अदोनी किल्ल्यांत चाकरीवर होते असेंही फर्मानांत सांगितलें आहे. आदिलशाही जमान्यांत ब्राह्मण-मराठे

सरदार किती लांबवर जात होते हें वेदाजी-शहाजीच्या उदाहरणां-वरून आपणांस चांगलें ज्ञात आहे. यामुळें घाटगे अदोनी किल्ल्यांत चाकरीवर होते यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. या फर्मानांपैकीं एकांत सिदोजी, कान्होजी, विठोजी, संताजी, महा-लोजी असे पांच निबाळकर घराण्यांतील पुरूष जतेच्या बाजूस मुकासे करून असल्याचें सांगितलें आहे. हें लोक फलटणच्या घराण्याशीं साक्षात् संबद्ध नव्हते असें वाटतें. शिवकालांत फलटणच्या घरा-ण्याशीं संबंध नसलेलीं अशी कांहीं निबाळकर मंडळी मराठी सैन्यांत सरलश्करीच्या व इतर हुद्द्यांवर होती. त्यांपैकीं ही असा-वीत. शेषाद्री हेमाजी बाबर असा एक गृहस्थ यांतील दोन फर्मा-नांत आला आहे तोही कोण व कोठला हें समजत नाहीं.

८. या फर्मानांवरून तर असें भासतें कीं, कागलचे घाटगे हे मोठे तोलदारीचे सरदार होते. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, यांपैकीं एकाही फर्मानांत या घाटग्यांनीं शिवकालांत एखाद्या मोहिमेंत महत्त्वाची कामगिरी बजाविली असल्याचें सांगितलेलें नाहीं. एवढ्या मोठ्या घराण्यांतील एकही मनुष्य एखाद्या स्वारीवर गेल्याचें आढळत नाहीं हें अेक आश्चर्यच आहे. या फर्मानांतच नाहीं तर इतर कागदांत तरी कसा आढळावा ? मग सर्जेराव हा किताब आणि विजापूरच्या परिसरांत एवढी मोठी जागा तरी यांना कां मिळावी हें कांहींच उमगत नाहीं.

९. शिवाजी महाराज ही एक अशी महनीय व्यक्ति होऊन गेली कीं, सतराव्या शतकांतले आणि महाराष्ट्र—कर्नाटक यांतील कोणत्याही देशमुख-देशपांडे घराण्यांतले कागद घेतले तरी त्यांत त्यांविषयीं कांहींना कांहीं निर्देश आढळलेच पाहिजेत. पण हींच फर्मानें अशीं आढळलीं कीं, यांत शिवाजी महाराजांविषयीं अवा-क्षरही नाहीं.

१०. कांहीं असो; कागलच्या घाटग्यांचीं हीं फर्मानें चमत्कृति पूर्ण आहेत एवढें निश्चित. या घराण्यांतील आणखी कागद पहा-वयास मिळाले तर या फर्मानांतील घटनांवर आणि एकंदर शिव-कालीन इतिहासावर अगदीं नवा प्रकाश पडण्याचा संभव आहे.

---

## २२. शिवाजी महाराजांची भवानी तलवार?

१. स्वातंत्र्यसेवक, स्वराज्यसंस्थापक आणि क्रांतदर्शी अशा शिवाजी महाराजांबद्दल नितान्त आदर नसणारा माणूस महाराष्ट्रांत तरी विरळाच! त्यांच्या भवानी तलवारीबद्दलहि महाराष्ट्रांत फार औत्सुक्य आहे. थोडे दिवसांपूर्वीं लोकशक्तीमध्यें त्याविषयीं एक स्फूट प्रसिद्ध झालें होतें. मुंबईच्या लोकसत्तेमध्येंही हिजविषयीं एक लेख छायाचित्रासह प्रसिद्ध झाला आहे. एतद्विषयक आणखीही कांहीं लेख आज–काल प्रसिद्ध झाले असतील व कदाचित् होतील. प्रकाशित लेखांचा सूर असा दिसतो कीं, शिवाजी महाराजांची प्रसिद्ध भवानी तलवार आतां निश्चयानें सापडली असून प्रथम पदमजींकडे असलेली व आतां कॅ. मोदी यांजकडे गेलेली तीच ती भवानी तलवार होय. याबाबत तज्ज्ञांचें एकमतही झालें असून योग्य किंमतींत मिळाली तर भारत सरकार ती राष्ट्रीय प्रदर्शनगृहासाठीं खरेदीही करणार आहे अशी कांहींची समजूत झालेली आहे. पण याबाबत वस्तुस्थिति अगदीं निराळी आहे.

२. भवानी तलवारीचें प्रमाणभूत असें वर्णन आज उपलब्ध नाहीं. परमानंदाच्या शिवभारतांत आणि हरि कवीच्या शंभुराज चरित्रांत हिचा निर्देश आला असला तरी त्यांत हिची लांबी, रुंदी, धार, मूठ, पातें, पोलाद, तीवरील चिन्हें, जडाव वगैरेंचें काम इत्यादि तपशील दिलेला नाहीं. शिवाय परंपरागत अशीही माहिती उपलब्ध नाहीं. म्हणून आज एखाद्यानें एखादी तलवार पुढें आणून ती भवानी असल्याचें सांगितलें तर त्याचें तोंड बंद करणें शक्य नाहीं. तरीही इतिहास हें पुराव्याचें शास्त्र असल्यानें आणि असा पुरावा त्या व्यक्तीस देतां येत नसल्यानें तज्ज्ञ त्याच्या शब्दास कधींच मान्यता दाखविणार नाहींत. पदमजी–मोदी तलवारीची तीच गत आहे. ती तलवार आज २०।२५ वर्षें लोकांपुढें असतांना कोणाही मराठी इतिहासवेत्त्यानें ती भवानी असल्याचें आपलें मत पुराव्यासह नमूद केलेलें आढळत नाहीं. जुन्या व कौतुकास्पद वस्तूंचे केवळ संग्राहक व विक्रेते यांपासून फार सावध रहावें

लागतें. सामान्य जनतेच्या डोळ्यांत केव्हां धूळ फेकली जाईल हें सांगतां येत नाहीं.

३. तरीहि भवानी तलवारीचा शोध इतिहाससंशोधकांनीं अजीबात केला नाहीं असें नाहीं. साताराच्या राजवाड्यांतील भवानी मंदिरांत असलेली तलवारच भवानी होय ही जशी एक समजूत, तशी भवानी तलवार इंग्लंडांत आहे अशी दुसरी समजूत. सुमारें ३० वर्षांपूर्वी कै. विनायकराव भावे यांनीं ब्रिटिश म्युझियमशीं बराच पत्रव्यवहार केला. पण त्यांतून निष्पन्न झालें तें असें कीं, भवानी तलवार ब्रिटिश म्यूझियममध्यें नाहीं. तदनंतर श्री. वा. सी. बेंद्रे इंग्लंडला गेले असतां त्यांनीं भवानी तलवारीविषयीं बराच शोध केला. त्यांत त्यांस जी तलवार बकिंगहॅम पॅलेसमध्यें पहावयास मिळाली व जिचा फोटोही उतरविला आहे, तीवर Jesus Humanum salvador या शब्दांचा संक्षेपभूत J. H. S. असा अक्षरसमूह तीनदां कोरला आहे. तेथील वस्तुसूचींत सातवा एडवर्ड प्रिन्स ऑफ वेल्स असतांना त्यानें इ. १८७५–७६ सालीं कोल्हापूरला दिलेल्या भेटीच्या वेळीं तेथील महाराजांनीं शिवाजी महाराजांची वस्तू म्हणून ही तलवार एडवर्डास नजर केली असें नमूद आहे. पण ही भवानीच आहे असें म्हणण्याजोगा पुरावा कांहींच उपलब्ध नाहीं. कोल्हापूरच्या श्री. कोडोलीकरांनींही या बाबत कांहीं प्रयत्न केला असून त्याचें फलित काय तर हेंच कीं, इ. १८७५–७६मध्यें एडवर्डाला, कोल्हापुरांत दोन तरवारी दिल्या गेल्या. पैकीं एकीचें नांव जगदंबा असें होतें. तरी त्यांनाही भवानी तलवारीचा छडा लावतां आला नाहीं.

४. सारांश, हा कीं भवानी तलवार कोठें आहे याविषयीं कोणतीच प्रमाणभूत माहिती आज उपलब्ध नसून ती मिळविण्याचा प्रयत्न प्रथम केला पाहिजे. अशी माहिती मिळाल्यावर तिजशीं पदमजी–मोदी किंवा आणखी एखादी दावेदार तलवार ताडून पाहून मगच निर्णय केला पाहिजे. उगाच कोणी तरी कांहीं तरी पुढें आणावें, त्यांस अर्धवटांनीं मान्यता दाखवावी आणि अज्ञ जनतेंत गैरसमज उत्पन्न व्हावे हें उचित नाहीं.

---

## २३. शहाजीविषयीं नवी माहिती

१. येथें ज्या कागदांचे सारांश देत आहे, ते आदिलशाही फार्सी फर्मानें असून, त्यांचे मालक हैदराबाद (आतां मद्रास) येथील मुहम्मद घौससाहेब हे होत. इ. १९३८ मध्यें पुण्यास झालेल्या इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनचे बैठकीच्या निमित्तानें कमिशननें भा. इ. सं मंडळांत जें लहानसें प्रदर्शन भरविलें होतें, त्यांत हे कागद मांडण्यांत आले होते. माझें लक्ष त्यांकडे जातांच मी त्यांचीं टिपणें करून घेतलीं. त्या टिपणांवरून पुढील सारांश तयार केले आहेत. यांपैकीं कांहीं फर्मानांचे विस्तृत व बाकीच्यांचे अगदीं त्रोटक सारांश सर जदुनाथ सरकार यांच्या 'हाउस ऑफ शिवाजी' या पुस्तकांत मि. घौस यांच्या मालकीचा निर्देश न करतांच प्रसिद्ध झाले आहेत (३ री आवृत्ति पृ. ७७ व पुढें). असे महत्त्वाचे कागद मि. घौस यांनीं संरक्षिले आहेत, याबद्दल आपण सर्व जण त्यांचे आभारी असले पाहिजे. मी त्यांना पूर्वीं खासगी रीत्या व मंडळातर्फें अनेकदां विनंती केली होती आणि आतां जाहीर रीत्या विनंती करतों कीं, त्यांनीं मूळ फर्मानें अवश्य प्रसिद्ध करावीं. अख्खा महाराष्ट्र त्याबद्दल त्यांजशीं कृतज्ञ राहील.

२. शहाजीनें बंगलूर, तंजावर इत्यादि भागांत आपल्या उत्तर वयांत ज्या हालचाली केल्या तत्संबद्ध माहिती यांत आली आहे. हिचा नीट उलगडा आजच होण्यासारखा नाहीं. पण मि. मुहम्मद घौस यांच्या हातून हे कागद मूळ रूपांत लवकर प्रसिद्ध करण्याचें न जमल्यास निदान यांचे सारांश तरी विद्वानांपुढें यावे, या हेतूनें ते येथें प्रसिद्ध करीत आहे. हे केवळ टिपणांवरून तयार केले असल्यानें यांत तारखा, नांवें इत्यादि बाबतींत क्वचित् कोठें चूक झाली असण्याचा संभव आहे. मूळ पाठ प्रसिद्ध झाल्यावर अशी चूक दुरुस्त करतां येईल. यांतील पहिलीं नऊ मुहम्मद आदिलशाहानें धाडलीं आहेत.

३. हि. १०५२ जिल्काद १९; श. १५६४ माघ व. ५; इ. १६४३ जाने. ३०

काजी सईद यानें जाणावें कीं, या वेळीं फर्जंद शाहजी भोसले यानें [मदुरेच्या] त्रिमल नायकाची राज्यनिष्ठा व सेवा यांची

हकीकत सांगितली. म्हणून त्याचें ऊर्जित करून त्यास पंजाचें फ़र्मान पाठविलें आहे. आतां हें फर्मान शाहजीकडे पाठवावें. आणखी असें कळलें कीं, शाहजीस त्याच बाजूस नियुक्त केलें आहे. फार चांगलें केलें. तो मदतीबाबत जे लिहील त्याप्रमाणें कुमक करीत जावी. म्हणजे तो त्या बाजूच्या गनिमांस नेस्तनाबूद करील.

४. हि. १०५३ जखर १४; श. १५६५ भाद्र.व. १; इ. १६४३ ऑगस्ट २०

शाहजी भोसले यानें जाणावें कीं, विश्वासू नरसिंगराव याच्या अर्जावरून ध्यानांत आलें कीं, यापूर्वी जमेत हजर करण्याविषयीं इतर सरदारांप्रमाणें तुलाहि हुकूम सुटला असतां तू फिकिरींत पडला आहेस. तरी तूं समजावेंस कीं, इतरांप्रमाणें तुलाही हुकूम झाला एवढेंच. हुकूम होई तों तुझें मन निर्धास्त होतें. कारण तुझा विश्वास व जमेतीचें ऐक्य कायम होतें. आमचा विश्वास आहे कीं, तू हुजूरचा जुना चाकर आहेस. तू जमेतीकडून सतत हुजूरचें काम करून घेशील. तुझी राज्यनिष्ठा, कार्यज्ञातृत्व, चाकरी व प्राणार्पणता हे गुण आम्ही जाणतों. तू सर्व तऱ्हेनें संतुष्ट रहावें. फिकीर करूं नये. आमचें तुजवर वाढतें लक्ष आहे. नरसिंगरावाच्या लिहिल्यावरून तुजवर फार कृपा आहे असें समजावें.

५. हि. १०५४ मुह. २८; श. १५६६ अ. चैत्र व. ३०; इ. १६४४ मार्च २८

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, तूं पाठविलेला राज्यनिष्ठेविषयींचा अर्ज़ ध्यानांत येऊन पसंतीस उतरला. नबाब खान बाबा शाहाणे आहेत व तू दूरदर्शी आहेस. म्हणून आम्ही नबाबांस हुकूम केला आहे कीं, त्यांनीं राज्याच्या हिताचें दिसेल तें करावें आणि सिवाप्पाच्या विनंतीप्रमाणें योग्य दिसेल तसा तह करावा. तसेंच राज्यहिताच्या इतर कामांत गर्क असावें. तुला हिताचें वाटेल तें तू नबाबांचे नजरेस आणावें म्हणजे ते निर्णय देतील. तिकडील हकीकत नेहमी इकडे लिहून पाठवीत जावी. (पाठीवरील शेरा) इक्केरी येथें नबाबाकडून आलें.

६. हि. १०५६ जिल्काद २४; श. १५६८ मार्ग. व. ११; इ. १६४६ डिसें. २२

असदखानानें जाणावें कीं, बाजी घोरपडे यास अंबरखानाबरोबर मसलतीसाठीं कर्नाटकच्या तर्फेस मुद्दाम नियुक्त केलें आहे.

तरी हें फर्मान पावतांच तुजजवळ बाजी घोरपड्याचे भाऊ व जमाव असतील त्यांस निरोप द्यावा. म्हणजे ते ताबडतोब उपर्युक्त खानापाशीं जातील. याविषयीं क्षणाचाही उशीर लावूं नये.

७. हि. १०५७ सफर २५; श. १५६८ फाल्गुन व. १२; इ. १६४७ मार्च २३

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, तुझेजवळ असलेलें भेटीचें (नजरेचें) द्रव्य व हत्ती आणि हुजूरची पागा यांस हुजूरकडे पाठवून द्यावें असा पूर्वी हुकूम केला होता. आतां हुकूम होतो कीं, अअजमखानावर जबाबदारी टाकून आणि स्वतःची जमेत व हुजूरचो पागा त्याजबरोबर देऊन भेटीचें द्रव्य व हत्ती यांसह मोठ्या हुशारीनें त्यास बंगलूरच्या सरहद्दीपर्यंत पोचवावें. तेथून तुझा मुलगा संभाजी भोसले यानें स्वत.ची जमेत बरोबर देऊन द्रव्य, हत्ती व हुजूरची पागा यांसह अअजमखानास दरबाराकडे आणून पोचवावें. हा हुकूम पावतांच वरील काम समजेल तसें पण काळजीनें व हुशारीनें करावें.

८. हि. १०५७ रवल २४; श. १५६९ चैत्र व. ११; इ. १६४७ एप्रिल २०

बेचप्पा रघुनाथ यानें जाणावें कीं, कुतबशाहानें जो प्रदेश ताब्यांत आणला आहे त्यांतून दहा लाख होन व पंचवीस हत्ती द्यावयाचे आणि मलिक अब्दुल–वहहाब यानें जो अधिक प्रदेश ताब्यांत घेतला आहे तो सोडून द्यावयाचा असा करारमदार पूर्वी झाला होता. यास कोणाचाही विरोध नव्हता. याच बाबतींत महाराज फर्जंद शाहजी भोसले व अंबरखान यांनीं जे करारमदार व शपथा दिल्या असतील आणि करतील ते करारमदार व देतील त्या शपथा आमच्या आहेत असें समजावें. रायलवर करावयाच्या मोहिमेविषयीं आमच्या मनांत कोणताही किंतु नाहीं. परंतु उपर्युक्त रक्कम व हत्ती पाठविण्यांत दिरंगाई कां करतां ? आतां जरूर आहे कीं, उपर्युक्त महाराज व खान यांनीं केलेल्या करारमदारां-वर विश्वास ठेवून रक्कम व हत्ती ताबडतोब पाठवून द्यावे. आपली निष्ठा व्यक्त करून स्वतःचें ऊर्जित करून घ्यावें.

९. हि. १०५७ रबर ९; श. १५६९ वैशाख शु. १२; इ. १६४७ मे ५

महाराज शाहजी भोसले यानें जाणावें कीं, या पूर्वी

जासुदाच्या सतरा जोड्या बंगलूर किल्ल्यापासून डाक बसविण्या-साठीं लश्कराबरोबर पाठविल्या होत्या. आतां त्यांपैकीं बारा जोड्या जासूद व कासिदही तुजकडे पाठविले आहेत. तरी जागो-जाग डाक बसवून प्रत्येक जासूदजोडीस दर महा सव्वातीन होन व मुक्कामावर असलेल्या प्रत्येक जासूद जोडीस दरमहा सव्वा दोन होन, तीन दुवल व बेल एवढा तनखा जासूद खात्याच्या जाबत्या-प्रमाणें देत जावा.

१०. हि. १०६१ रम. १६; श. १५७३ भाद्र. व. ३; इ. १६५१ ऑगस्ट २३

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, तुझ्या सुभ्यांतील तंबाकू (नांवाच्या करा) चा हशील लश्कराबरोबर असलेले हत्ती, घोडे, उंट व इतर यांच्या चराईसाठीं दिला आहे. तरी तो वसूल करून तंबाकू खात्याचे मुतालीक सांगतील त्या-प्रमाणें व्यवस्था करावी.

११. हि. १०६३ रवल १५; श. १५७४ माघ व. २; इ. १६५३ फेब्रु. ४

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, चिक बाळा-पूरचा मोकासा तुला दिला असतां वझीरे हुकूमत खान मुहम्मद मुबारिझुद्दीन यानें अडथळा केला आहे. तरी चिक बाळापूर तुजकडेच कायम करून तसें उपर्युक्त खानास कळविलें आहे. तू त्याजवर ताबा चालवावा.

१२. हि. १०६७ जखर १३; श. १५७९ चैत्र शु. १५; इ. १६५७ मार्च १९

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, तू त्या मनुष्याची (?) राज्याविषयींची निष्ठा व शुद्ध हेतू सांगितलेस ते पटले. आतां तू त्याशीं जो करार करशील त्याप्रमाणें व्यवस्था फर्माविली जाईल. त्या राज्यनिष्ठानें तू सांगशील त्याप्रमाणें सेवा बजावावी. यांतच त्याचा उत्कर्ष आहे.

१३. हि. १०६७ रम. ७; श. १५७९ आषाढ शु. ९; इ. १६५७ जून १०

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, सरकार चाकरींतील हेजीब नरहर तिमाजी यास हुजूर बोलाविलें होतें. आतां त्यास परत तुजकडे पाठविलें आहे. तरी तुझ्या सुभ्यांतील

हकीकत व बातमी त्याजकडून लिहवीत जावी. सरकारी चाकरींतील भानजी व्यंकटाद्रि अमीनराव यास हुजूर पाठवून द्यावें. तंबाकूच्या हशिलापैकीं भानजोस द्यावा लागणारा अर्धा होन रोजमरा नरहर तिमाजीस देत जावा.

१४. हि. १०६८ रम. ४; श. १५८० ज्येष्ठ शु. ५; इ. १६५८ मे २७

महाराज फर्जंद शाहजी भोसले यानें जाणावें कीं, शिवाजी भोसल्याचा राज्यद्रोह व उन्मत्तपणा यामुळें तुझें मनांत सध्या भय उत्पन्न झालें आहे कीं, कदाचित् त्याचे कसूरीचा दोष आपल्या माथीं लादला जाईल. तरी तूं असें समजावें कीं, शिवाजीचे अयोग्य आविष्कार व कार्यें आम्हांस पूर्ण माहीत आहेत. म्हणून शिवाजीच्या कसूरीशीं तुझा कांहींहि संबंध नाहीं. त्याची कसूर व गुन्हे यांची जिम्मा त्याजवर आहे. एतदर्थीं तुझे मनास पूर्ण समाधान असूं द्यावें. तुजवर पूर्वीपेक्षांहि अधिक कृपा आहे. याचें गमक म्हणून पूर्वीची सर्व जागीर तुला बहाल करतों. तीमध्यें थोडाहि बदल होऊं नये. बंगलूर किल्ल्याच्या आसपासचे मनेवारांनीं तुजबरोबर संबंध ठेवावे असेंहि फर्मावितों. तुजविषयीं कोणी कमजास्त सांगेल त्यावर आमचा गहजब होईल.

१५. हि. १०७० रजब ५; श. १५८२ चैत्र शु. २; इ. १६३० मार्च ३

व्यंकोजी भोसले यानें जाणावें कीं, मुहम्मदी धर्माचा प्रसार करणें हा आमचा हेतु असल्यानें आमचा नेहमीं जय होतो. उदाहरणार्थ, सध्या काफिर, हरामखोर सीवा यानें बंड उभारल्यामुळें सीदी जोहर सलाबतखान यास लश्करासह त्याचा नाश करण्यासाठीं पाठविलें. तो रवाना झाल्यावर सीवाच्यानें त्याशीं लढणें शक्य न होऊन तो पळाला व त्याचें लश्कर विस्कळित झालें. आतां इस्लामी लश्कर त्याचा पाठलाग करीत असून थोडक्याच अवधींत त्यास कैद अथवा नष्ट करील. हें ऐकून तू बादशाही दैवाचे आभार मानावेस.

१६. शाहजी राजे यांनीं सुखी असावें. लिहिलें होतें कीं, बहलूलखान व आम्ही यांत सल्ला झाला. आपणांस कळावें कीं, त्यामुळें आम्हांस आनंद झाला. फार चांगलें झालें. दोहोंमधील प्रेम

वाढो. नबाबाबरोबर एकदिल होऊन राज्याचे कल्याणाबाबत प्रयत्न करावा. विरुद्ध जाऊं नये.

---

# २४. मराठ्यांच्या इतिहासाचें संकलन-माझें हृद्गत

१. The material collected by these expeditions has become boundless, and urgently needs systematic research and elaboration. That task to-day is more urgent than the continuation of excavations. The great public interest in archaeological exploration brings financial support to excavations more readily than to studies and publications, and contributes to the fact that students with insufficient archaeological training develop, for the romance of it, into excavation. Excavating is but one method of archaeological research; it is what experiment is to natural science. It produces evidence for problems that change with and depend upon the momentary stage of our knowledge. Excavating is an art but no autonomous branch of archaeology. Without intimate knowledge of the exact position of the problems, the excavator cannot solve them, nor even observe correctly in spite of all good will. And no observation at all can satisfy the demands of future problems. If research does not keep pace with excavating, the excavator is like an experimenter run away from the scientist. He collects at random and misses the things that matter. For not everything is of equal importance and the scale for importance is the ever changing state of our knowledge.

वर दिलेला उतारा प्रो. हेर्झफेल्ड यांच्या ईरान इन् दि एन्शण्ट ईस्ट या सुप्रसिद्ध ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणांतून घेतला आहे. प्रो. हेर्झफेल्ड यांनीं आपला सारा जन्म इराण व त्याशीं संलग्न प्रदेश यांतील उत्खनन व संशोधन आणि उपलब्ध सामग्रीचें संकलन हीं करण्यांत घालवून उपर्युक्त ग्रंथाप्रमाणें आणखी कित्येक अपूर्व ग्रंथ प्रकाशित केले आहेत. तेव्हां संशोधन व संकलन या दोन्ही विषयांत त्यांचा अधिकार फार मोठा आहे हें उघड ठरतें.

२. वरील विचार त्यांजकडून व्यक्त होण्यास निमित्त कारण इराणमध्यें तर ऑरेल स्टाईन व इतर यांनीं संचार व उत्खनन करून जमविलेला सामग्रीसंभार झाला असला तरी वरील विचार प्रत्येक देशांतील व प्रत्येक विषयांतील संशोधकसंकलकांनीं जरूर ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. संशोधनाच्या प्रगतीसाठीं उत्कृष्ट संकलनाची किती आवश्यकता आहे हेंही उपर्युक्त विचारांत चांगलें व्यक्त झालें आहे; तसेंच उत्खननामध्यें संचरणाचा समावेश केल्यास वरील विचार भारतीय आणि विशेषतः महाराष्ट्रीय इतिहाससंशोधनाचें परिस्थितीस पुष्कळच जुळणारे आहेत असें समजण्यास हरकत नाहीं. मला तर ते विचार एखाद्या अंतर्ज्ञानी योग्यानें आमच्या इतिहाससंशोधनपद्धतीस अनुलक्षून काढले असल्यासारखे भासतात. हिंदुस्थानच्या इतिहासाला सामान्यतः उपयुक्त अशी कितीतरी सामग्री आजवर उपलब्ध व प्रकाशित झाली आहे; पण ती इतकी विखुरलेली व विविध आहे कीं, तिचें एकत्रीकरण करून तीवरून उत्कृष्ट संकलित इतिहास लिहिणें अनिवार्य होऊन बसलें आहे. केंब्रिज हिस्ट्री ऑफ इंडियाच्या पाच खंडांनीं हें काम अंशतः केलें असलें तरी त्यानें कोणाचेंच समाधान होणारें नाहीं. त्यांत आत्मीयता तर नाहींच; पण प्रमाणबद्धता, एकतानता, समतोलपणा हे गुण तरी कोठें आहेत ? इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस, अलीगड विद्यापीठ, भारतीय विद्याभवन, काशी विद्यापीठ, यांच्याही संकलित इतिहासाच्या योजना आहेत. पण त्यांचीं प्रकाशनापर्यंत प्रगति झालेली नाहीं. यामुळें त्यांच्या गुणसंपन्नतेचा कांहींच अंदाज करतां येत नाहीं. शिवाय उपर्युक्त कोणत्याही योजनेंतील मुसलमानी कालखंडाच्या बहुतेक इतिहासकथनास समकालीन कागदपत्रांचें सर्वोत्कृष्ट साधन नसल्यामुळें तो भाग पुष्कळसा सदोषच राहणार हें उघड आहे.

३. मराठी इतिहासाचे संशोधक व संकलक यांनीं तर प्रो. हेर्झ-फेल्ड यांचे वरील विचार मार्गदर्शनासाठीं सतत आपल्या डोळ्यांपुढें ठेविले पाहिजेत आणि निरुपयोगी साधनांच्या प्रसिद्धीकरणानें आपणच आपलें सरण रचीत नाहीं ना याविषयीं डोळ्यांत तेल

घालून जागरूक राहिलें पाहिजे. मराठ्यांच्या इतिहासाला उपयुक्त अशीं समकालीन पत्रव्यवहाररूप साधनें आजपर्यंत हजारोनीं प्रसिद्ध झालीं आहेत. लाखों प्रकाशनाची मार्गप्रतीक्षा करीत आहेत व कोटयवधि सहजप्राप्य आहेत. या सर्व साधनांचा पूर्ण उपयोग करून घेऊन मराठ्यांचा इतिहास लिहिला जाण्याची नजीकच्या ५।२५ वर्षांत तरी शक्यता दिसत नाहीं. पण प्रकाशित सामग्रीचाही उत्कृष्ट परिपाक असलेलीं आणि संशोधकास आपण कोठवर आलों आहों हें दीपगृहाप्रमाणें स्पष्ट दाखवून मार्गदर्शन करणारीं संकलनात्मक मराठी इतिहासावरील पुस्तकें आहेत कां असा विचार करूं लागलों तर नाहींत असें विषादकारक उत्तर मुकाट्यानें द्यावें लागतें. दुसरा उपायच रहात नाहीं.

४. रा. ब. डॉ. सरदेसाई गेलीं जवळजवळ पन्नास वर्षें मराठी इतिहासाचा व्यासंग आत्मीयतेनें करीत आहेत. या व्यासंगांतूनच त्यांच्या रियासती जन्मास आल्या. त्यांपैकीं कांहींच्या सुधारलेल्या आवृत्तीही निघाल्या आहेत. मराठ्यांचा कालानुक्रमानें तपशीलवार सबंध इतिहास सांगणारा मराठींतील एकमेव ग्रंथ या दृष्टीनें त्यांची योग्यता अपूर्व आहे हें कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं. पण संशोधकासही मार्गदर्शन होण्यासारखें संपूर्ण तपशीलवार, अद्ययावत् संशोधन त्यांत असेल अशी अपेक्षा कोणी केली तर तें मात्र युक्त ठरणार नाहीं. त्यांच्या रचनेची धाटणी आतां ठरून गेली आहे. तीमध्यें रा. ब. डॉ. सरदेसाई यांच्या हातूनच सुधारणा होईल अशी आशा करतां येत नाहीं. अर्थात् त्यांच्या रचनेंतील दोषहि आपणांस सहन करावे लागणार व रियासतींचा संशोधकांस मर्यादित उपयोग होत राहणार हें ठरलेलेंच आहे. शिवाय रियासती केवळ राजकीय इतिहासच सांगतात. आपणांस सर्वांगीण इतिहासाचें अद्ययावत् संकलन पाहिजे. असें संकलन अद्याप तरी कोणी केलेलें नाहीं. एवढेंच नव्हे तर तें केवळ एकट्याच्या हातून होण्यासारखेंही नाहीं. त्यासाठीं कित्येक वर्षें खपत राहणारें एक मंडळच पाहिजे.

५. मराठी इतिहासाला उपयुक्त असा मराठी सामग्रीसंभार

केवढा व कशा स्वरूपांत प्रसिद्ध झाला आहे हें पाहण्यासारखें आहे. राजवाडे, खरे, साने, पारसनीस, वाड, इत्यादींनीं एकाकी किंवा संयुक्त प्रयत्नानें प्रकाशित केलेल्या ग्रंथांस प्रायः सूची नाहींत. असे ग्रंथ शंभराच्या आसपास आहेत. पेशवे दप्तराच्या पंचेचाळीस भागांस फक्त निवडक व्यक्तींच्या निवडक प्रसंगांची सूची जोडली असल्यानें ती सूचीही अंशतःच उपयोगी पडणारी आहे. खऱ्यांच्या खंडांना प्रस्तावना असून त्यांत पुढें प्रकाशित केलेल्या पत्रांचा परिपाक केलेला आढळतो. पण त्यांतही संशोधनाच्या प्रगतीस उपकारक होण्याच्या दृष्टीनें कांहीं उणीवा आहेत. भा. इ. सं. मंडळ, राजवाडे संशोधन मंडळ, सत्कार्योत्तेजक सभा, समर्थवाग्देवता मंदिर यांच्या बहुतेक ग्रंथांना बऱ्यावाईट सूची आहेत.

६. पण सूची हें संशोधकास उपयोगी पडणारें केवळ एक अंग आहे. शकावली हें दुसरें व तितकेंच महत्त्वाचें अंग असून त्याचा बहुतेक साधनग्रंथांत अभावच आहे. इतिहासाला शरीराची उपमा दिली तर शकावली हा त्या देहाचा सांगाडाच होय. सांगाड्याखेरीज देह उभा राहूं शकणार नाहीं. तद्वत् शकावली-खेरीज इतिहासरचना होऊं शकणार नाहीं. ही शकावली जितकी सूक्ष्म व विस्तृत असेल तितकें अधिक ठाकठिकीचें स्वरूप इतिहासरचनेस येण्याचा संभव आहे. अशी मराठ्यांच्या इतिहासाला उपयोगी पडणारी शकावली आहे कोठें? मग उत्कृष्ट इतिहाससंकलन व्हावें कसें? अशी शकावली करण्याचे जुने व नवे प्रयत्न झालेले नाहींत असें नाहीं. पण ते सर्वव्यापी व एकाच पद्धतीचे नाहींत; शिवाय त्यांचें एकत्रीकरणही झालेलें नाहीं. मग त्यांचे शुद्धीकरण कोठून झालेलें असणार! तात्पर्य इतिहासलेखनाच्या प्रगतीच्या दृष्टीनें विस्तृत व संशोधित शकावली असण्याची आवश्यकता आहे.

७. अशी शकावली नसल्यामुळें केवढा तोटा होतो हें पहाण्यासारखें आहे. आमचेपाशीं कोणत्या घटनांच्या तारखा निश्चित व कोणत्या घटनांच्या अनिश्चित याची सूक्ष्म यादी नसल्यामुळें रा. ब. सरदेसाई यांनीं दहा वर्षांपूर्वी छा[illegible]वे दप्तरांत

शेकड्यांनीं मोजण्याइतक्या चुकलेल्या तारखा त्यांनींच दुरुस्त केल्या आहेत. आणखी कित्येक इतर करीत आहेत आणि अजून कांहीं दुरुस्त होतील. इतिहाससंकलन उत्कृष्ट होण्यासाठीं आधुनिक कालांतील भूवर्णन करतलामलकवत् ज्ञात असलें पाहिजे. त्या विषयीं अज्ञान असेल तर हालचालींचा उलगडा नीट होणार नाहीं; कित्येकदा पत्रांचे अर्थहि नीट समजणार नाहींत. मराठी इतिहासाच्या अभ्यासकांस याची आजवर नीट जाणीव झालेली होती कीं नाहीं याविषयीं मला वारंवार शंका येते. एरवी नकाशे, आराखडे, सैन्य रचनांचे तक्ते इत्यादिविरहित पुस्तकें प्रसिद्ध होतीं ना. एकच उदाहरण सांगतों. कै. मोडक यांच्या प्रतापगडच्या युद्धांत कांहीं नकाशे दिले आहेत. त्यांत कृष्णा नदीच्या एका तीरावरील गांवें दुसऱ्या तीरावर दाखविलीं आहेत. गोदावरीस मिळणारी भीमा नदी असाहि शब्दप्रयोग एका लेखांत केल्याचें मला स्मरतें. भूवर्णनाच्या अज्ञानामुळें शेकडों गांवांच्या नांवांचें चुकीचें वाचन झाल्यामुळें तीं गांवें सापडत नसल्याचें दाखवून देतां येईल.

८. फार कशाला, विविध भाषांतील कागदपत्रांची कालानुक्रमवार सारसूची तरी आहे कां ? कोणताही विषय घेतला तरी त्यास उपयोगी पडणाऱ्या पत्रांची कालक्रमवार सूची असणें अगदीं अवश्य असतें. पण अशी सूची खाजगी उपयोगासाठींही कोणी केल्याचें माझे ऐकिवांत नाहीं. या दृष्टीनें एकदां जें काम शिवचरित्रसाहित्यासंबंधीं झालें तें सर्व मराठी इतिहासासंबंधीं व्हावयास नको काय ? मला एका गोष्टीची तर अपूर्वाईच वाटते. इतके दिवस इतिहासाचा अभ्यास चालू आहे; पण त्यांत येणाऱ्या परकी विशेषनामांचे व शब्दप्रयोगांचे शुद्ध उच्चारही आम्हांस येऊं नयेत कां ? महमूद व मुहम्मद हीं नांवें अगदीं वेगळीं आहेत आणि महंमद असें नांवच नाहीं हें आमच्या लक्षांत कां येऊं नये ? फार्सी–अरबी उच्चारांत र खेरीज मूर्धन्य वर्ण नसतां खान डौरानसारखे उच्चार आम्ही करावे कां ? कंठीरवबद्दल कांतिराय लिहिणें योग्य होईल कां ? ग्रँट डफ असा शुद्ध उच्चार ठाऊक

असूनही ग्रँडफ् उच्चार लिहिणें कितपत क्षम्य आहे ? आम्ही शुद्ध उच्चार करण्यास शिकलेंच पाहिजे.

९. इतिहासाची सामग्री उत्तम रीतीनें ध्यानीं येण्यास तींत उल्लेखिलेल्या व्यक्तींचीं एकमेकांशीं असलेलीं नातीं समजलीं पाहिजेत. त्यासाठीं लागणाऱ्या अत्यंत प्रामाणिक वंशावळी कुठें आहेत? मुहीउद्दीन मुजफ्फरजंग पहिल्या निजामाच्या मुलीचा मुलगा असें अनेक ग्रंथांत लिहिलेलें आढळलें. मला मजजवळच्या वंशावळींत दाखल करण्यासाठीं त्या मुलीचें व तिच्या नवऱ्याचें अशीं दोन्ही नांवें पाहिजे होती. मोठमोठे ग्रंथ पाहूनहि थकलों; कोठें आढळलों नाहींत. शेवटीं एका अलीकडील लेखांत नुकतींच तीं मिळालीं तेव्हां मोठा आनंद झाला. राजपुताना, मध्य हिंदुस्थान व बुंदेलखंड यांतील राजांच्या समाधानकारक वंशावळी अजूनहि मला मिळत नाहींत. अशा स्थितींत कागदपत्रांचा नीट उलगडा व्हावा कसा ? अनेक घराण्यांच्या अत्यंत प्रामाणिक व विस्तृत अशा वंशावळी एकत्रित केलेल्या नकोत कां ? तात्पर्य, मराठ्यांच्या इतिहासाचें शास्त्रीय अध्ययन व्हावयास पाहिजे असेल तर व्यक्तिस्थळविषयांची सूची, शकावली, पत्रसारसूची, मुक्कामांचे तक्ते, आलेख, नकाशे, वंशावळी, इत्यादि तयार करून अद्ययावत् ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

१०. पण हें व्हावें कसें ? यांतील बहुतेक कामें अशीं आहेत कीं, तीं करण्यासाठीं कामें तांत्रिक असलीं तरी, बुद्धिमान्, साधनग्रंथांचें आलोडन करणारे व मेहनती अभ्यासू पाहिजेत आणि त्यांनीं केलेलें काम अतिशय बारकाईनें तपासून घेतलें पाहिजे. तरच तें निर्दोष होण्याचा संभव आहे. पैशाची अपेक्षा न धरतां हें काम स्वयंस्फूर्तीनें पण नियमानें करणारे कोणी मिळाले तर फारच उत्तम. मग पैसे जमविण्याचा आटापीटा करावयासच नको. पण कामाचें स्वरूप, तें करीत राहण्यांतील सातत्य, त्यामधील कांहींशीं रुक्षता, पूर्वतयारी व संकलन यांमधील कालदृष्ट्या अंतर आणि सर्व सामान्य लोकांची द्रव्याविषयीं झालेली मनःस्थिती यांचा विचार करतां अशीं मनुष्यें मिळतील ही अपेक्षा धरतां येत

नाहीं. त्यासाठीं हजारो रुपये जमवून खर्च केले पाहिजेत व सतत खर्च करीत राहिलें पाहिजे; तरच हीं कामें प्रमाणभूत होतील.

११. मराठी इतिहासाचें शास्त्रशुद्ध संकलन होण्यासाठीं प्राथमिक तयारी म्हणून कोणत्या गोष्टी व्हावयास पाहिजेत हें मी वर थोडक्यांत दिग्दर्शित केलें आहे. उपर्युक्त कार्य करून घेण्यासाठीं फार वरच्या दर्जाची बुद्धि असलेला, अतिशय व्यापक वाचन केलेला व मोठा पोंच असलेला असा विद्वान पाहिजे; तरच हें काम सर्वोत्कृष्ट होण्याचा संभव आहे. पण असा विद्वान् मिळेपर्यंत मजसारख्यानें गप्प राहिलें पाहिजे असें नाहीं. मला जें शक्य तें मी करण्यास हरकत कोणती ? योग्य मनुष्य पुढें येतांच केलेलें काम त्याजकडे सोंपवून मोकळा होण्यास मी तयार आहे येवढें आश्वासन मी केव्हांही देऊं शकतों. शेवटीं माझी वाचकांस आग्रहाची व कळकळीची विनंति ही कीं, तुम्हांपैकीं ज्यांना मराठ्यांचा म्हणजे आपल्याच पूर्वजांचा शास्त्रशुद्ध इतिहास वाचावयास मिळावा असें वाटत असेल व ज्यांना विनावेतनी किंवा अल्पवेतनी काम करण्यास सवड असेल त्यांनीं मला येऊन भेटावें. त्यांचें शिक्षण निदान मॅट्रिकहून अधिक झालेलें असावें. जितकें जास्त असेल तितकें चांगलेंच. त्यांच्या मगदुराप्रमाणें मी त्यांस काम सुचवीन व दिग्दर्शन करीन आणि झालेलें काम तपाशीन.

१२. पण माझें हें लेखन वाचून तुम्ही वाचक मला विचाराल कीं, तुमचें हें सर्व प्रवचन ऐकलें. आम्ही आमच्या पूर्वजांच्या वाङ्मयश्राद्धास अवश्य साह्य करूं. पण तुम्ही काय करणार ते तर सांगा ! ठीक आहे सांगतों मी स्वतः काय करीन तें. मी भा. इ. सं. मंडळाचा एक लहानसा सेवक आहे. तेथील काम संभाळून आणखी कामाचे सहा तास माझ्या वाट्यास उरतात. मी फार मोठें आश्वासन देत नाहीं. पण येवढी खात्री ठेवा कीं, यांतील रोजीं कमींत कमी तीन तास मी मराठ्यांच्या इतिहासाचे अभ्यासांत घालवीन; नव्हे घालवीत आहे; एवढेंच नव्हे तर शक्य तर पदरचे तीनशेपर्यंत रुपये खर्च करीन. इ. १९४५ सालीं माझ्या

ह्यातून येवढीच सेवा होईल. आपण सर्वांनीं सहानुभूति दाखविली तर याहून पुष्कळ सेवा करण्याची आशा व खात्री मात्र आहे.

१३. मजसारख्यानें एका वर्षीं तीनशे रुपये खर्चणें जड आहे. पण माझा बोजा हलका करणें, आपल्याच हातांत आहे. मी व्यक्तिशः कांहीं पुस्तकें प्रकाशित केलीं आहेत. त्यांची किंमत सव्वा पंचवीस रुपये आहे. तीं आपण घेतलीं तर उत्तम मोबदला मिळाल्यामुळें आपणांस भार वाटणार नाहीं व माझा भार खात्रीनें हलका होईल. विनावेतनी किंवा अल्पवेतनी सेवा करण्यासाठीं इतिहासाची आवड असणाऱ्यांनीं पुढें यावें ही प्रार्थना मी वर केलीच आहे. बस्स! या वर्षीं मी आपणांस एवढेंच मागत आहे. पुढील वर्षीं प्रथम या सालच्या कामाचा वृत्तांत आपणांस सादर करीन आणि नंतरच कामाचें स्वरूप, लागणारा काल, पैसा व अभ्यासकवर्ग यांविषयीं विस्तृत योजना पुढें मांडून मदतीविषयीं प्रार्थना करीन.

---

## २५. वऱ्हाड-नागपूरचा धावता इतिहास

१. आपल्या या पृथ्वीच्या पाठीवर एखादाच देश असा असेल कीं, ज्याच्या सीमा अत्यंत नैसर्गिक व दुर्लंघ्य असल्यामुळें त्या तशाच कायम राहिल्या. कोणताहि देश घेतला तरी त्यावर सत्ता चालविणारे राजे आणि त्या देशांतील लोक यांच्या उण्याअधिक कर्तबगारीमुळें त्या देशाचें क्षेत्र कधीं कमी झालें तर कधीं वाढलें असें आढळून आलें आहे. क्षेत्राचें हें आकुंचन किंवा ही वाढ कधीं शुद्ध भौगोलिक तर कधीं राजकीय, कधीं सामाजिक तर कधीं धार्मिक, कधीं सांस्कृतिक तर कधीं आर्थिक अशी निरनिराळ्या प्रकारची असूं शकते. म्हणून आपण एखाद्या प्रदेशाचा सर्वांगीण इतिहास लिहावयाचें मनांत आणलें तर शास्त्रीय दृष्टीनें तो पूर्णतया केवळ त्याच देशाचा इतिहास होऊं शकणार नाहीं. कधीं त्याच्या भौगोलिक रचनेचा इतिहास सांगतांना त्याची चिरफाड करावी लागेल. तर कधीं भाषिक इतिहास सांगतांना त्याजबरोबर त्याशीं संलग्न अशा प्रदेशांचाहि त्यांत अंतर्भाव करावा

लागेल. तर कधीं धार्मिक इतिहास सांगतांना अनेक धर्मांच्या इतिहासाचा आढावा घ्यावा लागेल. याचा अर्थ हा कीं, आपण कोणत्याहि देशाचा सर्वांगीण इतिहास लिहावयास घेतला तरी त्याच्या इतिहासांत एखादाच कालखंड असा असूं शकेल कीं, ज्यामध्यें त्या देशांतील लोक व राजा हे वांशिक, धार्मिक, राजकीय, सामाजिक, भाषिक, आर्थिक, सांस्कृतिक इत्यादि सर्व दृष्टींनीं एकरूप होते किंवा एकजिनसी होते. एखाद्या देशावर सतत एकाच कुलानें राज्य केलें आहे असेंहि सहसा आढळत नाहीं. त्या कुलांतील पुरुषांच्या उण्या-अधिक कर्तवगारीमुळें त्यांच्या राज्याचा कधीं संकोच तर कधी विस्तार झाल्याचें नेहमीं आढळतें. संकोच झाला म्हणजे राज्य करीत असलेल्या देशाच्या विस्ताराचाहि संकोच होतो. उलट विस्तार झाला म्हणजे इतर संलग्न देशांचे अंश मूळ देशांत सामील होतात.

२. आजच्या वऱ्हाड-नागपूर भागाचेंहि असेंच झालें आहे. सध्याचा वऱ्हाड-नागपूरचा भाग मनुष्यवस्ती झाल्यापासून ते आज पर्यंत सर्वांगांनीं एकजिनसी होता असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. आज मराठी भाषेमुळें संयुक्त महाराष्ट्रांत असण्यासारखे जे बुलढाणें, अकोलें, उमरावती, वर्धा, यवतमाळ, नागपूर, भंडारा व चांदा हे आठ जिल्हे, त्यांचा प्रदेश, त्यांतील लोक, त्यांचें राज्य इत्यादि सर्व एकजिनसी होतें किंवा आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. आज या सर्व जिल्ह्यांतील बहुसंख्य लोक मराठी भाषा बोलत असले तरी मराठी भाषा उत्पन्न झाल्याबरोबर एकदम ती या सर्व जिल्ह्यांत प्रचलित झाली असें समजणें चुकीचें आहे. बुलढाणें, अकोलें, यवतमाळ, उमरावती, वर्धा या जिल्ह्यांच्या बहुतेक भागांत मराठी तिच्या उगमापासूनच चालू असेल असें समजण्यास जागा आहे. पण नागपूर, भंडारा, चांदा या जिल्ह्यांतील तिचा प्रसार तौलनिक दृष्ट्या अलीकडचा आहे असें म्हणावें लागतें. चांद्याकडील या भागांत गोंडी मराठीच्या आधींपासूनच बहुधा असेल. यवतमाळच्या दक्षिण सरहद्दीवर कानडी मराठीपूर्वी चालू असण्याचा संभव आहे.

३. ज्या प्रदेशांत कोणत्याहि प्रकारें संघर्ष घडले नाहींत किंवा ज्या प्रदेशांतील लोक दीर्घोद्योगी सुद्धा नाहींत, अशा प्रदेशालाही कांहींना कांहीं इतिहास असणारच. पण तो स्फूर्तिदायक, रोमांचकारी व अभ्यसनीय असूं शकेल कीं नाहीं याविषयीं शंकाच आहे. भारताच्या इतिहासाकडे आपण केवळ सत्यशोधनाच्या दृष्टीनें पाहिलें तर आपणांस असें कबूल करावें लागेल कीं, राजस्थान, महाराष्ट्र, पंजाब व कर्नाटक या प्रदेशांतील कांहीं भूभागांतल्या लोकांनी जे संघर्ष केले, त्यामुळें त्या भागांच्या इतिहासांत जी स्फूर्तिदायकता, जी रोमांचकारिता व जी अभ्यसनीयता उत्पन्न झाली आहे, ती भारतांतील इतर भूभागांच्या इतिहासांत दिसत नाहीं. यामुळें त्या भागांच्या इतिहासांत आकर्षकता, रोचकता व बोध नाहींत. वऱ्हाड–नागपूरचीच काय, पण मराठी भाषिक महाराष्ट्रांतल्या आणखीही कांहीं भागांची अशीच स्थिति आहे. विशिष्ट लोकांचा उदो उदो किंवा विशिष्ट लोकांना नामोहरम रकण्याचा हेतु नाहीं. पण सतराव्या शतकांत शिवाजीमहाराजांच्या पुढारीपणाखालीं कृष्णा व तिच्या कुटुंबातील इतर नद्या यांच्या कांठच्या लोकांनीं जो प्रचंड व यशस्वी संघर्ष केला, त्यामुळें त्या भागाच्या इतिहासाला जें महत्त्व आलें, तें इतर भागांच्या इतिहासाला नाहीं.

४ इतिहासपूर्व कालांत वऱ्हाड–नागपूर प्रदेशाची परिस्थिति कशी होती हें नीट समजणें अमळसें कठीण आहे. सगर–केशिनी, अगस्त्य-लोपामुद्रा, अज-इंदुमती, नल–दयमंती विवाह हीं ऐतिहासिक सत्यें आहेत असें मानलें तर प्राचीन कालापासून विदर्भ चांगला सुसंस्कृत होता असें कबूल करावें लागेल. कृष्ण-रुक्मिणी, प्रद्युम्न-शुभांगी, अनिरुद्ध–रुक्मावती विवाह हीं ऐतिहासिक सत्यें मानण्याकडे सर्वसाधारण समाजाचा कल आहे. पण तसें समजण्यास वस्तुनिष्ठ अभ्यासाच्या दृष्टीनें कांहीं अडचणी आहेत. कृष्णादि व्यक्ति खरोखरच होऊन गेल्या हें सिद्ध करण्याइतका समकालीन बास्तव पुरावा आज उपलब्ध नाहीं. वांशिक इतिहासाचा वाङ्मय पुरावा आहे; पण त्यानें समाधान होत नाहीं.

तथापि हे विवाह ऐतिहासिक घटना आहेत असें समजलें तर इसवीपूर्व दहाव्या शतकाच्या सुमारास विदर्भ चांगला सुधारलेला होता असें समजण्यास हरकत नाहीं. तदनंतर सुमारें ८०० वर्षे वऱ्हाड–नागपूरची काय स्थिति होती हें कळत नाहीं. भारतांत शेकडों ठिकाणों उण्याअधिक प्रमाणांत उत्खनन झालें आहे. रूपड-सारख्या ठिकाणीं इतिहासपूर्व काल व इतिहाकाल यांची सांखळी जोडणारे बरेचसे दुवेहि सांपडले आहेत. पण उत्खनन करून इतिहासपूर्व किंवा इतिहासकालांतील वास्तव अवशेष बाहेर काढण्याचें काम वऱ्हाड नागपूर भागांत झाल्याचें आढळत नाहीं. यामुळें वऱ्हाड–नागपूरचा इसवीपूर्व १००० ते २०० हा काल अंधकार-युग समजण्यास हरकत नाहीं. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र या नाटकामध्यें विदर्भांतील यज्ञसेन व माधवसेन या अग्निमित्र-समकालीन चुलत राजबंधूंचा उल्लेख येतो. पण त्यांविषयीं अधिक माहिती मिळत नाहीं. वऱ्हाडांत शातवाहनांची सत्ता चालू होती हें तेथें त्यांचीं नाणीं सांपडलीं त्यांवरून सिद्ध होतें. पण त्यांची सत्ता नागपूरपर्यंत पसरली होती कीं नाहीं याविषयीं ठासून विधान करतां येणार नाहीं. शातवाहनांनंतर वाकाटक हें राजघराणें झालें. तें कधीं मांडलीक तर कधीं सार्वभौम होतें. या घराण्याची सत्ता केवळ वऱ्हाड–नागपूरपुरती मर्यादित न राहतां बरीच वाढली होती. वाकाटकांनंतर क्रमानें बदामी चालुक्य, राष्ट्रकूट, कल्याणचे चालुक्य, कलचुरि व यादव या घराण्यांची अधिसत्ता वऱ्हाड–नागपूर भागावर अव्याहत चालू राहिली. हिचा काळ सामान्यतः इ. ६०० ते १३०० असा सातशें वर्षांचा धरण्यास हरकत नाहीं. या एवढ्या मोठ्या काळांत वऱ्हाड–नागपूर भागांत अनेक मांडलीक राजे होऊन गेले. शिवाय या प्रदेशाच्या सीमांवर परमार, हैहय, कलचुरि, परिव्राजक, उच्चकल्प, सोमवंशी, नाग, इत्यादि वंशांचे राजे होऊन गेले. त्यांनीं या भागावर आक्रमणें करून याचे लचके तोडले असणें अगदीं शक्य आहे. त्यामुळें वऱ्हाड–नागपूर भागाच्या सीमा वारंवार बदलत राहिल्या असतील. पण येथें आपणांस या प्रदेशाचा इतका बारीक इतिहास पाहण्यास सवड नाहीं.

आपणांस फक्त ढोबळ इतिहास पहावयाचा आहे. या काळांतील शास्ते व शासित हे प्राय: एकाच धर्माचे, संस्कृतीचे, गीर्वाणभारतीचे अभिमानी असल्यामुळें या काळांत हा प्रदेश सुस्थितींत होता आणि भाषा, वाङ्मय, ज्योतिष, धर्मशास्त्र, इत्यादि विषयांतील अनेक नामांकित ग्रंथकार, तसेंच सेनापति, योद्धे इ. या प्रदेशांत होऊन गेले. याविषयीं अनेक प्रकारचे पुरावे देतां येतील.

५. यादवांच्या अस्तानंतर या भागावर मुसलमानी सत्ता चालू झाली. प्रथम कांहीं वर्षें दिल्ली सुलतानांचा अमल झाल्यावर पश्चिमेकडून माळवा व गुजरात सुलतान, दक्षिणेकडून फारूकी व बहमनी सुलतान पूर्वेकडून गजपति व इतर आणि उत्तरेकडून शर्की व बुंदेलखडांतील संस्थानिक साधेल त्या मार्गानें या प्रदेशावर आक्रमणें करून लचके तोडू लागले. त्यांतच पूर्वेकडील गोंड राजांनीं स्वत:च्या पराक्रमानें या प्रदेशाच्या पूर्व व उत्तर भागांत स्वत:चीं राज्यें स्थापिलीं. बहमनी सलतनतीची इसवी १५०० च्या अगोदरच पांच शकलें होऊन त्यांपैकीं दोन तुकडे इमादशाह व अहमदशाह नांवाच्या सरदारांनीं बळकाविले आणि वऱ्हाडांत इमादशाहीची राजवट सुरू झाली. पण सुमारें ७५ वर्षांत दिल्लीच्या गादीवर अकबरासारखा महत्त्वाकांक्षी, पराक्रमी, व निश्चयी बादशाह पक्का स्थिर झाला आणि त्यानें क्रमानें माळवा, गुजरात, खानदेश व इमादशाही सुलतानांचीं राज्यें सुमारें २५ वर्षांत बुडवून व गोंडांना मांडलीक बनवून मुघली अधिसत्ता या भागावर स्थापन केली. इ. १७०० च्या आगेमागें भोसल्यांचा वऱ्हाडांत प्रवेश झाल्यावर केवळ २५ वर्षांच्या अवधींत पहिल्या रघूजी भोसल्यानें वऱ्हाड—नागपूरचा भाग आपल्या ताब्यांत आणला. एवढेंच नव्हे तर गोंडांच्या राज्याची प्राय: इतिश्री केली. पुढें इ. १८०३ मध्यें इंग्रज-निजाम-भोसल्यांच्या लढाया होऊन देवगांव येथें तह झाला. त्याप्रमाणें वऱ्हाडचा पश्चिमार्ध निजामाकडे गेला. तो इ. १८५२ पर्यंत निजामाकडेच राहिला. दरम्यान निजामास इंग्रजांचें सत्तर लक्ष रुपयांचें कर्ज झालें. शिवाय निजामाकडे असलेल्या इंग्रजी सब्सिडियरी सैन्याचा सहा महिन्यांचा

अगार तुंबला. म्हणून शेवटीं कर्जफेड, सब्सिडियरी सैन्याचें वेतन व राज्यकारभाराचा खर्च भागून राहणारी शिल्लक निजामास देण्याच्या अटीवर वऱ्हाड इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतला. इ. १८६० मध्यें इंग्रज-निजामांचा नवा तह होऊन त्यांत इंग्रजांनीं निजामाचें पन्नास लक्ष कर्ज माफ करावें व हिंगोली इत्यादि कांहीं भाग निजामास परत द्यावा आणि निजामानें इंग्रजी मालावर जकात घेऊं नये व वऱ्हाडच्या जमाखर्चाचा हिशेब मागूं नये असें ठरल्यामुळें वऱ्हाड इंग्रजी सत्तेखालीं प्रायः आला. तथापि १९०२ सालीं लार्ड कर्झननें निजामाशीं नवा तह केला. त्यांत निजामास वऱ्हाडच्या स्वामित्वाबद्दल दरसाल २५ लक्ष रुपये देत जावे; पण त्यांतूनच इंग्रजांनीं आपल्या कर्जाची फेड करून घ्यावी आणि प्रत्येक जानेवारीच्या १ तारखेस उमरावतीस निजामाचें निशाण उभारावें असें ठरलें. तरीही वऱ्हाड परत मिळविण्याचा निजामाचा प्रयत्न चालू होता. तेव्हां इ. १९२३।२४ च्या सुमारास लॉर्ड रीडिंगनें निजामास वऱ्हाडची आशा सोडण्याविषयीं स्पष्ट बजाविलें. एवढें झालें तरी निजाम वऱ्हाडची आशा धरून होता. पण गेल्या महायुद्धानंतर लवकरच भारताला स्वातंत्र्य मिळालें आणि आतां तर सर्व संस्थानें भारतांत पूर्णतया विलीन झाल्यामुळें तो प्रश्न कायमचा निकालांत निघाला.

६. वर उल्लेखिलेल्या देवगांवच्या तहामुळें वऱ्हाडाप्रमाणें इतरही कित्येक प्रदेश भोसल्यांच्या हातून इंग्रजांकडे गेले. इ. १८१६ मध्यें भोसल्यानें सब्सिडियरी पद्धत कबूल केल्यामुळें तो नागपूरचा नामधारी राजा झाला. इ. १८१८ च्या तहानें इंग्रजांनीं भोसल्यांच्या राज्याचे आणखी कांहीं लचके तोडले. इ. १८२६ च्या तहानें चांदा, देवगड व इतर प्रदेश इंग्रजांनीं गिळंकृत केला. पण लवकरच इ. १८३० च्या तहानें तो प्रदेश त्यांनीं सोडून दिला. इ. १८५३ मध्यें तिसरा रघूजी मेल्यानंतर भोसल्यांचें राज्य खालसा झालें व नागपुरादि भाग इंग्रजी राज्यास जोडला गेला. वऱ्हाड—नागपूरचा असा हा थोडक्यांत इतिहास आहे.

---

# २६. शिवकालीन चलनाविषयीं थोडी माहिती

१. शिवकालांत महाराष्ट्रांतील विनिमय–व्यवहार होन व त्याचे लहान लहान भाग, लारी, टक्के, ससगाणी, खुर्दा म्हणजे बहुधा रुके व त्याच्या पटी, रुपये आणि मोहरा इत्यादि नाण्यांत चालत असे. पैकीं रुपये, मोहरा, आणे, यांचा प्रचार विशेषतः मुघली मुलुखांत होता तर बाकीचीं नाणीं निजामशाही बुडाल्यानंतर शिवाजी व आदिलशाही आणि यांशीं संबद्ध अशा दक्षिणेकडच्या सर्व प्रदेशांत चालत होतीं. पैकीं लारी हें नाणें रुप्याचें असून त्याचा प्रचार मुख्यतः कोकणांत होता; देशावर कमी प्रमाणांत होता. मुघली नाणीं हा विषय स्वतंत्र असून त्याचा विचार निराळा करणें रास्त आहे व तसा केलेला आढळतोही. तेव्हां येथें बाकीच्या नाण्यांचें वर्णन करतों.

२. या नाण्यांचें यथार्थ स्वरूप कळून येण्यास जशीं आपलेकडील मराठी किंवा फार्सी साधनें उपयुक्त आहेत, त्याप्रमाणें इंग्रजी, डच, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे भाषांतील साधनेंही उपकारक आहेत. किंबहुना अशा सर्व साधनांचा अभ्यास करून लिहिणें फार उद्‌बोधक होईल. तेव्हां तसें करणें अतिशय जरूर आहे. पण माझा हा लेख लिहिण्याचा हेतु असा आहे कीं, केवळ स्वकीय साधनांचा उपयोग करून कितपत माहिती मिळते हें पहावयाचें.

३. मात्र यावरून कोणीं असें समजण्याचें कारण नाहीं कीं, स्वकीय साधनांत यापेक्षां अधिक माहिती मिळणार नाहीं. सूक्ष्म व पुनः पुनः तेंच तें वाचणारास जास्त माहिती सांपडण्याचा संभव आहे. तेव्हां हा लेख केवळ दिग्दर्शनार्थ म्हणून मानण्यास हरकत नाहीं.

४. तसेंच यापुढें मी ज्या नाण्यांची थोडी माहिती देण्याचा प्रयत्न करणार आहे त्यांच्या हल्लींच्या नाण्यांत किंमती काय व त्यांचीं परस्परांशीं नातीं कोणतीं हें समजून घेणें अतिशय महत्त्वाचें पण तितकेंच किचकट, श्रमाचें व कालावधीचें आहे. तेव्हां त्या मुद्या-विषयीं विशेष विवेचन पुढील एखाद्या लेखामध्यें करण्याचें ठरवून

येथें फक्त त्या विवेचनास उपयोगी पडणाऱ्या पण सहजगत्या मिळालेल्या माहितीचाच उल्लेख करतों.

५. सभासदी बखरींत, शिवाजीच्या खजिन्यांत सोन्याचीं कोणतीं नाणीं, किती होतीं याची यादी दिली आहे[1]. तींत गंबार, इभराम्या मोहरा, पुतळ्या सतलाम्या, तसेंच पातशाही, शिवराई, कावेरीपाक, सणगरी, अच्युराई, देवराई, रामचंद्रराई, गुती, धारवाडी, फलम, प्रलखटी[2], पाक(व)नाईकी, आदवणी, जडमाल, ताडपत्री, अफरज़ी,[3] त्रिवाळुरी किंवा त्रिमलारी (त्रिमलराई!), त्रिसूली, चंदावरी, बिलधरी, उलफकरी, महमदशाई, वेळुरी, कटेराई,(= कंठीराई), देवजवळी (देवनहळ्ळी?), रामनाथपुरी, कुनगोटी (=कुनगोळी?), येळुरी (=वेळूरी), निशाणी, चंद्रमे, अशीं होनांचीं व इतर नाण्यांचीं नांवें आलीं आहेत[1].

६. इभराम्या, शिवराई, अच्युतराई, कटेराई इत्यादि नांवें राजांच्या नांवांवरून पडलेलीं दिसतात. तर गुती, धारवाडी, चंदावरी, रामनाथपुरी, अशासारखीं कांहीं नांवें गांवांवरून पडलेलीं असावींत असें वाटतें. गंबार, अफरजी, उलफकरी अशा प्रकारचीं नांवें कशीं उत्पन्न झालीं हें समजत नाहीं. येवढेंच नव्हे तर कित्येकांचें वाचन सभासद बखरीच्या संपादकांना नीट करतां तरी आलें नसावें किंवा मूळांतच दोषपूर्ण असावें असें वाटतें. उदाहरणार्थ देवजवळी शब्दाचें वाचन देवनवळी केलें म्हणजे तें देवनहळ्ळी या ग्रामनामाच्या जवळ जाऊन अर्थपूर्ण होऊ शकेल. निशाणी, चंद्रमे, हीं नांवें नाण्यांवर काढलेल्या त्या त्या चिन्हांवरून पडलीं असावीं.

७. शिवाजी महाराजांच्या आज्ञेनें तयार झालेल्या राजव्यवहार-कोशांत होन व त्याचे भाग आणि इतर नाणीं यांजविषयीं पुढील माहिती आली आहे[4].

> द्रव्यं तु नरुतसंज्ञं स्याद् वराटो[5] होन उच्यते ॥३८॥
> तदर्धं तु प्रतापः स्याद् भाषयोरुभयोरपि ॥
> वराहपादो धरणश्चवलस्त्वष्टमांशकः ॥३९॥
> दुवलः षोडशांशः स्यान्मोहरा तु बुधैः स्मृतम् ॥
> सुवर्णनिष्कं रजतनिष्कं स्याद्रूपयाभिधम् ॥४०॥

वाच्या रजतवर्ती तु लाहरी फलमः पणः ॥
ताम्रद्रव्यं तु खुर्दा स्याद् बस्तनं बन्धनं स्मृतम् ॥४१॥

८. हीवरून तयार होणारें कोष्टक असें :– १ वराह = १ होन = २ प्रताप = ४ धरण = ८ चवल = १६ दुवल. १ फलम = १ पण. सभासदी यादींत होनांच्या भागांचीं नांवें नाहींत तीं येथें आहेत. वराह हा शब्द नाण्यांवर काढलेल्या वराहाच्या चित्रावरून प्रचारांत आला असावा. चालुक्यांचें लांछन वराह असल्यानें ते आपल्या मुद्रेप्रमाणें नाण्यांवरही वराहाचें चिन्ह खोदीत असावेत. होन हा शब्द सुवर्ण→सोन्न→होन्न→होन असा व्युत्पादतां येणें शक्य असलें तरी तो शब्द खरोखर संस्कृतोद्भव आहे कीं नाहीं याविषयीं शंका आहे. कानडी, तमिळ व इतर द्राविड भाषांमध्यें अत्यंत जुन्या वाङ्मयांत पोन् असा सुवर्णवाची शब्द असून त्याचें कानडीच्या नियमाप्रमाणें अलीकडील रूप होन्–होनु असें होतें. ज्याप्रमाणें जुन्या संस्कृत वाङ्मयांत सुवर्ण शब्द एका सोन्याच्या नाण्याचें नांव या अर्थी उपयोजलेला आढळतो, त्याप्रमाणें पोन् किंवा होन्, होनु या शब्दासही एक सोन्याचें नाणें असा अर्थ कालांतरानें आला असावा. संस्कृत स बद्दल कानडींत प झाल्याचें कोठें आढळत नसल्यानें सुवर्ण व पोन् यांचें कांहीं नातें असेल असें वाटत नाहीं. प्रताप हें नांव कदाचित् विजयनगरचे राजे आपल्या नांवांमागें तो शब्द लावूं लागल्यानंतर प्रचारांत आलें असावें. विजयनगरच्या राजांच्या अनेक नाण्यांवर श्रीप्रताप हरिहर, श्रीप्रताप कृष्णराय, श्री प्रताप अच्युतराय इत्यादि मजकूर असल्याचें प्रसिद्ध आहे. धरण हें नाण्याचें नांव जुन्या ग्रंथांतून येत असावें असें वाटतें. उदाहरणार्थ डॉ. बार्नेट यांच्या 'अँटिक्विटीज ऑफ इंडिया' या पुस्तकांत पृ. २०६ ते २१० मध्यें जीं वजनांचीं कोष्टकें दिलीं आहेत त्यांमध्यें कितीतरी ठिकाणीं याचा उल्लेख आहे. चवल, दुवल, हे शब्द चतुःपलम्, द्विपलम् यांचीं अपभ्रष्ट रूपें असावीं. पण त्याविषयीं थोडें विवेचन पुढें करतों.

९. आतां प्रत्यक्ष कागदपत्रांतून आलेल्या उल्लेखांचा विचार

करून कोणतें कोष्टक तयार होतें तें पाहू. या दृष्टीनें पुढील उल्लेख महत्त्वाचे आहेत–

(१) शि. च. सा. खं. २ ले. ३५२ : २॥≡अडीच होन तीनी दुवल

(२) शि. च. प्र. पृ. १०३ ले. ३१ : धर्मादाऊ .॥. प्रताप

(३) शि. च. सा. खं. २ ले. ३६५ : होन ÷ अक्षरी धरण

(४) शि. च. सा. खं. २ ले. ३७२ : होन ८= चवल यासी दिवाणासी होन ८–। व हकदारासी होन ८.।. येकून होन ८=

(५) शि. च. सा. खं. २ ले. ३७४ होन ८– दुवळ

१०. वर दिलेल्या हिशेबावरून स्पष्ट होईल कीं, पूर्ण आकड्यालाहोन म्हणत; .॥. या रकमेनें प्रतापाचा अर्थबोध होई; .।. या रकमेस धरण समजत; ८= या रकमेस चवल संबोधीत व ८– या रकमेस दुवल हें नांव देत. याचा अर्थ असा कीं, प्रताप = $\frac{1}{2}$ होन. धरण = $\frac{1}{4}$ होन, चवल = $\frac{1}{8}$ होन व दुवल = $\frac{1}{16}$ होन. किंवा हेच पूर्णांकानें सांगावयाचें म्हणजे २ दुवल = १ चवल; २ चवल = १ धरण; २ धरण = १ प्रताप आणि २ प्रताप = १ होन. चौथ्या उल्लेखांत दिवाणासि होन ८–। व हकदारासी होन ८.।. येकून होन ८= असा हिशेब दिला आहे. यामध्यें एक गोष्ट ध्यानांत येते तो ही कीं, दोन उभ्या रेघांचा एक दुवल होऊन त्यांत पूर्वीचा एक दुवल मिळतो व एक चवल बेरीज होते. ही उभी रेघ कोणत्या तरी एका अशा नाण्याविषयीं असली पाहिजे कीं, तीं दोन नाणीं एकत्र केलीं असतां एक दुवल व्हावा. माझे मतें दोन पलांचा एक दुवल होत असावा, येवढेंच नव्हे तर दुवल किंवा दुगल हा शब्दही द्विपल या शब्दाचा अपभ्रंश असावा. तेव्हां दोन पलें म्हणजे एक दुवल होतो. मी वरील विधान केवळ या एकाच उदाहरणावरून करीत नाहीं. अशा तऱ्हेचीं आणखीं कित्येक उदाहरणें सापडलीं असून त्यांपैकीं दोन येथें नमूद करतों.

(१) राजवाडे खंड २० ले. १५१: नख्त होनु १३॥। यापैकी
वजा नख्त होनू ३८–।
बाकी नख्त होनू १०॥=।

(२) शि. च. प्र. पृ. ८७ ले. १ मध्यें बेरीज दिली आहे ती अशी–

.।।।=
.।।।.
.।=
.।=
.।.
८=
८=
८।.
८।.
१।.
———
४८≡

११. वर दिलेले दोन्ही हिशेब आळयापुढील दोन उभ्या रेघांचा एक दुवल होतो असें मानल्याखेरीज जमणार नाहींत. आता १ पल म्हणजे १ गुंज होत होती कीं काय हा प्रश्न आहे. या प्रश्नाचें निश्चयात्मक उत्तर देतां येत नाहीं. पण बहुधा गुंज व पल यामध्यें अंतर नसावें असें वाटतें. परवा दीक्षित–पटवर्धन यांच्या वह्या पहात असतां मला अनेक ठिकाणीं होन, प्रताप, वगैरेंच्या खरेदी-विक्रीचे तपशील आढळले. त्यांत कोठेंही व कोणत्याही होनाचे बाबतींत भाव चार रुपयांपेक्षां जास्त असलेला आढळला नाहीं. आपण क्षणभर एक होनाची किंमत चार रुपये धरूं. अर्थात् एका पलाची (गुंजेची?) म्हणजे १/३२ होनाची किमत दोन आणे होईल. अर्थात् एक तोळा सोन्याची किमत बारा रुपये होईल. शिवाय मी होनाचा भावही थोडा चढाच धरला आहे. तो थोडा कमी धरल्यास एक तोळा सोन्याची किंमत याहून कमी होईल.

१२. हा भाव आज आपणांस फारच कमी वाटण्याचा संभव आहे. विशेषत: ज्ञानेश्वरी व इतर प्राचीन मराठी वाङ्मय यांत सोन्यास 'साडे पंधरेयाचे' इत्यादि अभिधान दिलें गेल्यानें व त्याचा अर्थ १५॥ रुपये तोळा उत्तम सोन्याचा भाव अशी सामान्य समजूत असल्यानें सोनें १२ किंवा ११॥ रुपये तोळा हा भाव ऐकून आश्चर्य वाटेल. पण तसें वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. शिवकालांत

सोन्याचा भाव पुष्कळ कमी असावा असें म्हणण्यास पुरावा आहे. उदा. मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास ले. ८९ (काल इ. १७००) यांत '३८ [ रुपये ] ८८८२ ।।।= दर १३ प्रा अशी नोंद आहे. या नोंदीचा अर्थ सोन्याचा भाव १३ रुपये तोळा असा होतो हें उघड आहे. याच लेखांत '१८२। [रु] सोनें वजन ८८।।१।=' अशीहि नोंद आहे. या हिशेबानें एका तोळयास सुमारें १४ रुपये भाव येतो. हाही अगदींच आश्चर्यकारक नाहीं.

१३. आतां इ. १९३० मधील बंगाल एशियाटिक सोसायटीच्या नियतकालिकाच्या न्यूमिस्मॅटिक सप्लिमेंटमध्यें (पृ. ४३) आलेल्या कोष्टकाचा विचार करूं. वास्तविक हें कोष्टक 'पठाण किंग्स् ऑफ दिल्ली' या पुस्तकांतून वरील सप्लिमेंटमधील लेखकानें नुसतें उद्धृत केलें आहे. खुद्द लेखकाला या कोष्टकाच्या निःसंदिग्धते-विषयीं खात्री नव्हती असें त्याच्या पुढील लिखाणावरून भासतें. तसेंच 'पठाण किंग्स्...' या पुस्तकांतही तें सर डब्ल्यू. इलियट यांजकडून मिळाल्याचें सांगितलेलें दिसतें. तेव्हां यावरूनच त्याच्या निःसंदिग्धतेविषयीं शंका येऊं लागते. पण दोन तीन इंग्रजी पुस्तकांत आल्यानें तें उद्धृत करणें जरूर झालें आहे. तें कोष्टक असें: —

१ वराह = २ होन = ४ धरण = ८ चवल = १६ दुवल = ३२ गुंजा. माझें कोष्टक असें:— १ होन = २ प्रताप = ४ धरण = ८ चवल = १६ दुवल = ३२ पल

१४. पहिलें कोष्टक एखाद्या जुन्या पुस्तकांतील आहे कीं, कल्पनेनें बसविलें आहे हें मूळ पुस्तक पहावयास न मिळाल्यानें मला ठाऊक नाहीं. पण माझ्या कोष्टकांतील होनाच्या ठिकाणीं वराह, प्रतापाच्या ठिकाणीं होन व पलाच्या ठिकाणीं गुंज असे बदल केले असतां हें पहिलें कोष्टक तयार होईल. शिवकालीन वाङ्मयांत होनासच होन वराही किंवा वराह असें संबोधिल्याचें आढळतें. उ. राजवाडे खंड ८, ले. ३३ मध्यें बराह व पादशाही होन हे शब्द एकाच अर्थी उपयोजिलेले आहेत. पण प्रतापास होन म्हटल्याचें आढळत नाहीं. उलट असें वाटतें कीं, तसें आढळल्यास घोटाळाच होईल. कारण मग होन म्हणजे वराह धरावयाचा कीं प्रताप धरावयाचा याविषयीं

बारंवार प्रश्न उत्पन्न होईल. अनेक आदिलशाही फर्मानांतून व इतर कागदपत्रांतून प्रतापास नीम होन म्हटलें आहे असें वाटतें. उदाहरणार्थ शि. च. सा. ३।४९८ मध्यें नीम होन किंवा होन नीम अशा शब्दांनीं शेवट झालेल्या रकमा अनेक आल्या असून त्यांचे रुपये प्रत्येक वेळीं मूळ रकमेच्या नेमके दुप्पट झाले आहेत. अर्थात् नीम होनाची किंमत २ रुपये धरलेली दिसते. २ रुपयें किंमत असणारें नाणें प्रतापाशिवाय दुसरें दिसत नाहीं.

१५. मीं मघा २ पल = १ दुवल होतो असें सांगितलें व त्यास कांहीं उदाहरणेंही दिलीं; पण जुन्या कागदांतून या पल शब्दाला एक प्रतिशब्द वापरलेला दिसतो. तसेंच पलाच्या खालच्या प्रतीचें एक नाणें उल्लेखिलेलें आढळतें. तेव्हां या दोन्ही गोष्टींचा आणखी विचार करणें जरूर आहे. हा प्रश्न निकालांत काढण्याच्या दृष्टीनें उपयुक्त असे उल्लेख येणेप्रमाणें—

भु[६] १ : ९८≡। ÷ मो नौ होन तीनी दुवल बेल वीस[ रास? ]
भु २ : ७८=८–।. मो सात होन चवल वीस पाऊ वीस रास
भु ३ : २।।। ÷ । ÷ मो दोनी होन सी रुबू दुवल ब्याल वीस रास
भु ६ : २६०८≡। ÷ मो दोन्ही सेहे साठी होन तीनी दुवल बयाल वीस रास
भु ७ : ६०।।=८ ÷ मो साडे साठी होन चवल वीस रास
३०३/२७ ४।।।=। मो च्यारी होन सीरुबू चवल बेल रास
५३४/२७ : १।।=८ ÷ मो दीडी होन चवल वीस रास
६११/२७ : ३।=८ ÷ मो तीन होनु तीन चवल वीस रास
२९६/२७ : ८।।.। ÷ मो आठ होनू प्रताप बयाल वीस रास
५२४/२७ : १८.। ÷ मो येक होनू बी(बे)ल वीस रास
५२५/२७ : .।=। ÷ मो तीन चेवल बेल वीस रास
३८०/२७ : ९।।।–।. पावणे दाहा होन तीन बयाल रास
३०७/२७ : ८–।.। दुवल ब्यल अर( =अरे) वीस
१५७९/२७ : ५१३८≡।.।. मो पाच सेहे तेरा होन तीनी दुवल बेल आर (अरे) वीस रास

१६. वर जे उल्लेख दिले आहेत त्यांवरून स्पष्ट होतात त्या गोष्टी

अशा – (१) दुवलचा पोटभाग बेल व बेलचा पोटभाग वीस होई. (२) दुवलच्या आडव्या रेघेपुढें उभी रेघ काढून बेल हा पोटभाग व बेलच्या पुढें आडवी रेघ काढून वीस हा पोटभाग दाखवीत. (३) वीसाचे पोटभाग जरी पाडलेले दिसतात तरी त्यांस निराळें नांव नव्हतें, पाव वीस, आर वीस एवढेंच म्हणत. (४) भुयाराकडे वीसाच्या आडव्या रेघेपुढील एका उभ्या रेघेस पाव वीस म्हणत तर आटपाडीकडे त्याच एका उभ्या रेघेस अ-आर = (कानडींत याचा अर्थ अर्धा, अरे > आर व वरे) अर्धा वीस म्हणत. (५) एका दुवलाचे दोन बेल व एका बेलाचे दोन वीस असें कोष्टक होतें. (६) भुयारकडे वीसाचे चार भाग तर आटपाडीकडे वीसाचे दोनच भाग करीत.

१७. या दोन नाण्यांपैकीं वीस हें नाणें प्रसिद्ध असून त्याचा उल्लेख जुन्या शिलालेखांतून अनेक वेळां आलेला दिसतो. (उदाहरणार्थ पहा एपि. इंडि. १६; ७५, ८१, ३३२). परंतु वीस हें नाणें होतें कीं वजन होतें याचा मात्र कोठें खुलासा नाहीं. एवढेंच नव्हे तर एपि. इंडि. च्या संपादकांनीं सूचींत याचे पुढें 'ए मेझर' असे शब्द घालून तें नाणें नव्हे असेंच पर्यायानें सुचविलें आहे. पण तें बरोबर नाहीं असें वरील उदाहरणांवरून म्हणतां येतें. पल हें एक भार परिमाण होतें याविषयीं कांहीं शंका नाहीं. उदाहरणार्थ एपि.इंडि. १६; ३४९, ५० मध्यें 'गंधस्तु प(ल)षट्कं स्यात् तस्य प(पं)च पणं तथा' असा उल्लेख असून तेथें 'पांच पण किंमतीचें सहा पलभार गंध' असा अर्थ विवक्षित दिसतो. हाच अर्थ एपि. इंडि. ९; २२, ९२, ९३, २९० व १९; ३५ मध्येंहि विवक्षित आहे. पण प्रस्तुतच्या आपल्या चवलदुवलांच्या उल्लेखांवरून पल हें होनाचें विशिष्ट भागवाचक नांव आहे असें अगदीं निःसंदिग्धपणें म्हणतां येतें. दुवल शब्द द्विपलं यापासून निघाला; अर्थात दोन पल म्हणजे एक दुवल हें कोष्टक आपोआप सिद्ध होतें असें मी वर दाखविलें आहे. आतांच जे उल्लेख सादर केले त्यांवरून दोन बेल किंवा ब्याल म्हणजे एक दुवल होतो असें निष्पन्न होतें. अर्थात्

पल व बेल किंवा ब्याल हे शब्द एक मूल्यवाचक आहेत हें उघड झालें. यांचें एकमेकांशीं कांहीं नातें असेल काय? संस्कृतमधील शब्द कानडींत जातांना कधीं कधीं अकाराबद्दल एकार होतो. जसें अर्क > एर्के, मरीच > मेणसु, भ्रम > बेर्मे इत्यादि. त्याचप्रमाणें पल > पेल व पेल > बेल असें रूप झालें असावें. यापेक्षां अधिक चांगली व्युत्पत्ति आज तरी सुचत नाहीं.

१८. लेखारंभीं ज्या अनेक होनांचीं नांवें दिलीं आहेत ते सर्व एकाच किंमतीचे नसावेत हें उघड आहे. उ. पादशाही व निशाणी हेच होन घेऊं. यांचा परस्पर संबंध शिवचरित्रसाहित्य खंड ४, ले. ७३७ मध्यें 'मोईन पादशाही ४०० दर १। येकून निशाणी होन ५००८' असा दाखविला आहे. याचा अर्थ एक पादशाही होन म्हणजे सव्वा निशाणी होन असा होतो. राजवाडे खंड १८ ले. ५७ व ६२ मध्यें जे हिशेब आहेत त्यांवरून एका पादशाही होनाचा भाव ३।॥ रुपये होता असें दिसतें. अशा प्रकारचीं किती उदाहरणें सापडतात हें अजून मला पहावयाचें आहे. त्या पाहणींत कदाचित अशीं जास्त उदाहरणें सांपडतील अथवा कदाचित मिळणारही नाहींत. पण पेशवेकालीन सावकारांच्या पेढीवरील हिशेबांच्या वह्या या कामीं फार उपयोगी पडतील असें मंडळास नुकत्याच मिळालेल्या दीक्षित–पटवर्धनांच्या वह्यांवरून म्हणतां येतें. या वह्यांत जुन्या सोन्याच्या व रुप्याच्या नाण्यांच्या खरेदीविक्रीचा तपशील दिलेला आहे. अशा तपशिलावरून नाण्यांचे तत्कालीन बहुधा पुणेरी रुपयामध्यें भाव समजतात. उदाहरणार्थ श. १६९८ ते १७०३ मधील वह्या पहात असतां मला प्रतापाचा सर्वत्र दीड रुपया, सावनूरी होन = ३ रुपये, इक्केरी होन = तीन रुपये अकरा आणे ते तीन रुपये तेरा आणे असे भाव दिलेले आढळून आले. तेव्हां या वह्यांचा अभ्यास करणें अत्यावश्यक आहे.

१९. सभासदी बखरींत रुप्याच्या नाण्यांचीं नांवें आलीं आहेत तीं अशीं :–रुपये, आसरपद्मा, आबाशा, दाभोळी कबरी, चुली कबरी.[१] मोरेश्वरच्या मोरया गोसाव्यांच्या कागदांतून हुरमुजो लारी असा एक उल्लेख वारंवार आढळतो. यांपैकीं रुपये, आसरपद्मा, आबाशा (शाया) हीं नाणीं मुघली मुलखांत चालत असावींत.

शिवाजी व आदिलशाह यांच्या मुलखांत बऱ्याच मोठ्या भागांत म्हणजे साधारणपणें जुन्नरपासून ते खालीं विजापूरपर्यंतचा आणि विशेषत: कोंकण या प्रदेशांत लारी हेंच रुप्याचें नाणें चालत असे.

२०. हें नाणें प्रथम लार येथें पाडलें जात असावें. इराणमध्यें लारिस्तान नांवाचा दक्षिणेच्या अंगास देश आहे. या देशांत लार या नांवाचें शहर आहे. या शहरांत या नाण्याचा पहिला नमुना तयार झाला असला पाहिजे. म्हणून तेथें पाडल्या जाणाऱ्या एका विशिष्ट आकाराच्या नाण्यासच प्रथम लारी म्हणूं लागले. पण पुढें त्या नाण्याचा आकार, वजन, किंमत, इत्यादि गोष्टी लोकांना प्रिय होऊन इतरत्रही तशा प्रकारचीं नाणीं पाडलीं जाऊं लागलीं. तेव्हां लारी शब्दाचा विशेष अर्थ लुप्त होऊन त्यास एक विशिष्ट आकाराचें रुप्याचें नाणें असा सामान्य अर्थ प्राप्त झाला आणि ज्या ठिकाणीं लारी पाडली जाई त्या ठिकाणच्या नांवानें तिला संबोधूं लागले. उ दाभोळ येथें ज्या लाऱ्या पाडल्या जात त्यांस दाभोळी लाऱ्या; बसरा, चौल वगैरे ठिकाणीं ज्या लाऱ्या होत त्यांना बसरी, चौली (चूली) लाऱ्या असें म्हणत आणि इराणच्या आखातांतील ओर्मझ किंवा होर्मझ बेटांतील मुख्य शहर होर्मझ येथें जी लारी पाडली जाई तीस हुरमुजी लारी म्हणत.

२१. दाभोळी लाऱ्यांचा उल्लेख कोकणांतील अनेक आदिलशाही कागदांतून येतो. आपल्या मंडळांत असलेल्या सर्व लाऱ्या दाभोळीच आहेत. पेशवे दप्तराच्या एकतिसाव्या भागांतील २४ व्या लेखांत उत्पन्नाचा हिशेब 'लाहरी बसरी' या नाण्यांत सांगितला आहे. हा लेख चेऊल आगरांतील कुलकर्ण्याच्या हक्काचा जाबता आहे. या पत्राचें साल श. १५७९ म्हणजे राज्याभिषेकाच्या पूर्वीचें असून यांत शिवाजीचा उल्लेख 'राजश्री शिवाजी राजे छत्रपति' असा आहे. पण लेखाच्या आरंभींचा नकल शब्द पाहतांच या उल्लेखाबद्दल आश्चर्य वाटेनासें होतें. हुरमुजी लाऱ्यांचे उल्लेख कोठें येतात हें वर सांगितलेंच आहे. पण अनेक ठिकाणीं आणि सर्वांत जुने असे या नाण्याचे जे उल्लेख सापडतात ते नुसते 'लाहरी' असेंच सापडतात. यावरून वाटतें कीं, त्या काळीं लाऱ्यांची केवळ एकाच

ठिकाणाहून आयात होई ; येथें पाडल्या जात नसत. या सर्व प्रकारच्या लाऱ्याएकाच किमतीच्या असतील किंवा नसतील. शिवचरित्रसाहित्य खंड ४ ले. ६७७ मध्यें होन व लारी यांचा संबंध 'नकद होन २५ दर होने लरी ५ येकुनू लारी १२५' असा दाखविला आहे. यावरून एका होनास ५ लाऱ्या असा भाव श. १४९४ च्या सुमारास होता असें दिसतें. लाऱ्या व होन यांचे अनेक प्रकार असल्यामुळें येथें कोणत्या होनाचें कोणत्या लारीशीं १ स ५ हें प्रमाण असें तें स्पष्ट नाहीं. शिचसा ४।७३७ (शक १६०५) मध्यें 'लारी य १४६ येकूण होनू १५८' असें निदर्शित केल्यानें एका होनास ९$\frac{११}{१५}$ लाऱ्या हा भाव आला. मावळंकर सरदेसाई घराण्याचा इतिहास (मा.स.घ.इ.) ले. २२७ (इ. १७५१–५२) मध्यें लारी व रुपया यांचा जो हिशेब आला आहे त्यावरून एका रुपयास ३॥ लाऱ्या हें प्रमाण पडतें.

२२. होनाच्या खालचें असें दुसरें नाणें म्हटलें म्हणजे टक्का हें होय. टक्का या शब्दाची नीट व्युत्पत्ति सांगतां येत नाहीं. पण त्याचा टंक या शब्दाशीं कदाचित् संबंध असेलसें वाटतें. हें नाणें केवळ हिशेबाच्या सोयीकरतां कल्पिलेलें होतें, कीं प्रत्यक्ष चर्मचक्षूंनीं पाहतां येण्यासारखें होतें याविषयीं वाद आहे. शि. च. सा. ३।५५८ मध्यें 'टाकसाली टक्के १८६' असा उल्लेख असल्यानें तें नाणें होतें अशी शंका येते. पण त्या वादाविषयीं येथें चर्चा करावयाची नसून फक्त येवढेंच दाखवावयाचें आहे कीं, टक्का या नाण्याची किंमत वारंवार बदलत असावी. ती कशी हें पुढील उल्लेखावरून ध्यानांत येईल.

(१) शि. च. प्र. पृ. १०९ : खुर्दा दर होनासी खरीदी ९।।। फरोख्त ९॥. येथें ९।।। व ९॥ या संख्या टक्कावाचक आहेत हें पुढील उदाहरणांवरून नीट समजेल.

(२) शि. च. सा. खं. २, पृ. १६२ : ४८ होन = १॥= होन व खुर्दा टके ४८१।।। ( म्हणजे आंकडेमोडीनें एक होन = टक्के १०$\frac{१२}{३७}$ सुमारें)

(३) शि. च. सा. खं. २, ले. १३४ : टके ८१ येकून होन ८ म्हणजे १ होन = १०$\frac{१}{८}$ टके.

अशीं जितकीं अधिक उदाहरणें द्यावीं तितका जास्त फरक आढळून येईल. उदाहरणार्थ भु १ मध्यें एकाच प्रसंगाच्या हिशेबांत एका होनास १३।३, १३८६, १३, असे वेगवेगळे भाव दिलेले आहेत. या सर्व होनांची निश्चित जात कोणती हें ठाऊक नसल्या-मुळें टक्कयाची किंमत बदलली होती ह्या म्हणण्यास जास्त बळकटी येते. मला याशिवाय आणखीं उदाहरणें आढळलीं तीं अशीं–

(१) श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें ले. २७ (श. १६००) : येकून टके ५॥६ येकूण माजवा होनू [पा] ·॥· ∴ १ होन = ११। टके.

(२,३) शि. च. सा. ४।७३७ (श. १६०५) : टके ४५ होन ४॥ ∴ १ होन = १० टके. ये टके ६२॥ होनू ६। ∴ १ होन = १० टके (दोन्ही ठिकाणीं होन कदाचित् निशाणी असावा)

(४–७) भु. २ : दर होन टके १४॥ भु. ३ : दर होने टके १४॥ भु. ४ : दर होने टके १३।६ भु. ५ : दर होनासी टके १५

(८) मा. स. घ. इ. ले. ८९ मध्यें इ. १७०७ मधील हिशेबांत '·।· खुर्दा ।.।॥६' असा निर्देश असल्यानें १ रुपयास ३॥ टके अथवा १ टक्क्यास ४$\frac{४}{७}$ आणे हा भाव पडतो.

२३. टक्कयाच्या खालचें व तांब्याचें नाणें म्हणजे रुके होत. रुका हा शब्द रुक्अ या शब्दाचें अपभ्रष्ट रूप दिसतें. या शब्दाचा अर्थ ठिगळ, तुकडा असा असून या अर्थावरून हल्ली निजामी हद्दींत रुपयाचा $\frac{१}{९६}$ भागदर्शक व एकंदर नाण्यांच्या किंमतीनें सर्वांत लहान अशा तांब्याच्या नाण्यास तुकडा म्हणतात. सर्वत्र ४८ रुक्यांचा टक्का मानत होते असें दिसतें. उदाहरणार्थ ६३ रुके मांडा-वयाचे असल्यास १।३ असें लिहून त्याचें वाचन सव्वा टक्का ३ रुके असें देतील. मात्र रुक्याचें रूपांतर नेहमीं टक्क्यांत व टक्कयाचें रूपांतर बहुधा होनांत करीत हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

२४. रुक्याप्रमाणेंच तिरुका या नाण्याचा अनेक ठिकाणीं उल्लेख येतो. हा तीन रुक्यांचा होत असावा ही गोष्ट त्या शब्दाच्या घडणीवरून स्पष्ट होत आहे. रुक्याप्रमाणेंच शिवराई हें तांब्याचें नाणें होतें. शिवराई हा शब्द कृष्णराई, रामराई वगैरे शब्दां-प्रमाणें शिवाजीनें पाडलेल्या सर्व प्रकारच्या नाण्यांस प्रथम लावीत

असावेत. पण पुढें शिवाजीचा होन प्रचारांतून गेल्यामुळें हल्ली फक्त तांब्याच्या पैशासच लावतात. येवढेंच नव्हे तर याच शिवरायांना तांबडा छत्रपति म्हणण्याची चाल असावी असें 'मजजवळ तांबडा छत्रपतीही' नाहीं इत्यादि वाक्प्रचारांवरून म्हणतां येतें. दोन्ही नांवें पडण्याचें कारण शिवाजीच. याचा उल्लेख शि.च.सा. ४।७३७ मध्यें 'दक्षेणा दर रोज शिवराई ८६' असा केला आहे. यावरून शिवराई सहा रुक्यांची होई असें समजण्यास हरकत नाहीं.

२५. या सर्व नाण्यांशिवाय ससगाणी या नाण्याचाही कांहीं ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. उदाहरणार्थ—

(१) शि. च. सा. खंड २, पृ. ११९ 'टका येक त्यापैकी पालणूक ८३ तिरुका बाकी खुद (र्दी) टके ·।॥९ साडे सात सजगाणिया राहिल्या' याचा अर्थ ४५ रुके बरोबर साडे सात सजगाण्या. तेव्हां सहा रुके म्हणजे एक सजगाणी झाली.

(२) राजवाडे खंड २० लें. १२७ 'पंधरा स (जगा) ण्या देत जाव्या १॥।६' १॥।६ या रुकमेचे ९० रुके होतात व १५ सजगाण्या म्हणजे ९० रुके जर होतात तर एक सजगाणी म्हणजे सहा रुके हें स्पष्ट झालें.

तेव्हां असें दिसतें कीं, ज्याप्रो तिरुका हें नाणें ३ रुक्यांचें, तशी सहा रुक्यांची किंवा दोन तिरुक्यांची एक सजगाणी होई. या शब्दांतील सज हा शब्द शश या शब्दाचा अपभ्रंश स्पष्ट दिसतो. तेव्हां कानीगाणी म्हणजेच रुका असा अर्थ निष्पन्न होतो. मागें सहा रुके म्हणजे एक शिवराई होत असल्याचें दर्शविलें. आतां सहा रुके म्हणजे एक सजगाणी होत असल्याचेंहि पाहिलें. तेव्हां शिवराई व सजगाणी हीं दोन्ही नाणीं नांवानें भिन्न असलीं तरी किमतीनें सारखींच होतीं.

टीपा

१ तिसरी आवृत्ति पृ. ९५ व ९६. २ इतरत्र यासच प्रलयघटी हें नांव दिलेलें दिसतें. पहा : शिवचरित्रसाहित्य खं. ३, ले. ४७९. ३ येथून कुनगोटीपर्यंतचीं नांवें 'पुरवणी होनांचीं नांवें (फलम याचे पोटीं)' असा मथळा देऊन त्याखालीं दिलीं आहेत. ४ शिवचरित्रप्रदीप पृ. १४७. ५

टीपा पुढें चालू

वराहो पाठभेद. ६. येथून पुढें आलेल्या भु या संक्षेपाचा अर्थ विजापूर जिल्ह्यापैकीं इंडी तालुक्यांतील भुयार गावचे रहिवासी श्री. रघूत्तमाचार्य भुयार यांनीं मंडळांत दाखविण्यासाठीं आणलेले स्वत:च्या घरचे कागद व त्यापुढील अंक हा त्या कागदाचा अनुक्रमांक आणि ५३४/२७ इत्यादि आकड्यांचा अर्थ खरेसंग्रहांतील ५३४ क्रमांकाचा कागद वगैरे करावा. २७ हा आकडा खरेसंग्रहाचा निदर्शक आहे. ७ या नांवांपैकीं आसरपद्या (ह्या) हा अश्रफी शब्दाचें अपभ्रष्ट रूप असून कबरी हें लाहरी अर्थात लारी या शब्दाचें चुकीचें वाचन आहे. ८ 'शशकानि ऑर शशगानि ?' या नांवाचें एक स्फुट प्रो. होडीवाला यांनीं इ. १९२९ च्या बंगाल एशियाटिक सोसायटीच्या न्यूमिस्मॅटिक सप्लिमेंटमध्यें लिहिलें आहे ( पृ. २९६ ). पण पुण्यासारख्या ठिकाणींही वरील पुस्तक मिळू नये हें मोठें दुर्दैव होय.

---

# २७. श्री. पगडी व शिवजन्माची खरी तारीख

१. श्री. सेतुमाधवराव पगडी यांचा शिवजन्माची खरी तारीख १२ मार्च १६२८ या मथळ्याचा एक लेख मुंबईंतील लोकसत्तेच्या दि. १-१०-१९६७ च्या अंकांत प्रकाशित झाला. तो लेख एवढा सदोष आहे कीं,त्याचा लेखक कोणी अपरिचित असता तर त्याकडे मी ढुंकूनही पाहिलें नसतें. पण तो श्री. पगडी यांजसारख्या इतिहासज्ञ समजल्या जाणाऱ्या लेखकानें लिहिल्यामुळें तो अनुत्तरित राहिल्यास वाचक शिवाजीची आणखी एक जन्मतिथि पुढें आली असून तीमुळें शिवजन्मतिथि अधिकच वादग्रस्त झाली आहे असें समजतील. म्हणून त्यांतील महत्त्वाच्या विधानांस येथें थोडक्यांत उत्तर देतों.

२. त्यांनीं नवीन सुचविलेल्या जन्मतिथीच्या समर्थनाचें सार असें— शाहजहान इ.१६२८च्या फेब्रुवारीच्या आरंभीं गादीवर येतांच त्यानें निजामशाहानें लाटलेला मुलूख परत घेण्यासाठीं त्यावर खानजहान लोदी, दर्याखान, इत्यादि सरदारांस पाठविलें. या वेळीं शहाजी आपली गरोदर पत्नी जिजाबाई हीस शिवनेरी येथें ठेवून निजामशाहातर्फे दर्याखानावर चालून गेला. त्यांत तो पराभूत होऊन शिव-

नेरीवर परतला. तोंवर जिजाबाई बाळंत होऊन शिवाजीचें सूर्यावलोकन, उपवेशन व अन्नप्राशन हे संस्कारही झाले होते. तेव्हां जेधे शकावली आणि शिवभारत यांत सांगितलेला शिवजन्माचा १५५१ हा शक चुकला असून तो १५४९ असा पाहिजे. पण पुढील मास, पक्ष व तिथि इत्यादि तपशील मात्र अचूक आहे. त्याचें ख्रिस्ती रूपांतर १६२८ मार्च १२ असें होतें.

३. या समर्थनांत श्री. पगडी यांनीं जीं विधानें केलीं व जें गृहीत धरलें तें अथपासून इतिपर्यंत सर्व चूक कसें आहे हें येथें थोडक्यांत दाखवावयाचें आहे. इब्राहीम आदिलशाह इ. १६२७ सप्टेंबर १२ ला वारला तेव्हां शहाजी आदिलशाहींत सरलश्कर या पदावर होता. या पदावरून त्यानें लिहिलेलें इ. १६२८ मार्च ८ या तारखेचें पत्र उपलब्ध आहे (राजवाडे खंड २०, ले. २३०). तेव्हां आणखी तीन दिवसांत तो आदिलशाही सोडून निजामशाहींत जाणें व निजामशाहातर्फें मुघली सरदार दर्याखान यावर चालून जाणें अशक्यच आहे. श्री. पगडी कल्पना करतात त्याप्रमाणें शहाजीनें इ. १६२८ च्या जानेवारींत आदिलशाही सोडली नाहीं. त्यांच्या या कल्पनेस काडीचाही आधार नाहीं. त्यानें मार्च ८ नंतर व जुलै २५ पूर्वीं केव्हां तरी आदिलशाही सोडली व निजामशाही धरली (भा.इ.सं. मंडळ त्रैमासिक, वर्ष १, अंक २, पृ. ३५). असें झालें तरी त्याच्या भीमा व नीरा यांमधील जागिरींत फार मोठा फरक पडला नाहीं. एवढेंच नव्हे तर इ. १६२९ च्या जुलैंत त्याचा सासरा लखूजी जाधवराव याचा निजामशाहींत खून झाल्यावर त्यानें निजामशाही सोडली तेव्हां तो तडक आपल्या पुणें–चाकणच्या जागिरीवर येऊन राहिला. नंतर त्यानें मुघली सरदार अअजमखान याजकडे पत्रव्यवहार करून मुघली मनसब मिळविली व शाहजहाननें खानजहान लोदी व दर्याखान या बंडखोरांविरुद्ध चालविलेल्या स्वारींत अअजमखानाच्या हाताखालीं तो सामील झाला. त्यानंतर म्हणजे संपूर्ण इ. १६३० त्याच्या झटापटी चालू होत्या. या वर्षाच्या शेवटीं तो जुन्नर–संगमनेरकडे आला व त्याला पुत्रदर्शन झालें.

४. जहांगीर इ. १६२७ आक्टोबर २८ या दिवशीं लाहोर

येथें वारला. तेव्हां शाहजहान दक्षिणेंत होता. तेथून उत्तरेंत जाऊन त्याचें राज्यारोहण होण्यास इ. १६२८ फेब्रुवारी ४ ही तारीख उजाडली. राज्यावर आल्याबरोबर भोंवतालच्या तात्कालिक पण अस्थिर परिस्थितीचा कोणताही विचार न करितां निजामशाहानें लाटलेला मुलुख परत मागणें, तो न दिल्यामुळें त्यावर स्वारी करण्यासाठीं खानजहान लोदी व दर्याखान यांची नेमणूक करणें व ते दक्षिणेंत येऊन त्यांनीं निजामशाहाविरुद्ध हालचाली करणें, यामुळें निजामशाहातर्फे इ. १६२८ मार्च १२ या तारखेच्या अगोदर शहाजीनें त्यांजवर चालून जाणें हें सर्व अशक्यच आहे केवळ पत्रापत्री करण्यांतच त्या वेळीं दोन दोन महिने सहज जात असत. तेव्हां इ. १६२८ मार्च १२ या तारखेस शहाजीच्या अनुपस्थितींत शिवाजीचा जन्म होणें अगदीं अशक्य आहे.

५. श्री. पगडी यांनीं आपल्या समर्थनाच्या पुष्टयर्थ 'वाकाई सुनोत' चा आधार घेतला आहे. त्यांना हा आधार श्री. बेंद्रे यांच्या मालोजी राजे व शहाजी महाराज या पुस्तकांत मिळाला. श्री. बेंद्रे यांनीं तें प्रकरण शिवाजीनिबंधावली भाग १ च्या इंग्रजी विभागामध्यें शेवटीं दिलेल्या ९ पृष्ठांवरून घेतलें आहे (प्रकाशनकाल इ. स. १९३०). या ९ पृष्ठांत शाहजहानच्या पहिल्या दहा वर्षांची हकीकत आली आहे. हें मूळ प्रकरण सर चार्लस मॅलेट यास मिळालें व त्यानें त्याचा इंग्रजी अनुवाद करविला असें दिसतें. सध्या हें प्रकरण इंग्लंडमध्यें ऑर्मच्या संग्रहांत आहे. या प्रकरणाचें अचूक नांव काय असावें ? वाका म्हणजे घटना; पण सुनोत याचा फार्सींत कांहींच अर्थ होऊं शकत नाहीं. श्री. बेन्द्रे यांस हें समजलें नाहीं तर त्याबद्दल आश्चर्य वाटत नाहीं; पण श्री. पगडींसारख्या फार्सी जाणणाऱ्या मनुष्याला या प्रकरणाचें अचूक नांव काय असावें हें समजून घेण्याची इच्छा देखील होऊं नये याचें दुःख होतें. याचें अचूक नांव वाकअ—ऋकायअ—इ—सनवात असें असलें पाहिजे.

६. नांव कांहीं असूं द्या; पण ९ पृष्ठांत किंवा सुमारें २९०० शब्दांत दहा वर्षांची माहिती देणारें प्रकरण तपशील कितपत देत असेल व त्यांतील माहिती कितपत विश्वास्य असेल याची कल्पनाच

केलेली बरी. या प्रकरणाच्या दोनशें पट मोठा व शाहजहानच्या कारकिर्दीच्या पहिल्या वीस वर्षांची माहिती देणारा ग्रंथ बादशाहनामा या नांवाचा आहे (प्रकाशनकाल इ. १८७२). याचा इंग्रजी सारांश इलियट व डौसन यांच्या ७ व्या खंडात आला आहे (प्रकाशनकाल इ. १८७७). तसेंच या प्रकरणाच्या शंभरपट मोठा व शाहजहानच्या पूर्ण कारकिर्दीची माहिती देणारा शाहजहाननामा किंवा अमल–इ–सालिह या नांवाचा ग्रंथ आहे (प्रकाशनकाल इ. १९१२ सुमारें). या दोन्ही ग्रंथांत या प्रकरणाप्रमाणें पण विस्तारानें शाहजहानच्या कारकिर्दीच्या पहिल्या व तिसऱ्या या दोन वर्षी मुघल व निजामशाह यांच्या सरदारांनीं केलेल्या हालचाली, तसेंच खानजहान लोदी व दर्याखान यांनीं केलेलें बंड यांची हकीकत आलेली आहे. म्हणजे एतद्विषयक माहिती प्रकाशित होऊन ३७ ते ९५ वर्षें झालीं आहेत.

७. या दोन्ही ठिकाणीं शहाजीचा संबंध आलेला आहे. पहिल्या वर्षी दर्याखानाविरुद्ध केलेल्या हालचालींत त्याचा पराभव झाल्याचें अमल-इ-सालिह शिवाय तर दोहोंत सांगितलें आहे. तिसऱ्या वर्षाच्या हालचालींत शहाजी, त्याचा सासरा लखूजी जाधव याचा निजामशाहींत वध झाल्यावर, निजामशाहाच्या बाजूनें लढण्याचें सोडून मुघलांस जाऊन मिळाला. तेव्हां तो, त्याचा मुलगा संभाजी, भाऊबंद मंबाजी, इत्यादींस निरनिराळी मनसब मिळाली व त्यास त्या वेळचा मुघली सेनापति अअजमखान याच्या हाताखालीं निजामशाहाविरुद्ध लढण्यास सांगितलें. अअजमखानानें खानजहान लोदी व दर्याखान या बंडखोरांच्या विरुद्ध केलेल्या कित्येक हालचालींची माहिती बादशाहास कळविली आहे. तींत एके ठिकाणीं शहाजीस संगमनेर व जुन्नर यांशीं संबंध असलेल्या महालांची जप्ती करण्यासाठीं पाठविल्याची नोंद आहे. या वेळीं त्याची दर्याखानाशीं लढाई होऊन व तींत दर्याखानावर विजय मिळवून तो जुन्नरकडे आला असतां त्याला पुत्रदर्शन झालें असें मी समजतों. ही घटना बादशाहनाम्यांतील माहितीप्रमाणें इ. १६३० डिसेंबरच्या पहिल्या-दुसऱ्या आठवड्यांत घडली. शिवाजी इ. १६३० च्या फेब्रुवारींत

जन्मल्यानें एव्हां तो १० महिन्यांचा झाला होता आणि त्याचे सूर्याव-लोकन, उपवेशन व अन्नप्राशन हे संस्कार सहज उरकले असतील.

८. वकायअ-इ-सनवात या प्रकरणांत व बादशाहनाम्यांत शाह-जहानच्या पहिल्या वर्षाच्या हकीकतींत शहाजी निजामशाहातर्फे मुघली सरदार दर्याखान यावर चालून गेला असतां तो पराभूत झाला असें विधान आहे. अमल-इ-सालिहमध्येंही घटना नमूद केलेली दिसत नाहीं; तर शिवभारतांत जेथें शहाजी दर्याखानावर चालून गेला असें सांगितलें आहे, तेथें शहाजीनें त्याला बाणांनीं भेदून त्याचा गर्व हरण केला व शहाजी विजयी झाला म्हणजे दर्याखानाचा पराभव झाला असें नमूद आहे. या दोन ठिकाणीं सांगितलेल्या घटना एककालिक आहेत असें समजलें तर त्यांपैकीं कोणती खरी मानावयाची असा प्रश्न उत्पन्न होतो. कारण या दोन घटना एक-मेकांच्या अगदीं विरुद्ध आहेत. फार्सी साधनांवर विश्वास ठेवावा तर तपशीलवार माहिती देणारें शिवभारत खोटें ठरेल आणि शिव-भारत खरें धरावें तर फार्सी साधनें अविश्वास्य ठरतील. तेव्हां मी या दोन घटना पूर्णपणें भिन्नकालिक आहेत असें समजतों आणि शहाजी विजयी होऊन आला ही घटना शाहजहानच्या कारकिर्दीच्या तिसऱ्या वर्षाच्या घटनांत घालतों. म्हणजे कोणताहि आधार खोटा न मानतां मेळ बसूं शकेल.

९. पण येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ही सर्व पारिस्थितिक पुराव्याची चर्चा आहे. प्रत्यक्ष व स्वतंत्र पुरावा नसेल तेथें पारि-स्थितिक पुराव्याचें महत्त्व. पण शिवजन्मतिथीविषयीं पांच प्रत्यक्ष स्वतंत्र पुरावे असल्यानें येथें पारिस्थितिक पुराव्याची मातब्बरी नाहीं. म्हणून येथें पारिस्थितिक पुरावा प्रत्यक्ष व स्वतंत्र पुराव्याविरुद्ध जात असेल तर पारिस्थितिक पुरावा त्याज्य ठरविला पाहिजे. प्रत्यक्ष स्वतंत्र पुराव्याच्या निकषावर पारिस्थितिक पुरावा घासून पाहिला पाहिजे. पारिस्थितिक पुराव्याच्या कसोटीवर प्रत्यक्ष व स्वतंत्र पुरावा तपासावयाचा नाहीं.

१०. श्री. पगडी यांनीं आपल्या समर्थनांत जेधे शकावली कशी चुकली आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांनीं मूळ

जेधे शकावली कशी लिहिली आहे, हें समजावून घेण्याचा मुळींच प्रयत्न केलेला दिसत नाहीं. जेधे शकावलींत 'शके १५५१ शुक्ल संवत्सरे' असा मथळा देऊन त्याखालीं तीन स्वतंत्र कलमें लिहिलीं आहेत आणि तीं कलमें स्वतंत्र आहेत हें दर्शविण्यासाठीं प्रत्येक कलमांतील शब्द संपल्यावर एकाचा आंकडा घातला आहे. या तीन कलमांत शिवाजीच्या जन्मतिथीचें एक तपशीलवार कलम आहे. तेव्हां जेधे शकावली शिवाजी महाराजांचा जन्मशक देत नाहीं हें श्री. पगडी यांचें विधान अगदींच गलथानपणाचें आहे. जेधे शकावलींत कधीं एकाच कलमांत अनेक घटनांचा उल्लेख केलेला आहे. अशा वेळीं त्या कलमांत कालनिर्देश असेल तर तो अगदीं शेवटीं आलेल्या घटनेचा आहे असें धरावें लागतें. त्याप्रमाणें या संवत्सरांत चैत्र महिन्यांत इब्राहीम आदिलशाह मेला, नंतर सुलतान मुहम्मद गादीवर बसला, खवासखान त्याचा प्रधान झाला आणि मुरार जगदेव कारभारी बनला अशा चार घटना सांगितल्या आहेत. तेव्हां आम्हांला जेधे शकावलींतील कलमांचा अर्थ लावण्याची वर दिलेली जी पद्धत ठाऊक आहे तीप्रमाणें येथें आम्ही शक १५५१ च्या चैत्र महिन्यांत मुरार जगदेव कारभारी झाला आणि वरील तीन घटना या घटनेच्या पूर्वीं काय घडलें एवढेंच सांगतात असें समजतों.

११. येथें आपण हेंही लक्षांत घेतलें पाहिजे कीं, जेधे शकावलींत ज्या प्रसंगांमध्यें जेध्यांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भाग नव्हता व जे प्रसंग परक्यांसंबंधीं आहेत त्यांत चूक झाली असण्याचा संभवहि आहे. पण भोसल्यांचें घराणें व जेध्यांचा मूळ कर्तबगार पुरूष कान्होजी यांचा सर्वाधिक निकटचा संबंध असल्यामुळें शिवाजीच्या जन्मदिनाबाबत या शकावलींत चूक होण्याचा सुतराम् संभव नाहीं. जेधे शकावलींत जन्मदिनाचा तपशील शक १५५१, शुक्ल संवत्सर, फाल्गुन वद्य ३, शुक्रवार आणि घटकापळांसह हस्त नक्षत्र व गंडयोग असा दिला असून तो ज्योतिर्गणिताच्या दृष्टीनें तंतोतंत जुळणारा आहे. पण श्री. पगडी यांनीं श. १५५१ हें सालच जेधे शकावलींत दिलें नाहीं असें प्रथम धरलें व नंतर तें साल दिलें

असलें तरी तें चुकलें असून पुढील तपशील अंशतः चूक व अंशतः अचूक आहे असें ते समजलें अशी दुहेरी घोडचूक त्यांनीं केली. जंत्री-वरून इ. १६२८ मार्च १२, फाल्गुन वद्य ३ ला पडतें हें समजतें; पण त्या दिवशीं जेधे शकावलींत सांगितल्याप्रमाणें शुक्रवार नसून बुध-वार होता व हस्तनक्षत्र नसून स्वाती नक्षत्र होतें. तेव्हां इ. १६२८ सालीं जेधे शकावलींतील तपशील जुळत नाहीं हें मात्र त्यांनीं लक्षांतहि घेऊं नये याबद्दल दुःख होतें. जेधे शकावलींतील शिव-जन्माचा ज्योतिषी तपशील इ. १६२७,१६२८ व १६२९ या तिन्ही वर्षांत जुळत नसून केवळ इ. १६३० मध्येंच जुळतो हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. येथें श्री. पगडी यांनीं वडाची साल स्पष्टपणें पिंपळास चिकटविली आहे.

१२. शिवभारतांत शिवजन्माचा तपशील श. १५५१ फाल्गुन वद्य ३ रात्र एवढा दिला आहे. जेधे शकावलींत शिवजन्माची वेळ दिलेली नाहीं. शिवभारतात ती आहे. पण ती रात्र अशी ढोबळ दिली आहे. रात्र म्हणजे रात्र लागल्यापासून रात्र संपेपर्यंत केव्हांही असा अर्थ होतो. पण राजस्थानांत ज्या तीन जन्मपत्रिका सापडल्या आहेत त्यांत शक १५५१ किंवा संवत् १६८६ अमांत फाल्गुन किंवा पूर्णिमांत चैत्र, वद्य ३ शुक्रवार हा तपशील देऊन शिवाय सूर्योदयानंतर ३० घटका ९ पळें किंवा रात्रीं १ घटका १ पळ असा जन्मसमय दिला आहे. तो शिवभारतातील निशि शब्दाशीं जुळतो. आणि इतर तपशील जेधे शकावली व शिवभारत यांशीं जुळतो. किंबहुना नव्या जन्मतिथीला तीन जन्मपत्रिका हे आणखी तीन आधार आहेत हें श्री. पगडी यांनीं लक्षांत घेऊं नये किंवा त्यांच्या लक्षांत येऊं नये याचें अतीव दुःख होतें.

---

# २८. शिवकालीन राजपत्रांची लेखनपद्धति

१. पत्रव्यवहार दोन प्रकारचा असतो. एक खाजगी व दुसरा सर-कारी. सरकारी पत्रांतहि दोन भाग पडतात. १ वतनी व २ राज-कारणी. शिवकालांत दक्षिणेंत ४ शाह्या झाल्या. १ ली निजामशाही,

२ री आदिलशाही, ३ री मुघलाई व ४ थी शिवशाही. एकाच रियासतींतील कागदांत पुन्हा ३,४ भेद पडतात, सुलतान—बादशाहाकडून सुटलेल्या हुकुमाला फर्मान म्हणत असत. प्रधान, सेनापति, राजस्त्री, इत्यादिकांनीं काढला तो हस्बुलहुक्म. तिय्यम प्रतीच्या अधिकाऱ्यांनीं म्हणजे सुभेदार वगैरेंनीं दिलेल्या पत्राला पर्वाना,खुर्दखत म्हणतात. चौथ्या प्रतीच्या म्हणजे ठाणेदार वगैरेंनीं लिहिलेल्या पत्राला हुजत किंवा मिसल म्हणत. निजामशाही कागदांत पहिल्या व तिसऱ्या प्रकारचे कागद, तसेंच मुघली कागद कमी प्रमाणांत सांपडले आहेत. त्यांचे मानानें विजापुरी व शिवशाही कागद पुष्कळ मिळाले आहेत. या कागदांविषयीं माहिती द्यावयाची म्हणजे कागद, शिक्के, फार्सी मजकूर, मराठी मजकूर, तारखा, शेरे इत्यादींची माहिती द्यावयाची. ही माहिती देतांना एक अडचण अशी येते कीं, पहिल्या व दुसऱ्या प्रकारच्या कागदपत्रांवरील शिक्के साधारण स्पष्ट असले तरी तिसऱ्या व चोथ्या प्रकारच्या पत्रांवरील शिक्के अगदीं अस्पष्ट असतात; शिवाय मुसलमानी रियासतींतील शिक्के बहुधा फार्सी असत. हे फार्सी शिक्के छापलेले आढळांत नाहींत. यामुळें त्यांचेविषयीं फारशी माहिती देतां येणार नाहीं ? दुसरी अडचण अशी कीं, मूळ कागदांविषयीं माहिती द्यावयाची तर बाह्यांग वर्णनाकरितां मूळ कागदच हाताशीं असले पाहिजेत व अंतरंगाविषयीं लिहावयाचें म्हणजे यथातथ्य छापलेला पत्रव्यवहार मिळाला पाहिजे. या दृष्टीनें कै. पारसनिसांनीं छापून काढलेल्या कोणत्याही पुस्तकाचा उपयोग करतां आला नाहीं व बरीचशीं साधनें व्यर्थ ठरलीं. तरी पण जमवितां आली ती माहिती थोडक्यांत पुढें दिली आहे. पत्रांच्या तारखा निश्चित करणें हा स्वतंत्रच भाग असल्यामुळें त्याचें विवरण निराळ्या ठिकाणीं व वेळीं केलें आहे. पुढें सांगितलेल्या गोष्टी निरपवाद सिद्धांतवत् मानण्याचें कारण नाहीं. अधिक व सूक्ष्म संशोधनानें निश्चित माहिती मिळण्याचा संभव आहे. सर्वसामान्य वर्णनाला आधार दिलेले नाहींत. पण प्रत्येक विशेषाला आधार दाखविला आहे. खाजगी पत्रव्यवहार विविध व अफाट असल्यानें त्यांचा अभ्यास करून माहिती देणें कालावधीचें आहे.

म्हणून येथें फक्त राजकीय पत्रव्यवहाराविषयीं माहिती दिली आहे.

२. **निजामशाही पद्धत**—निजामशाही मूळ कागद विशेषतः फर्मानें व दुय्यम प्रतीचे कागद फार थोडे पहावयास मिळाल्यानें त्यांचे येथील वर्णन मर्यादित स्वरूपांत खरें आहे येवढें लक्षांत ठेवून ही माहिती समजून घ्यावी. निजामशाही फर्मानांचा कागद धूसर पिवळ्या रंगाचा आणि आदिलशाही कागदाचे मानानें लहान आकाराचा व हलक्या प्रतीचा असतो. या कागदास ४ घड्या पाडलेल्या असून उजव्या बाजूची पहिली घडी समान म्हणून मोकळी सोडलेली असते. तसेंच आरंभाचा $\frac{1}{3}$ भाग मोकळा सोडून नंतर कोणतेंही शीर्षक न घालतां एकदम सुलतानाचा लहान (१।। × ।।।.इंच व्यास) शिक्का उठविलेला असतो. शिक्कयाखालीं 'अझ दीवान रुख्तखाना खास' किंवा 'अझ रुखतखाना खास' या शब्दसमूहानें फर्मानांतील फार्सी मजकुरास आरंभ झालेला असतो. नंतर फर्मान पाठविलें त्याचा निर्देश 'बजानिब' (प्रति) असा शब्द घालून करतात. बदलणाऱ्या अधिकाऱ्यांपुढें 'हाल व इस्तिक्बाल' (वर्तमान व भावी) हे शब्द असतात. नंतर अधिकाऱ्यांचा अधिकारप्रदेश सांगितलेला असतो. त्यापुढें 'जाणावें' या अर्थी (संस्कृत अस्तु वः संविदितम्) 'बिदानद' शब्द घालतात. यापुढें अरबी शब्दांत सुहूर सन सांगितलेला असतो. नंतर इनामी सनदांतून ज्याला इनाम दिलें आहे किंवा चालू ठेविलें आहे त्याचें म्हणणें 'मालूम नमूद' म्हणून सांगितलेलें असतें. सुल्तानाबद्दल 'दर बंदगी हजरत' (स्वामीचे सेवेसी) असे शब्द नेहमी वापरलेले असतात. नंतर सुल्तानानें दिलेल्या आज्ञेचा मजकूर सुरू होतो. निजामशाहींत (मलिकंबर वगैरे) दिवाणाचे प्रस्थ माजल्यानंतरच्या फर्मानांतून 'बर हुक्म इशारत दीवान आअला' (दिवाणाच्या सूचनेप्रमाणें) असें म्हणून सुल्तानी आज्ञेच्या मजकुरास प्रारंभ झालेला असतो. तसेंच अशा हुकुमाखर शेवटीं किंवा मध्येंच 'बरजा–रुक्अ–मम्लिकत मदारी मलिकंबर यकंदर इन्आमदारान्' (मलिकंबरनें पाठविलेल्या रोख्यानुसार) असा शेरा असतो. फर्मानाचा उल्लेख करावयाचा असल्यास त्या ठिकाणीं 'फर्मान बासिक्कह खास' वगैरे शब्द योजलेले

असतात. जमीन इनाम देतांना त्या जमिनीची मशागत करणारा ( = प्रज) कोण हेंही बहुधा फर्मानांत सांगतात. वतनी फर्मानांच्या शेवटीं 'दर हर साल उज्र दर फर्मान न कुनंद' (हर साल फर्मानाचा उजूर न करणें) 'तअ्लीक गिरिफ्तह अस्ल बाज दहंद' (तालीक घेऊन असल फिरावून देणें) वगैरे वाक्यें असतात. राजकारणी पत्रांत असलीं वाक्यें नसतात. त्यांत सुहूर सन लिहिल्यावर हुकुमाचें कारण व त्यावर दिलेला हुकूम सांगून एकदम फर्मान संपविलेलें असतें. कौलांतून 'दरी बाब कौल' असा मजकूर असतो. फार्सी मजकुराच्या खालीं व शेवटच्या १।२ ओळींच्या उजव्या अंगास प्रधानाचा शिक्का असतो. नंतर डाव्या किंवा उजव्या अंगास समास सोडून मराठी मजकूर लिहिलेला असतो. हा मजकूर म्हणजे फार्सी मजकुराचें भाषांतर असतें. मुख्य मजकूर संपल्यावर इनामाचा निराळ्या हस्ताक्षरानें पुन्हा अगदीं थोडक्यांत उल्लेख करितात. नंतर 'मुरत्तब शुद'अचा फार्सी शिक्का उठवून त्याच ओळींत 'मोर्तब सुदु' लिहितात (मोर्तब सुदु म्हणजे पुरें झालें; याचीच मर्यादेयं, लेखनालंकार, लेखन सीमा, लेखन शुध, वगैरे मराठी रूपांतरें आहेत). मोर्तबाच्या ओळींत शेवटीं 'रुजू सुरुनिवीस' हा शेरा असतो. मराठी व फार्सी मजकूर अशा तऱ्हेनें लिहिलेला असतो कीं, शेवटची ओळ बहुधा पूर्ण केलेली असते. मराठी मजकुराच्या खालीं एकेका ओळींत पुढीलप्रमाणें शेरे असतात.

(१) रुजु सुदु रुजु मुश्रीफ

(२) तारीख, महिना व अरबी शब्दांनीं सांगितलेलें हिजरी वर्ष

(३) पाा हुजूर (निदेश समक्ष); हुजूरच्या जागीं कधीं कधीं एखाद्या मनुष्याचें नाव असतें. हा मनुष्य म्हणजे सुल्तानाचा खातेप्रमुख असतो.

३. यापुढें पाच उभ्या रेघा ओढून प्रत्येक रेघेच्या वर, मध्यें व शेवटीं पुढे दाखविल्याप्रमाणें शेरे असतात.

| | | |
|---|---|---|
| सदा सुदु<br>मुश्रीफ | तालीक सुदु<br>सुदा सुदु सुप्र सुदु<br>दफ्तरखास मजमू | सुप्र सुद<br>मोर्तब सुप्र सुदु<br>न्याबत सुरुनिवीस |

। । । । ।

| | | | | |
|---|---|---|---|---|
| बारु सुदु | बारु सुदु | बारु सुदु | बारु सुदु | बारु सुदु |
| तालीक सुदु | तालीक सुदु | | तालीक सुदु | तालीक सुदु |

पैकीं सदा व सुप्र या शब्दांचें वाचन कोणत्या फार्सी शब्दांचे अपभ्रंश ते शब्द आहेत हें न समजल्यानें, नीट झालें नाहींसें वाटतें. मराठी मजकुराचा मुख्य भाग संपल्यापासून निरनिराळ्या ठिकाणीं जे निरनिराळे शेरे असतात त्या प्रत्येकाचें वळण निराळें असतें. पाठीवर जे शेरे लिहिलेले असतात ते पाठीमागें दाखविलेल्या उभ्या ओळींच्या दोन्ही अंगांस लिहिलेले असतात. पाठीवरील शेऱ्यांच्या बाबतींत विकल्प सहसा आढळत नाहीं. 'तालीक सुद' हा शेरा १, २, ४, ५ या रकान्यांपैकीं एका किंवा अनेक रकान्यांच्या शेवटीं असतो. मुजुमदाराच्या शेऱ्याच्या शेवटीं बहुधा नसतो. ज्या ज्या अधिकाऱ्यांना फर्मानाची नक्कल आपल्या दप्तरीं ठेवणें आवश्यक असे त्यांनीं त्यांनीं हे शेरे (तालीक सूद) केलेले असावेत. सनदापत्रांतील कानूजाबत्यांत मुजुमदाराच्या आज्ञेंत दप्तरदारानें रहावें असें सांगितलें आहे. अर्थात् दप्तरदारापाशीं नक्कल असल्यावर पुनः मुजुमदारास नक्कल करून घेण्याचें कारण नाहीं. म्हणूनच मुजुमदाराचा 'तालीक सूद' हा शेरा नसतो असें वाटतें (भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक व. २, पृ. १५०-१५६; रा. खंड २०, ले. २५४-२५६; रा. खंड १५, ले. ३८५, ४००, ४०१ व भा. इ. सं. मंडळाच्या संग्रहांतील कांहीं अप्रकाशित कागद).

४. निजामशाही दुय्यम प्रतीचे कागद म्हणजे आज तरी मलिकंबर व शहाजी यांनीं लिहिलेलीं मराठी खुर्दखतें होत. हे कागद फर्मानाचे मानानें लहान, जास्त काळे व कमी प्रतीचे असतात. आरंभीं जागाहि बेताचीच सोडलेली असून समास मुळींच नसतो. शीर्षक कोणतेंही नसतें. आरंभीं ज्या अधिकाऱ्यानें खुर्दखत पाठविलेलें असतें त्याचा शिक्का व त्याखालीं फार्सी मजकूर न लिहितां

एकदम मराठी मजकूरच लिहिलेला असतो. आरंभ 'अज रख्त-खाने' [मलिकंबर, शहाजी वगैरे] या शब्दांनीं केलेला असतो. अधिकाऱ्यांच्या नांवापूर्वी 'खुदायेवंद, खान आलीशान अजम अकरम' वगैरे सन्मानदर्शक उपपदें असून नांवापुढें खुलिदयाम दौलतहु (अखंडितलक्ष्मीअलंकृत) हें विशेषण असतें. नंतर ज्याला पत्र पाठविलें त्याचा सोपपद उल्लेख 'तहा' किंवा 'बजानिब' हा शब्द घालून करतात. नंतर कालाचा उल्लेख. पुढें हुकूम देण्याचें कारण सांगून आज्ञेचा मजकूर लिहिलेला असतो. इनामी पत्रांवर शेवटीं फर्मानांतून असलेलीं वाक्यें असतात. राजकारणी हुकूम आज्ञेचा मुख्य भाग लिहून होतांच एकदम संपविलेले असतात. शेवटीं 'मोर्तब सुद' हा शेरा व मोर्तबचा शिक्का आणि त्याखालीं क्रमानें पुढील शेरे असतात.

तेरीख [तारखेंचा आकडा*] माहे [महिन्याचें नांव*] रुजु सुरु
[महिन्याचें नांव*] निवीस

बार सुदु सुरु सुदु

५. हे सर्व शेरे निरनिराळ्या वळणाचे असतात एवढेंच नव्हे तर तारखेच्या शेऱ्यांतही दोन वळणें असतात. तसेंच दुय्यम प्रतीच्या सुभेदार वगैरे अधिकाऱ्यांनीं लिहिलेल्या पत्रांत हे शेरेही कमी जास्त असतात. अगदीं आवश्यक शेरे म्हणजे मोर्तब सुद व तारीख हे होत. उ. शिवचरित्रसाहित्य खंड २, ले. १२५, १९८–२०२.

६. तिसऱ्या प्रतीच्या अधिकाऱ्यांनीं म्हणजे हवालदार वगैरे लोकांनीं लिहिलेलीं पत्रें दोन प्रकारचीं दिसतात. या अधिकाऱ्यांनीं वापरलेले कागद दुय्यम अधिकाऱ्यांनीं वापरलेल्या कागदासारखेच असतात. समास वगैरे नसतो. आरंभीं अधिकाऱ्याचा शिक्का असतो. शिक्याखालीं वतनी पत्रें 'अज दिवाण ठाणा' किंवा 'पर-गणे' या शब्दांनीं सुरू केलेलीं असतात. बाकी सर्व बाबतींत हे अधिकारी दुय्यम अधिकाऱ्यांचेंच अनुकरण करीत असलेले आढळ-तात. राजकरणीं पत्रांत ज्याला पत्र पाठवावयाचें त्याचा प्रथम सोपपद उल्लेख करितात. नंतर 'अजी' शब्द घालून ज्यांनीं पत्र पाठविले ते अधिकारी स्वतःचा उल्लेख करितात. अशा पत्रांतून

शिक्के बहुधा मुख्य मजकुराच्या शेवटीं शेवटीं उठविलेले आढळ-
तात. मुख्य मजकुरांत वर्षाचा उल्लेख न करितां शेवटीं फक्त
महिना व तारीख एवढेंच नमूद करितात किंवा नाहींही. यामुळें
अशा पत्रांचा नेमका काल ठरविणें कठीण जातें उ. शिचसा खं.
२, लें. २२८–२३१.

७. **आदिलशाही पद्धत**–शिवकालांत विजापुरास जे चार सुल्-
तान होऊन गेले त्या प्रत्येकाची पत्रलेखनपद्धत वेगळाली आहे;
येवढेंच नव्हे तर एकाच्याच कारकिर्दीतील पत्रांतही भरपूर विवि-
धता आढळते. असें असल्यानें पुढील मजकुरांत प्रत्येकाचें वैशिष्ट्य
सांगितलें आहे विजापुरी खाशांच्या फर्मानांचे कागद पारवे किंवा
गडद पारवे (क्वचित् पांढरे) असून निजामशाही फर्मानांचे मानानें
अधिक गुळगुळीत, पातळ व मोठे असतात. कागदांची लांबी १॥ ते
२ फूट व रुंदी ७॥ ते १०॥ इंच असते. आरंभीचा ⅓ व उजव्या
अंगचा ⅓ किंवा थोडा अधिक भाग समास म्हणून मोकळा सोड-
लेला असतो. आरंभींच्या या ⅓ भागांत दोन शीर्षकें असतात.
पैकीं 'अल्मुल्कु लिल्लाह' हें वाक्य सर्वच फर्मानांवर असतें; पण
त्याच्या अगोदरच्या शीर्षकांत विकल्प आढळतो. २ऱ्या इब्राहीम
आदिलच्या फर्मानांवर 'हुवल्खलील' हें शीर्षक असतें. मुहम्मद आदि-
लच्या आरंभींच्या फर्मानांवर वरील शीर्षक आढळतें. मागाहूनच्या
फर्मानांवर 'बिस्मिल्लाह अर्रहमान अर्रहीम' हें वाक्य आढळतें.
दुसरा अली आदिल व सिकंदर यांच्या फर्मानांवर पहिलें शीर्षक
'बिस्मिल्लाह अर्रहमान' अर्रहीम हेंच असतें. शीर्षकें झाल्यावर
शिक्का असतो. इब्राहीमचा शिक्का सुमारें १ इंच व्यासाचा असून
त्यांत 'नाद अलिय्यह' मंत्राचा मोनोग्राम असतो. मुहम्मद आदिलचा
शिक्का सुमारें २ ते २॥ इंच व्यासाचा असून त्यांत एकांत एक वर्तुळें
आहेत. अगदीं आंतल्या वर्तुळांत 'नाद अलिय्यह' मंत्राचा मोनोग्राम,
मधल्या वर्तुळांत 'शाहानशाह दीन मुहम्मद इब्राहीम दर [।* ]झेर
नगीन शाह शुद हफ्त इक्लीम' अशी द्विपदी व बाहेरच्या वर्तुळांत
नक्षी आहे. अली आदिलचे तीन शिक्के आहेत. पहिला शिक्का
कुयरीच्या आकाराचा, ३। × २॥. इंच व बहुदळी असून त्यांत पुढील

मजकूर आहे: या अली मदद मुहर शाही ज्ञद अज्ञ मिहर मुर्तजा बर मिहर व माह [।*] खुस्रुव आदिल अली बअद अज्ञ मुहम्मद बादशाह १०६८; दुसरा शिक्का वाटोळा व २॥ इंच व्यासाचा असून त्यांत पुढील मजकूर आहे : ज्ञेर फर्मान सिक्कह शाही ज्ञद बताईद हैदर अली इब्न मुहम्मद बादशाह; तिसरा शिक्का वाटोळा, पूर्वीच्याच आकाराचा व 'मुरीद नजफ शाह अली बादशाह [।* ]गाझी इब्न सुल्तान मुहम्मदशाह' अशा मजकुराचा आहे. पहिला शिक्का शक १५८२ पर्यंत, दुसरा १५८८ पर्यंत व तिसरा कारकिर्द संपेपर्यंत आढळतो. सिकंदर आदिलशाहाच्या फर्मानांवर प्रथम 'नाद अलिय्यह'चा शिक्का असे. पण पुढें वाटोळा, सुमारें १ इंच व्यासाचा 'सिकंदर सुल्तान इब्न अली आदिलशाह' अशा मजकुराचा शिक्का त्याच्या फर्मानांवर येऊं लागला. शेवटीं शेवटीं 'मदद या मुहियुद्दीन' असा शिक्का आलेला आढळतो.

८. नंतर मुख्य मजकुरास सुरवात होते. मजकुराला आरंभ 'फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त' या वाक्यखंडानें करतात. सिकंदरच्या कांहीं हुकुमांवर कित्येक वेळां हें वाक्य न येतां हेतुभूत मनुष्याच्या पदव्यांनाच सुरवात केलेली असते. पण अशीं उदाहरणें क्वचित्. नंतर मजकुरांत क्रमानें पुढील गोष्टी येतात.

(१) हेतुभूत मनुष्याचा सोपपद उल्लेख व त्याचा अधिकारप्रदेश. आरंभ 'बजानिब' शब्दानें करतात.

(२) शुहूर सनाचा उल्लेख अज्ञ हा शब्द पाठोमागें घालून येतो. पण प्रत्येक सुल्तानाच्या कारकिर्दींत कांहीं फर्मानें अशीं आढळतात कीं, ज्यांत या ठिकाणीं शुहूर सन नसतो. अशीं फर्मानें सामान्यतः राजकारणी असतात.

(३) वतनपत्र असल्यास वतन मागणाऱ्या मनुष्याचें म्हणणें सांगितलेलें असतें व राजकारणी पत्र असल्यास विशिष्ट हुकूम सोडण्याच्या कारणाचा निर्देश केलेला असतो.

(४) सुल्तानाचा हुकूम काय हें लिहिलेलें असतें.

(५) हद्दी घालून देणें, दर वर्षीं नव्या फर्मानाची मागणी न करणें,

नकल करून घेऊन असल परतून देणें किंवा चाकरी करून ऊर्जित करून घ्यावें किंवा या बाबींत कौल आहे वगैरे अर्थी मजकूर असतो.

(६) यापुढें तारीख, महिना व वर्ष यांचा उल्लेख येतो. राजकारणी पत्रांत तारीख व महिना घालून वर्ष क्वचित गाळतात.

९. मजकूर संपण्याच्या सुमारास उजव्या बाजूस परवानगीनें आरंभ होणारा शब्दसमूह असतो. २ऱ्या इब्राहीमच्या फर्मानांवर 'परवानगी हुजूर अश्रफ अक्दस हुमायून अअला' हा शब्दसमूह घालून सोपपद एखाद्या प्रधानाचा उल्लेख बअअलाम शब्दानें प्रारंभ करून येतो. उ.खान आलीशान सआदतनिशान रफीअउल्कद्र व अल् मकान इख्लासखान अमीरजुम्लह-शाहनवाझखान सर मजिलस. मुहम्मदशाहाच्या कारकिर्दींत प्रथम इख्लासखान व नंतर मुस्तफाखान प्रधान होते. इख्लासचा उल्लेख पूर्वीप्रमाणेंच येतो; पण मुस्तफाखानाचा उल्लेख 'बरिसालह कमतरीन बंदगान मुस्तफाखान' असा येतो. मुस्तफाखानानंतर मुहम्मदशाह, अली आदिलशाह व सिकंदर यांच्या फर्मानांवर प्रधानाचा उल्लेख बहुधा आलेला नाहीं. परवानगीचा शब्दसमूह मात्र मोठा होऊन 'परवानगी हुजूर खुर्शीद जुहूर अश्रफ अक्दस हुमायून अअला' अशा स्वरूपांत येऊं लागला. मुख्य मजकुराची शेवटची ओळ कागदाच्या डाव्या बाजूला अगदीं भिडलेली असते, कधींहि अर्धी असत नाहीं. मजकुराच्या खालीं इब्राहीम, मुहम्मद व अली या तीन सुल्तानांच्या कारकिर्दींत शिक्के उठविलेले दिसतात. पैकीं इब्राहीमच्या पत्रांवर हमखास असतातच. मुहम्मदाच्या कारकिर्दींत मुस्तफाखान होता तोंवर हमखास येतातच. पुढें नाहींत. इख्लासखानाचा शिक्का अकरा कोनांचा व सव्वा इंच लांबी-रुंदीचा आणि मुस्तफाचा वाटोळा आहे. अलीच्या आरंभींच्या पत्रांवर शिक्के आहेत पुढें नाहींत. याशिवाय अलीच्या पत्रांवर त्याच्या पहिल्या शिक्क्याच्या आकाराची पण प्रमाणानें लहान व 'हुवल् कादिर अली आदिलशाह इब्न सुल्तान मुहम्मद' या मजकुराची मोहर आहे. सिकंदरच्या पत्रावर मुळींच नाहीं. हे शिक्के कधीं एक, कधीं दोन, तर कधीं जोडून उठविलेले आढळतात. याशिवाय चौघांच्याही पत्रांवर लंबवर्तुळ व बदाम या आकारांच्या मोहराही

आहेत. शिवक्यानंतर इब्राहीम व मुहम्मद यांच्या कांहीं फर्मानांवर मराठी मजकूर (फार्सीचा सारांश) लिहिलेला आढळतो. तसेंच ज्यांवर नुसता फार्सी मजकूर आहे अशा कांहींच्या पाठीवर तारीख, महिना व अरबी शब्दांनीं दर्शविलेलें हिजरी वर्ष असतें. कांहींच्या पाठीवर प्रारंभीं ओळीनें ५ ते ७ शिक्के, त्याखालीं वरील प्रकारची तारीख व त्याखालीं पुढील क्रमानें ५ ते ७ शेरे असतात. हे शिक्के अगदीं खराब उठलेले असल्यानें नीट लागत नाहींत. पण जीं अक्षरें लागतात त्यांवरून ज्या अधिकाऱ्यांनीं शेरे लिहिलेले असतात त्यांचेच ते शिक्के असें वाटतें. शेऱ्यांचा क्रम पुढीलप्रमाणें असतो.

सवत द ...मुजुमदार मुत्तलअ बार दफ्तर बार मुश्रीफ बारसर
फ्तर शुद शुद खास मुमालिक दफ्तर

यांपैकीं अनुक्रम २–४ हे शेरे फार्सी लिपींत व बाकीचे मोडी लिपींत असतात. अनुक्रम २ चा शेरा नीट लागलेला नाहीं. अनुक्रम ६ च्या ठिकाणीं क्वचित् एक अगदीं अपरिचित न लागण्यासारखा शेरा असतो. मराठी मजकुरापासून पुढील सर्व गोष्टी फक्त २ रा इब्राहीम व मुहम्मद यांच्या पत्रांत व त्याही विकल्पानें आढळतात. २ रा अली व सिकंदर यांच्या पत्रांत यांपैकीं कोणतीही बाब आलेली नाहीं. हे सर्व शेरे भिन्न अक्षरांचे अर्थात् भिन्न व्यक्तींनीं केलेले असतात हें सांगणें नकोच. राजकारणी फर्मानांवर मराठी मजकुरापासून पुढील भाग आढळून येत नाहीं.

१०. फर्मानें लिहिण्याची ही प्रणाली ठरून गेल्यामुळें कांहीं शब्द व शब्दसमुच्चय फर्मानांतून वारंवार आलेले आढळतात. त्यांपैकीं फार वेळां येणारे त्यांच्या समानार्थी व पत्रप्रयुक्त शब्दांसह क्रमानें येथें देतों.

(१) फर्मान हुमायून शर्फ सुदूर याफ्त = दयाळू हुकुमास सुटण्याचा–सादर होण्याचा–मान मिळाला

(२) बजानिब = प्रति

(३) आमिलान–कारकुनान–हाल व इस्तिक्बाल = अमलदार–लेखक–वर्तमान व भावी

(४) अज्ञ शुहूर सनह = शुहूर सनापासून

(५) बदर्गाहि–जहांपनाह–वालाजाह–मुअल्ला–फलक बार्गाहि, बमसामअ जाह व जलाल = राजाधिराज – महाराज– राजश्री– यांस–यांच्या कानांवर

(६) इल्तिमास नमूद = विनंति केली; रोशन गर्दीद = प्रकाशित झालें; बमसामअ रसीद = कानांवर आलें.

(७) नजर इनायत फर्मूदह = कृपेची दृष्टी करून

(८) फर्मान– अश्रफ आतिफत हुमायून अअला – कजा जरियान = हुकूम (उर्वरित शब्द अर्थवादात्मक).

(९) अज राह मराहिम पादशाहानह व फर्त अवातिफ खुस्रवानह = बादशाही कृपेच्या रस्त्यानें

(१०) बराए–बिनाबरां इल्तिमास बखातिर मुबारिक–मुअल्ला–अअला–आवर्दह = विनंतीविषयीं महाराजांनीं-राजश्रीनीं मनास आणून

(११) मरहमत फर्मूदह दहानीदह शुदह अस्त = कृपेच्या हुकुमानें देववून टाकिलें आहे.

(१२) मी बायद कह = आवश्यक आहे कीं,

(१३) बमुजर्रद–वसूल–रसीदन फर्मान = फर्मान पोहोंचतांच

(१४) हदमहदूद कर्दह दर कब्ज व तसर्रुफ–दुंबाला नुमायंद = हद महदूद घालून हवाली करा–ताब्यांत द्या

(१५) मुमाइलैह–मुशारुन इलैह–मुइंझ इलैह = उपर्युक्त (मनुष्य)

(१६) मज्कूर, मस्तूर, मज्बूर = उपर्युक्त (बाब)

(१७) हस्बुल्–मस्तूर–अम्र, बमूजब फर्मान–बरहुक्म फर्मान = हुकुमाप्रमाणें

(१८) दर हर साल उज्र फर्मान मुजद्दद–नव–न कर्दह साल बसाल बर हमीन फर्मान जारी दारंद–साझंद = दर हर साल ताज्या फर्मानाचा उजूर न करतां सालोसाल याच फर्मानाप्रमाणें चालू ठेवावें.

(१९) तअलीक नविश्तह गिरफ्तह असल फर्मान बाज गुजारंद –दहंद = तालीक लिहून घेऊन अस्सल पत्र फिराऊन देणें. या

पत्राची प्रति लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटियासी परतोन देणें.

(२०) तादानंद = जाणिजे, कळावे, श्रुत होये.

(२१) मुसलमान व हिंदू यांना शपथा घातल्याचींही वाक्यें असतात. पण तीं निरनिराळ्या प्रकारचीं असल्यानें येथें दिलीं नाहींत.

(२२) ताकीद बलीग – कदघन् इतीम – ताकीद कुली = सक्त ताकीद

(२३) तहरीरन् फी – तहरीर = (तारखेस) लिहिलें.

ज्याप्रमाणें कांहीं शब्द व शब्दसमुच्चय वारंवार येतात त्याप्रमाणें सरदार, सुभेदार, वगैरे लोकांच्या पाठीमागें लावण्याचीं उपपदेंही ठरलेलीं आहेत. निजामशाही कागदांत उपपदें फारशीं येत नाहींत. मराठी पत्रांत कांहीं फार्सी व कांहीं संस्कृत उपपदें येतात. विजापुरी व मुघली कागदांत फार येतात. पण विस्तारभयास्तव तीं येथें देतां येत नाहींत.

११. दुय्यम प्रतीच्या विजापुरी सुभेदार वगैरे अधिकाऱ्यांनीं लिहिलेले कागद पांढरे,अरुंद व हलक्या प्रतीचे असत. सुमारें १/४ किंवा कमीच भाग समास म्हणून सोडीत. सुभेदार आरंभीं शिक्का उठवून फार्सी मजकूर लिहून त्याखालीं मराठी मजकूर लिहीत.शेवटीं 'मोर्तब सुद' हा शेरा व त्याचा शिक्का तसेंच, रुजू, सुरू, बार वगैरे निरनिराळे शेरे करीत आणि तारीख लिहीत. यांच्या पत्रांवर पा। हुजूर (निदेश समक्ष) व रा। हुजूर (संदेश समक्ष)असे दोन शेरे कधीं कधीं आढळतात. कधीं कधीं हुजूरच्या ऐवजीं एखाद्याचें नांव असतें. सुल्तानांस ज्याप्रमाणें खाजगी चिटणीस, प्रतिनिधि वगैरे सेवक असत त्याप्रमाणें सुभेदार वगैरे दुय्यम अधिकाऱ्यांनाही, त्यांजकडे बरेच मोठें अधिकार व प्रदेश असल्यानें, असत व सुभेदाराच्या गैरहजेरींत सुटलेल्या हुकुमावर हे लोक आपलीं नांवें घालीत. शहाजी वगैरे हिंदू सरदार फार्सी मजकुराऐवजीं फक्त मराठी मजकूर लिहीत. बाकी शेरे वगैरे करण्याची पद्धत मुसलमानी सुभेदारांप्रमाणेंच असे. सुभेदारांच्या हुकुमांचे आरंभीं 'रख्तखाने'चा प्रयोग नेहमीं असतो. सुभेदारांच्या नांवामागें खुदायेवंद, खान आलीशान,खान अजम-अकरम,मशरुल हजरत (राजविख्यात),

मशरुल अनाम (लोकविख्यात), मोतमीद दौलत (विश्वासनिधि) वगैरे उपपदें लावून पुढें खुलि – खल + दयाम – दवाम + दौलतहु (अखंडितलक्ष्मी–खंडेस्वरी) हें उपपद हमेशा लाविलेलें आढळतें. सुभेदारांचीं ही पत्रें लिहिण्याची धाटणी फर्मानांप्रमाणेंच असे. पण फर्मानांतील गौरवाची व अलंकारिक भाषा, पदव्यांची विपुलता, वगैरे गोष्टी या खुर्दखतांतून आढळत नाहींत. सुभेदारांच्या कित्येक पत्रांतून प्रथम ज्याला पत्र पाठविलें त्याचा उल्लेख, नंतर पाठविणाऱ्याचा उल्लेख व मजकुराच्या डाव्या अंगास कोठें तरी शिक्का असाही प्रकार आढळतो. हीं पत्रें त्या त्या मनुष्यांच्या गौरवार्थ असल्यानें असा विशिष्ट क्रम ठेवलेला असावा. उ. शिचसा २, ले. २३२–२३४ पहा. हीं पत्रें रणदूलह व अफजल या सुभेदारांचीं असूनही कान्होजी जेधे मान्यवर म्हणून प्रथम उल्लेखिलेला आहे.

१२. तिय्यम प्रतीचे अधिकारी म्हणजे हवालदार, महालकरी वगैरे. यांनीं लिहिलेल्या पत्रांचा कागदही सुभेदारी कागदासारखाच असून पत्र लिहिण्याची पद्धतही सुभेदारी पत्रांप्रमाणेंच आहे. आरंभीं २।३ शिक्के उठवून व क्वचित् फार्सी मजकूर लिहून नंतर मराठी मजकुराला सुरवात केलेली आढळते. सामान्यतः आरंभीं 'अज दिवाण ठाणा' असा प्रयोग येतो. शेवटीं 'मोर्तब सुद' हा शेरा व त्याचाच शिक्का उठविलेला असतो. हवालदाराच्या हाताखालीं सुभेदाराप्रमाणें सुरनीस, बारनीस, दफ्तरनीस वगैरे अधिकारी नसल्यानें त्याच्या पत्रावर 'रुजु, सुरु, बार', वगैरे शेरे सहसा नसतात. एकदां तारीख व महिना आणि पुन्हा फक्त महिना असे दोन शेरे निरनिराळ्या अक्षरांत लिहिलेले आढळतात. सुभेदाराप्रमाणेंच हवालदारानें देशमूख किंवा इतर मानार्ह लोकांस लिहिलेल्या पत्रांत आरंभीं मानार्हाचा उल्लेख व नंतर हवालदाराचा उल्लेख असा क्रम आढळतो. उ. रा. खं १५, ले ६३६. अशा पत्रांत शिक्काही बहुधा पत्र संपतां संपतां डाव्या अंगास कोठें तरी असतो.

१३. **मुघली पद्धत**–सामान्यतः सर्व मुघली पत्रांचा कागद मोठा, पिवळसर, जाड व घोटल्यामुळें तुकतुकीत असा असतो. आरंभींचा सुमारें $\frac{1}{3}$ भाग मोकळा व पुढल्या $\frac{2}{3}$ भागांत 'बिस्मिल्लाह अर्रहमान-

अर्रहीम' हें वाक्य असून त्याखालीं बादशाहाच्या नांवाचा चौकोनी (३"–३॥" × ३") तुघ्रा व त्याच्या उजव्या बाजूस तीन इंची गोल वा चौरस शिक्का असतो. सुमारें ½ भाग समास असतो. तुघ्र्याच्या खालीं मुख्य मजकुराला सुरवात होते. दिलेल्या देणग्या वगैरेंचा तपशील व अधिकाऱ्यांनीं केलेले शेरे हे सनदांच्या पाठीवर असतात. शिक्क्याच्या केंद्रस्थानी एक लहान वर्तूळ असून त्यांत बादशाहाचा बिरुदांसह उल्लेख असतो. लहान वर्तूळ व मोठें वर्तूळ यांमधील क्षेत्रांत एकमेकांस व आतांच्या दोन्ही वर्तुळास भिडणारीं अशीं ८।१० वर्तुळें असून त्या प्रत्येकांत गादीवर असलेल्या बादशाहाच्या एकेका पूर्वजाचें नांव असतें. कित्येक मुघली फर्मानांवर फर्मान देणाराचा पंजा उठविलेला असतो व फर्मानांत तसा उल्लेख केलेला असतो. उदाहरणार्थ, औरंगजेब–शिवाजी पत्रव्यवहार किंवा फरामीन-इ-सलातीनमधील ४०,७९,८० हे लेखांक पहा. पंजा उठविण्याचा हेतू पत्र ज्याला लिहिलेलें असतें त्यास पूर्ण विश्वास वाटावा हा असतो.

१४. मुघली पहिल्या प्रतीच्या पत्रांत प्रथम पत्रप्रकाराचा गौरवपूर्ण निर्देश करून नंतर ज्यास पत्र पाठवावयाचें त्याचा निरनिराळ्या पदव्यांसह निर्देश केलेला आढळतो. उ. उपर्युक्त पुस्तकामधील पत्रव्यवहार पहा. नंतर 'बादशाही कृपेस पात्र होऊन जाणावें कीं' अशा अर्थाचीं वाक्यें असतात; नंतर हुकूम देण्यास जें कांहीं कारण झालें असेल तें 'अर्जदाश्ती के' अशा प्रकारच्या शब्दांनीं नमूद करून पुढें मुख्य हुकुमाचे शब्द येतात. शेवटीं ज्या तऱ्हेचा हुकूम असेल त्या तऱ्हेचे शब्द असतात. उदाहरणार्थ, ताकीद असल्यास 'दरीं बाब ताकीद दानद' वगैरे मजकूर असतो. चाकरीस बोलाविलें असल्यास आपल्या चाकरीवरून आपलें ऊर्जित होईल वगैरे अर्थाचा मजकूर असतो. आश्वासनपर पत्र असल्यास 'आमचा लोभ आपणावर पूर्णपणें आहे असें जाणावें' वगैरे अर्थाचा मजकूर असतो. शेवटीं तारीख, महिना आणि सामान्यतः हिजरी व जुलूस यांचे आकडे असतात.

१५. मुघली दुय्यम व तिय्यम अधिकाऱ्यांचे तुलनेने थोडे कागद

आपणांस पहावयास मिळतात. त्यांत आरंभीं ज्यानें कागद पाठविला त्याचा–बादशाहाचा चाकर–या अर्थाचा शिक्का उठवून मजकूर लिहितात. जयसिंगाचें जें पत्र शिवचरित्रप्रदीपमध्यें छापलें आहे त्यांत व फरामीन-इ-सलातीनमधील इतरही परवान्यांत हाच प्रकार दिसून येतो. रा.२०,ले. २३८, २४४ यावरही असेच शिक्के आहेत. नंतर बहुधा मुत्सद्दियान मुहिम्मात हाल व इस्तिक्बाल किंवा गुमाश्तहा देशमूख व देशपांडे किंवा सरदेशमूख व सरदेशपांडे इत्यादि मजकूर असतो. तसेंच जयसिंगाच्या वरील पत्रांत शेवटीं 'झियादह अझ ईं चह नविश्तह बाशद (बहुत काय लिहिणें, विशेष–इतर–बहुत लिहिणें नलगे) हें वाक्य लिहिलेलें आढळतें. तिय्यम अधिकाऱ्यांचीं जीं पत्रें आहेत तीं इकडील पद्धतीनेंच लिहिलेलीं असतात. त्यामुळें त्यांचें विशेष वर्णन करण्याचें कारण नाहीं.

१६. **शिवशाही पद्धत**–शिवशाही कागद निजामशाही कागदाप्रमाणेंच पांढरा, परंतु अरुंद असा असतो. आरंभीं सुमारें ½ किंवा कमीच भाग मोकळा सोडलेला असतो. 'स्वस्तिश्री'नें आरंभ होणाऱ्या कागदांवर श्रीकार असतो. इतरांवर नाहीं. कागदाला चार साररूया घड्या पाडलेल्या असतात; पण समास मात्र मुळींच सोडलेला नसतो .'मोर्तब सुद' हा शेरा व त्याचा शिक्का, तसेंच लेखनसीमा वगैरे शेरे व 'मर्यादेयं' चा शिक्का आणि रुजु सुरुनिवीस किंवा इतर शेरे हे मुख्य मजकुराच्या अंगांतच असतात. तारखेचे दोन व सुरु सुद हे शेरे बहुधा कागदाच्या पाठीवर असतात.

१७. शहाजीनें निजामींत सर्वाधिकारी व आदिलशाहींत जागीरमुकासे–दार म्हणून नोकरी केली. दोन्ही शाह्यांतील त्याचे कागद दुय्यम प्रतीचेच सांपडतात. आरंभीं शहाजीचा फार्सी शिक्का असतो व नंतर 'अज रूतखाने शहाजी राजे' म्हणून मजकुरास सुरवात असते. कांहीं कागदांवर मजकुराच्या डाव्या अंगास 'रवां शुद,' असा फार्सी शिक्का असल्याचें आढळतें. शेवटीं 'मोर्तब सुद' व मोर्तबचा फार्सी शिक्का, तारखेचे दोन शेरे, पाा, राा, रुजु, सुरु, वगैरे शेरे तत्कालीन विजापुरी सुभेदारांप्रमाणेंच केलेले आढळतात. शहाजीच्या पत्रांतून फार्सी मजकूर नसतो येवढाच शहाजी व इतर मुसलमान

जागीर—मुकासे—दार यांच्या पत्रांतील फरक होय.हा घोरपडे, खराटे, घाटगे, निंबाळकर वगैरेंचीं जीं पत्रें सांपडलीं आहेत त्यांतही दिसून येतो. तसेंच शहाजीच्या पत्रांतही मानार्ह लोकांचा उल्लेख प्रथम व नंतर शहाजीचा उल्लेख असलेला आढळतो. अशा पत्रावर शिक्का आरंभीं न करतां बहुधा ३।४ ओळीनंतर डावे अंगास केलेला आढळतो. उ. शिचसा खं.१, ले. ८७ पहा. यांत प्रथम चांबळीच्या सरनाइकांचा उल्लेख असून नंतर शहाजीचा उल्लेख आहे.

१८. शिवाजीच्या पत्रांत २।३ प्रकार आढळतात. पहिला प्रकार म्हणजे वतनपत्रें व कौलनामे यांचा. प्रथम या पत्रांचे बाबतींत शिवाजीनें शहाजीचें अनुकरण केलें. उ. शिचसा खं. २, ले. २३९ हें शिवाजीचें विश्वसनीय असें पहिलेंच पत्र आहे. हें पत्र सुभेदारी पत्राप्रमाणें आहे. शहाजीचा शिक्का फार्सी होता. शिवाजीनें संस्कृत मजकुराचा शिक्का केला. शेवटीं 'मोर्तब सुद' आहे. शिक्का नाहीं. रुजु वगैरे मामुली शेरे आहेत. शिचसा खं. २, ले १२० या पत्रांत शेवटीं 'मोर्तब सुद' असून त्यापुढें त्याचेंच संस्कृत रूपांतर जें 'मर्यादेयं विराजते' त्याचा शिक्का आहे. इतर शेरे नेहमींप्रमाणें आहेतच. राजवाडे खं. १५, ले. ४३८ (श. १५७५) यांत 'प्रतिपद्' 'सामराज मतिमत' व 'मर्यादेयं' हे शिक्के व मोर्तब, पा।, रा।, हे शेरे असून शिवाय इतर शेरे आहेत. सनदापत्रें पृ. ११४, ले. ५ हें वतनपत्र आहे.यांतही सुभेदारी पद्धत दिसते.शेवटीं 'पा। हुजूर' व 'रा। पंताजी गोपिनाथ चिटणीस' असे शेरे आहेत. 'मोर्तब असे' हाही शेरा आहे. राज्याभिषेकानंतरही शिवाजीचीं कांहीं इनामपत्रें या स्वरूपांत सांपडतात. उ. शिचसा खं.२, लें. २७७ पहा; यांत आरंभीं 'प्रतिपद्' ही मुद्रा, 'अज रख्तखाने' या शब्दांनीं आरंभ, परवानगी हुजूर, 'मोर्तब सुद' हे शेरे 'मर्यादेयं'चा शिक्का इ. सर्व तपशील आहे. डाव्या बाजूस प्रधानाचा शिक्का मात्र अधिक. श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें ले. १४ मध्यें मात्र लिहिण्याची पद्धत बदलली आहे. ही नकल असल्यामुळें शिक्के, शेरे इ. दिलेले नाहींत. पण आरंभ 'स्वस्ति श्री राज्याभिषेक शके' असा केला आहे व शेवटीं जाणिजे (तादानंद) आहे.

१९. कौलनाम्यांच्या लेखनांत वतनपत्रांचेंच अनुकरण केलेलें दिसतें. उ. सं. ३, पृ. १६७ पहा. याचा आरंभ 'ई कौलनामा अज रूतखाने' असा केला आहे. मजकुराच्या आरंभीं 'प्रतिपद्' व शेवटीं 'मर्यादेयं' असे शिक्के आहेत. शिचसा खं. २, ले. १३९ हाही कौलनामाच आहे. यांत आरंभीं 'प्रतिपद्' शिक्का 'ई कौलनामा अज रूतखाने' असा आरंभ, डाव्या अंगास 'शामराज मतिमत' चा शिक्का, शेवटीं 'पा, रा, तारीख' हे शेरे व 'मर्यादेयं'चा शिक्का आहे. कौलनामे लिहिण्याची हीच पद्धत श. १५९७ (राज्याभिषेकानंतर १ वर्ष) मध्येंही दिसते. उ. श्रीका ले. १३मध्यें प्रारंभीं 'प्रतिपद्' मुद्रा, 'कौलनामा अज रूतखाने' असा आरंभ, डाव्या बाजूस मोरोपंताचा शिक्का शेवटीं 'परवानगी, मोर्तब सुद' वगैरे शेरे आणि 'मर्यादेयं'चा शिक्का या सर्व गोष्टी आहेत.

२०. शिवाजीच्या पत्रांचा दुसरा प्रकार म्हणजे राजकारणी पत्रें. यांत प्रथम मानार्ह व्यक्तीचा उल्लेख व नंतर शिवाजीचा उल्लेख असें आढळतें. उ. शिचसा खं. १, ले. ८८ मध्यें प्रथम निळकंठ-राव व नंतर शिवाजी आहे. पत्र खाजगी स्वरूपाचें असल्यानें शिक्कामोर्तब व शेरे नसावेत; किंवा नकलकारानें गाळले असावेत. असेंच एक पत्र राजवाडे खंड १५, ले. ३३८ हें आहे. यांत प्रथम कान्होजीचा उल्लेख व नंतर प्रति म्हणून शिवाजीचा उल्लेख, शेवटीं 'बहुत काय लिहिणें' (झियादह अज्ञ ईं चह नविश्तह) हें वाक्य व 'मर्यादेयं' ची मुद्रा आहे. आपल्याहून मोठ्या मनुष्यास पत्र लिहावयाचें असल्यास आपल्या नांवाची मुद्रा खालीं करावी असें एके ठिकाणीं लिहिलें आहे. याचें उदाहरण म्हणून प्रस्तुत पत्र सांगतां येईल. पण अशीं पत्रें अगदींच दुर्मिळ आहेत. सं. ४, पृ. ७९ वर एक शिवाजीचें पत्र आहे. त्यांत प्रथम देशाधिकारी व नंतर शिवाजी असें आलेलें आढळतें. शेरे मामुली आहेत. नक्कल असल्यानें शिक्के समजण्यास मार्ग नाहीं. राजवाडे खं. २१, ले. ३ (श. १५८४) मध्यें प्रथम सुभेदाराचा व नंतर शिवाजीचा उल्लेख आहे. 'प्रतिपद्' हा शिक्का नसून डाव्या बाजूस शाम-राजाचा व खालीं 'मर्यादेयं' चा शिक्का आहे. 'मोर्तब सुद,' तारीख,

रुजु, वगैरे शेरे नेहमीप्रमाणें आहेतच. 'जाणिजे' असा शब्द मुख्य मजकुराच्या शेवटीं आहे. श्रीका. ले. १६ (श. १५९८) मध्यें प्रथम सज्जनगडचा हवालदार व नंतर शिवाजी असे निर्देश आहेत. नेहमींप्रमाणें (१ किंवा २ ओळी सोडल्यावर) मजकुरांत डाव्या अंगास मोरोपंताचा शिक्का, शेवटीं तारीख, परवानगी हुजूर, मोर्तब सूद वगैरे शेरे व 'मर्यादेयं' चा शिक्का या गोष्टी आहेत. राजपत्र झाल्यावर केवळ प्रधानांनीं दिलेल्या या दुसऱ्या प्रतीच्या कागदांत 'प्रतिपद' ही मुद्रा नसते. श. १५९८ नंतर ही पद्धत बदलून 'स्वस्ति श्री'नें आरंभ होणारी संस्कृतप्रचुर पद्धत अमलांत आली असावी. उ. राजवाडे खं. ८, ले. ३३–३६ पहा. यांचा आरंभ 'स्वस्ति श्री'नें केला आहे. प्रथम आज्ञा करणारा शिवाजी व नंतर आज्ञप्त मनुष्य हा क्रम आहे. यांत 'प्रतिपद्' ही मुद्रा नाहीं. मोरोपंताचा शिक्का आहे. शेवटीं 'परवानगी हुजूर'च्या ऐवजीं 'मजुरा असे' हे शब्द व 'मोर्तब सुद' या ऐवजीं 'लेखनसीमा' हे शब्द आहेत. 'मर्यादेयं'चा शिक्का आहेच.

२१. शिवकालीन कागदांचा तिसरा प्रकार म्हणजे तह, करारनामे, याद्या, वगैरे होत. हे सर्व कागद कलमबंद असत. प्रत्येक कलमाच्या शेवटीं 'मर्यादेयं' चा शिक्का उठविलेला आढळतो. तसेंच कांहीं तहावर म्हणजे ठरावांवर प्रारंभीं 'प्रतिपद्' चा शिक्का व शेवटीं 'मोर्तब सुद' व 'मर्यादेयं' चा शिक्का असें आढळतें. उ. राजवाडे खंड ८, ले. २१ किंवा त्याच खंडांतील इतर कागद पहा. पण खरें सांगायचें म्हणजे असले शिवकालीन कागद फारसे सापडलेले नाहींत. यामुळें त्यांविषयीं निश्चित माहिती देतां येणें अशक्य आहे.

२२. शिवाजीच्या पत्रांची लिहिण्याची जी पद्धत तीच शिवाजीच्या दुय्यम व तिय्यम अधिकाऱ्यांनीं उचललेली होती. उदाहरणार्थ श्रीका १७–३२ हे लेखांक पहा. या सर्वांत अगोदर ज्याला पत्र लिहिलें त्याचा निर्देश व मागून अनाजी दत्तो, दत्ताजी त्रिमल, मोरो त्रिमल वगैरेंचे निर्देश आहेत.

२३. या चारी शाह्यांचीं विशेषतः शिवशाहीचीं पत्रें तपासून पहातां पुढील अनुमानें निघतात.

(१) वतनी पत्रें व कौलनामे या पत्रांवर प्रारंभीं शिवाजीचा 'प्रतिपद्' शिक्का, डाव्या बाजूस प्रधानाचा शिक्का व शेवटीं 'मर्यादेयं' चा शिक्का असून बहुतेक सर्व शेरे लिहिलेले असतात. आरंभीं 'अज रुतखाने' घालून शिवाजीचा उल्लेख व 'तां' घालून पत्र मिळविणाराचा उल्लेख केलेला दिसतो. मोकदम व हुद्देदार यांना लिहिलेल्या पत्रांत हीच पद्धत आढळते.

(२) हवालदारापासून पुढच्या सर्व अधिकाऱ्यांना व मान्यवर लोकांना लिहिलेल्या पत्रांत प्रथम अधिकारी व मान्यवर आणि नंतर शिवाजी असे निर्देश आलेलें आहेत. 'प्रतिपद्' शिक्का अशा पत्रांवर नसतो. डाव्या अंगास प्रधानाचा व शेवटीं 'मर्यादेयं' हे शिक्के व इतर शेरेही नेहमीप्रमाणें आढळतात.

(३) राज्याभिषेकानंतर पत्रें लिहिण्याच्या दोन पद्धती पडलेल्या दिसतात. एक पूर्वीची आणि दुसरी 'स्वस्ति श्री' नें आरंभ होणारी व सनदापत्रांवर आढळणारी. शिक्के व शेरे या बाबतींत पूर्वीचीच पद्धत कायम राहिली. मात्र फार्सी शेऱ्याऐवजीं मराठी व संस्कृत शेरे अधिक प्रचारांत येऊं लागले.

(४) मितीच्या बाबतींतही हा फरक राज्याभिषेकानंतर हळूहळू पडलेला दिसतो.

(५) दुय्यम व तिय्यम अधिकारी मात्र आपली पूर्वीचीच पद्धत चालवीत असत.

(६) शिवाजीच्या बहुसंख्य पत्रांवर मुसलमानी लेखनपद्धति व भाषासरणी यांचा फार परिमाम झाला होता.

(७) शिवाजीच्या पत्रांत कागद, शिक्के व शेरे या बाबतींत निजामशाहीचें किंवा विजापुरी खुर्दखतांचें अनुकरण फार आहे.

(८) मुघली व विजापुरी पत्रांप्रमाणें शिवाजीच्या पत्रांत पदव्यांची विपुलता आढळत नाहीं.

(९) पत्र कोणाला कसें लिहावयाचें या बाबतींत चारही शाह्यांत जवळ जवळ एकच पद्धत चालू असलेली दिसते. कदा-

चित् मुघली लेखनपद्धतीच थोडी निराळी असावी.

(१०) फार्सी भाषेंतील शेकडों शब्द व शब्दसमूह मराठी राज्यकर्त्यांनीं जसेच्या तसे किंवा रूपांतर करून घेतले आहेत.

(११) ज्या गोष्टी मराठी राज्यकर्त्यांनीं मुसलमानांपासून घेतल्या असें दिसतें त्या मुसलमानांनीं कोठून आणल्या याचा शोध केला पाहिजे. कदाचित् त्यांपैकीं पुष्कळ भाग मुसलमानपूर्वकालीन हिंदू राज्यकर्त्यांपासून घेतला असण्याचा संभव आहे. कदाचित् बगदादकडील राज्यांतूनही त्यांपैकीं कांहीं गोष्टी आलेल्या असण्याचा संभव आहे.

२४. शिवकालीन कागदांत मुसलमानी व हिंदू अशा दोन पद्धतीच्या मिती येतात. पोर्तुगीज, डच, इंग्रज, फ्रेंच इत्यादि परदेशी लोकांमुळें ख्रिस्ती पद्धतही कोठें कोठें आली आहे. दक्षिणेंतील तत्कालीन कागदपत्रांत हिजरी, फसली, शुहूर, जुलूस, इसवी, शालिवाहन, जव्हार व राज्याभिषेक या कालगणना आल्या आहेत. यांतील विशेष येथें देतों.

२५. **निजामशाही पद्धत**– निजामशाही फर्मानांत आरंभीं शुहूर सन घालीत व शेवटीं हिजरी घालीत. मात्र हिजरी सन आंकड्यांत न घालतां तदंकवाचक जे अरबी शब्द त्या शब्दांनीं दर्शवीत. उदा. राजवाडे खं २०, लें. २५४, २५५ हीं निजामशाही पत्रें पहा. यांत आरंभीं 'सुा सन सबा अलफ' असा शुहूरचा उल्लेख आहे व शेवटीं 'तेरीख १७ किंवा २२ माहे जिल्कादी खमस अशर अलफ' असा हिजरी सनाचा उल्लेख आहे. आणखी उदाहरणांकरतां भाइसंमं. त्रै २, पृ. ५६–५८ व १४१, १५१–१५६ व रा १५, ले. ४००–०२ हीं पत्रें पहा. शक १५४० पासून शक १५५७ पर्यंत निजामशाहींत मलिकंबर व शहाजी हे अनुक्रमें सर्वाधिकारी होते अर्थात् त्या वेळच्या निजामशाही फर्मानांत मलिकंबर किंवा शहाजी यांचीच कालनिर्देश करण्याची पद्धत बहुधा दिसून येते.

२६. दुसऱ्या पायरीचे अधिकारी म्हणजे सुभेदार वगैरे प्रांताधिकारी. पहिले पहिले अधिकारी फर्मानाप्रमाणेंच प्रथम अरबी शब्दांत शुहूर सन व शेवटीं अरबी शब्दांत हिजरी सन घालीत.

उ. रा. २०, ले. २२६ पहा. यांत आरंभीं शुहूर घालून शेवटीं हिजरी सन घातलेला आहे. मलिकंबर व शहाजी यांनीं ही पद्धत टाकून दिली. त्यांच्या पत्रांतून प्रथम अरबी शब्दांनीं शुहूर सन दिला असून शेवटीं फक्त तारीख व महिना येवढाच तपशील आहे. तसेंच शिचसा २, ले. २८७ किंवा रा. २०, ले. २५७ पहा. यांत प्रथम शुहूर देऊन शेवटीं फक्त तारीख व महिना नमूद आहेत.

२७. तिसऱ्या प्रकारचीं पत्रें म्हणजे हवालदार, ठाणेदार, वगैरे अधिकाऱ्यांनीं लिहिलेलीं पत्रें. यांत आरंभीं शुहूर सन देऊन शेवटीं फक्त तारीख व महिना येवढा तपशील असतो. उ. रा. २०, ले. २२ पहा. यांत आरंभीं शुहूर सन आणि शेवटीं तारीख व महिना दिलेलीं आहेत. रा. २०, ले. २२५ हा ठाणेदाराचा हुकूम असूनही आरंभीं शुहूर व शेवटीं हिजरी दिला आहे. पण अशीं उदाहरणें फारच थोडीं आढळतात.

२८. **विजापुरी पद्धत**—विजापुरी राजवटींत फर्मानांवर आरंभीं शुहूर सन घालून शेवटीं तारीख, महिना व हिजरी सन घालीत. यांत तारीख व सन हीं कधीं अंकांनीं दाखवीत, कधीं तदंकवाचक फार्सी शब्दांनीं व्यक्तवीत, तर कधीं फार्सी ऐवजीं अरबी शब्दांनीं सन व तारीख व्यक्त करीत. कधीं अंक व अंकवाचक शब्द दोन्ही लिहीत. उ. भाइसंमंत्रै व. २, पृ. ६० पहा. तेथें एक विजापुरी फर्मान आहे. त्यांत आरंभीं शुहूर सन देऊन शेवटीं 'नहुम ९ शहर रमजान सनह १०५९' असा उल्लेख आहे. यांत नहुम शब्द ९ अंक वाचक आहे हें उघड आहे. रा.२१, ले. १ मध्यें आरंभीं शुहूर व शेवटीं 'तारीख दुसम ...सन एक हजार सात' असा उल्लेख आहे. मासघइ भा.१, ले. ४२–४४ यांत आरंभीं शुहूर व शेवटीं हिजरी दिला आहे. श्री. आतार यांनीं मंडळाकडे पाठविलेल्या फर्मानांवर शेवटीं 'तारीख हफ्तुम... सनह १०७०' असा उल्लेख आहे. बशीर अहमद यांनीं प्रसिद्ध केलेल्या फरामीन-इ-सलातीन या पुस्तकांत दिलेल्या विजापुरी फर्मानांवर अशा तऱ्हेनें शुहूर व हिजरी यांचे उल्लेख आले आहेत. विजापुरी सुलतानांपैकीं दुसर अली आदिल यानें आपला जुलूस चालू

केला होता कीं काय अशी शंका येते. रा. २०, ले. ७६ मध्यें किंवा मंडळाच्या संग्रहीं कांहीं आदिलशाही फर्मानें आहेत त्यांवर तारीख व हिजरी वर्ष यांबद्दल अरबी शब्दच वापरलेले आहेत. पण एकावर केवळ अली आदिलचा जुलूस आहे.

२९. विजापुरी राजवटींतील दुय्यम प्रतीच्या अधिकाऱ्यांच्या पत्रांत सामान्यतः आरंभीं शुहूर सन घालून शेवटीं फक्त तारीख व महिना यांचा उल्लेख केलेला असतो. अशीं पत्रें आज शेकडों उपलब्ध आहेत. त्यांचीं उदाहरणें शिवकालीन कागदपत्रांच्या बहुतेक पुस्तकांत सांपडतील. क्वचित् दुय्यम अधिकाऱ्यांनींही शेवटीं हिजरी सन घातला आहे. या अधिकाऱ्यांचा सनाचा उल्लेख करण्याचा आणखी एक प्रकार आहे. कांहीं पत्रांतून आरंभीं व शेवटीं अरबी शब्दांत शुहूर सनच सांगितलेला असतो. उ. रा. २०, लें. ८६ यांत आरंभीं व शेवटीं सन सबा अर्बैन असाच उल्लेख आहे.

३०. परगण्याहून सुटलेल्या हुकुमांवर प्रायः आरंभीं शुहूर सन, तारीख व महिना हीं दिलेलीं असतात. हिजरी वापरलेला आढळत नाहीं उ. रा. २० मधील चित्रावप्रकरणीं पत्रें पहा.

३१. **मुघली पद्धत**—मुघली राजवटींतील शाहजहान व औरंगजेब यांच्या कारकिर्दींचीं पत्रें दक्षिणेंत आहेत. शाहजहान व औरंगजेब या दोघांचेही जुलूस होते. यामुळें त्यांच्या पत्रांतून कधीं कधीं हिजरी व जुलूस असे दोन्ही प्रकारचे काल दिलेले आढळतात. शुहूर सन मुघलांनीं कधींही वापरलेला नाहीं. उपर्युक्त दोघांच्याही पत्रांत आरंभीं कोणताही काल घालीत नाहींत. शेवटीं तारीख, महिना व हिजरी किंवा जुलूस किंवा हिजरी व जुलूस दोन्हीही वापरलेलें आढळतात. तसेंच तारीख व वर्ष यांचा निर्देश कधीं अंकांनीं तर कधीं अंकवाचक फार्सी शब्दांनीं केलेला आढळतो. उ. रा. ८ व प्रभात मासिक यांत दिल्लीपतीचा पत्रव्यवहार आला असून त्या पत्रांच्या मूळ फार्सी नकला मंडळाच्या संग्रहीं आहेत. रा. ८, ले. ३ च्या फार्सी अस्सलांत 'तारीख हफ्तुम शहर जिल्कादह सनह २३ जुलूस' असे शब्द आहेत. रा. ८, ले. ४ च्या फार्सी अस्सलांत शेवटीं तारखेचा उल्लेख 'तहरीर फीत्तारीख

पंजुम शहर जिल्हिज्जह सनह बीस्त व सह जुलूस मय्मनत मानूस मुताबिक सनह हझार व पिंजाह व नुह हिजरी' असा आहे. रा. ८, ले. ५ च्या फार्सी रूपांत शेवटीं 'तारीख १८ रज्जबुल्मुरज्जब सनह ३१' असा उल्लेख आहे. हीं सर्व पत्रें शाहजहानाच्या कारकिर्दीतील आहेत हें हिजरी सनावरून उघड होतें. रा. ८ ले. ६ चें पत्र औरंगजेबानें राज्याभिषेक झाला नसतांना पाठविलेलें आहे. याच्या शेवटीं 'गुर्रह शहर जमादीउल्आखिर' सनह १०६७' असा उल्लेख आहे. अर्थात १०६७ हें हिजरी साल आहे. रा. ८, ले. ७ च्या फार्सी नकलेंत शेवटीं 'बतारीख ४ जिल्कादह सनह अहद अझ जुलूस मुताबिक सनह १०६९ हिजरी' असा कालाचा निर्देश केला आहे. अहद हा अरबी शब्द एक या अंकाचा वाचक आहे. असे अनेक उल्लेख दाखवितां येतील.

३२. मुघली दुय्यम अधिकाऱ्यांनीं लिहिलेलीं फार्सी पत्रें फारशीं उपलब्ध नाहींत. शिवचरित्रप्रदीप पृ. १९४ वर जयसिंगाचा एक पर्वाना दिला आहे. त्यांत तारखेचा उल्लेख 'बतारीख चहारुम शहर जमादीउल्अव्वल सनह ७ जुलूस' असा आहे. रा. २०, ले. २३८ व २४४ हीं पत्रें एका मुघली अधिकाऱ्याचीं आहेत. त्यांत विजापुरी शिरस्त्याप्रमाणें आरंभीं शुहूर आणि शेवटीं महिना व तारीख हीं घातलीं आहेत. रा. २०, ले. १९९ च्या पोटांत एक सनद छापिली आहे. ही मुघली दुय्यम अधिकाऱ्यानें लिहिली आहे. शेवटीं केलेला तारखेचा उल्लेख 'तारीख गुर्रह माह जिल्हिज्जह ९ जुलूस वाला मुताबिक सनह १०७६ फस्ली' असा आहे. औरंगजेबाच्या ९ जुलूसच्या या तारखेस १०७६ हिजरी व फसली दोन्ही येत आहेत. एकंदरींत दुय्यम अधिकाऱ्यांनीं फसली ऐवजीं हिजरी सन वापरला असावा असें वाटतें. तिय्यम अधिकाऱ्यांनीं लिहिलेलीं पत्रें विजापुरी पद्धतीचेंच अनुकरण करतात.

३३. **शिवशाही पद्धत**– शिवशाही कागदांत शहाजीचेही हुकूम येतात. शहाजीच्या हुकुमांत आरंभीं शुहूर आणि शेवटीं महिना व तारीख असतात. शिवाजीच्या पत्रांत २।३ प्रकार आढळतात. कांहीं पत्रांत आरंभीं शुहूर आणि शेवटीं तारीख व महिना

यांचा उल्लेख असतो. उ. शिचसा ग्रं. २, ले. २३९ पहा. यांत आरंभीं शुहूर आणि शेवटीं तारीख व महिना दिलेलीं आहेत. शिवाजीनें राज शक सुरू केला हें खरें. पण राज शक सुरू झाल्याबरोबर हिंदू महिना, मिति किंवा राज शक यांचा सर्रास उपयोग होऊं लागला अशी जर कोणाची समजूत असेल तर ती अगदीं चुकीची आहे. राज्याभिषेका-नंतरचीं किती तरी पत्रें अशीं आहेत कीं, ज्यांत शुहूर सन आणि मुसलमानी तारीख व महिना वापरलेलीं आहेत. उ. रा. ८, ले. ३१ पहा. हें पत्र राज्याभिषेक झाल्यावर ५।६ महिन्यांनीं लिहिलेलें आहे. यांत मुसलमानी वर्ष, तारीख व महिना नेहमींच्या पद्धतीनें दिलेलीं आहेत. उत्तरोत्तर मुसलमानी कालगणना शिवाजीच्या पत्रांतून कमी कमी होत जाऊन त्या ठिकाणीं राज्याभिषेक शक आणि हिंदू मास व मिति यांचा अधिकाधिक वापर झाला हें मात्र खरें. उ. रा. ८ मधील ३३–३६ लेखांक पहा. यांत राज्या-भिषेक शक, हिंदू मास व मिति हीं आढळतात. शिवाजीच्या दुसऱ्या व तिसऱ्या प्रतीच्या अधिकाऱ्यांनीं शिवाजीनें प्रयोगांत आण-लेली कालगणनेची पद्धत उपयोगांत आणली असल्यानें तीविषयीं जास्त लिहिण्याची जरूरी नाहीं.

३४. एका पद्धतीचा उल्लेख मात्र येथें केला पाहिजे. शिव-शाहींतील कांहीं पत्रांवर शेवटीं तारीख, महिना व शुहूर सन हीं नमूद केलेलीं असतात. उ. रा. ८, ले. १२ पहा. यांत पत्राचे शेवटीं छ ४ माहे रमजान सन सलास सितेन' असा उल्लेख आहे. आणखी उदाहरणांकरितां इतिहाससंग्रहांतील 'गोमांतकाच्या इति-हासाचीं साधनें' हें प्रकरण पहा.

३५. **कालांविषयीं कांहीं विशेष**–इ. वृ. १८३४ पृष्ठ ५६ वर एक मिरासीपत्र छापलें आहे. त्याची मिति त्या पत्रांत श. १५९१ सौम्य संवत्सर ज्येष्ठ शुद्ध ७ शुक्रवार अशी दिली आहे. जंत्रीप्रमाणें ज्येष्ठ शुद्ध ७ गुरुवारीं ९ घटका ४ पळें असून शुक्रवारीं अष्टमी १३ घटका ७ पळें आहे. या ठिकाणीं सप्तमी प्रमाण मानावी तर वार चुकीचा लिहिला असें म्हणावें लागतें. वार प्रमाण धरला तर तिथि चुकीची घातली असें मानावें लागतें. सामान्यतः लोकांच्या ध्यानांत वार

जितका निश्चयानें रहातो तितकी तिथि लक्षांत रहाणें शक्य नाहीं. पंचांगाचा प्रसार आज जसा घरोघर झालेला दिसतो तसा पूर्वी नव्हता. निदान खेडेगांवीं तरी (आजच्या स्थितीवरून पाहतां) प्रत्येकाचे घरीं पंचांग असेल असें म्हणवत नाहीं. उलट वरील पत्रांत खरेदी–विक्री करणारे अनुक्रमें जोशी व कुलकर्णी आहेत. यामुळें त्यांनीं पंचांगांत तिथि पाहिली नसेल असेंही म्हणवत नाहीं. तरी पण तिथि चुकण्याची संभवनीयता अधिक एवढें मात्र खरें. येथें हेंही सांगून ठेवण्यास हरकत नाहीं कीं, अस्सल पत्रांत कित्येक वेळा अक्षय्य तृतीया, नागपंचमी, दसरा, अशा एखाद्या प्रसिद्ध तिथीचा उल्लेख असतो. अशा वेळीं मात्र तिथीच प्रमाण धरली पाहिजे. पण अशा तिथींना दिलेले वार चुकल्याचें आढळांत नाहीं. उलट दिव्य प्रकरणीं, शनि, रवि व मंगळ हे वार दिव्यांगभूत कार्यें करण्याचें ठरलेलें असल्यामुळें अशा वेळीं वार व तिथि यांचा मेळ नसल्यास वार बरोबर मानून तिथि चुकीची मानली पाहिजे.

३६. शिचसा २, ले. २६७ मध्यें आरंभीं शुहूर सन १०४२ दिला आहे व शेवटीं हिजरी १०५२ जमादिलावल १७ ही तारीख दिली आहे. शुहूर १०४२ मध्यें जमादिलावल महिना येतो; पण हिजरीचें साल १०५१ येतें. हिजरी १०५२ चा जमादिलावल घ्यावा तर शुहूर १०४२ संपून १०४३ चे २।३ महिने होऊन जातात. अशा प्रकारचीं आणखी उदाहरणें पाहिजे असल्यास अभ्यासकांनीं पुढील पत्रें पहावीं. भाइसंमंत्रै. व. ५, पृ. ६०; फरामीन-इ–सलातीन पृ. २२८; सनदापत्रें पृ. ५२, ले. २०; सावंतवाडी संस्थानचा इतिहास जुने लेख ८, ९, ११. तारखेचा असा निर्देश असणारे लेख बहुधा शुद्ध फार्सी व खाशांचे असेच असतात. बादशाहा-कडून हुकूम मिळविण्यास ५।६ महिने लागले तर त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. आजही कोर्टकचेऱ्यांचा जो अनुभव येतो त्यावरून पूर्वीच्या एकतंत्री कारभारांत ५।६ महिने लागणें म्हणजे कांहींच नाहीं. रा. २०, ले. १७ यांत वतन राखण्याकरितां जो वाद खेळावा लागला त्याला खर्च काय आला व कोणकोणत्या लोकांच्या गांठीभेटी घेऊन कोणकोणते विधि करावे लागले याची

हकीकत दिली आहे. तीवरून माझें वरील म्हणणें परिस्थितीला धरूनच आहे असें म्हणावें लागेल. अशीं पत्रें सामान्यतः आर्थिक व्यवहाराविषयीं असतात. शिवकालीं महाराष्ट्रांतील नवें आर्थिक वर्ष मृगसालापासून म्हणजेच शुहूर वर्षाच्या आरंभदिनावर बहुधा चालू होई. असें पत्र सुटल्याची तारीख पत्रांतीं दिली असेल तीच धरावयाची; पण पत्रांत दिलेल्या निर्णयाची कार्यवाही पत्रगर्भ-निर्दिष्ट शुहूर वर्षापासून करावयाची, असा अर्थ येथें घ्यावयाचा आहे. पत्रांत केलेल्या अज्ञ शुहूर सनह ··· या शब्द योजनेवरून हें उघड होतें.

३७. दुसरा असाच एक प्रश्न संशोधकांचा थोडा घोटाळा उडवून देणारा आहे. कांहीं पत्रांत असें आढळून येतें कीं, पत्रांत उल्लेखिलेला काळ एक असावा तर पत्रावरील शिक्यांतील काळ दुसराच असावा. अशा वेळीं निराळाच काळ दाखविणारा शिक्का खुद्द बादशाह, प्रधान किंवा अधिकारी यांचा असतो. अर्थात् शिक्यांतील काळ ज्याचा शिक्का तो मनुष्य त्या कामावर केव्हां आला हें दाखवितो. आणि म्हणूनच शिक्यांतील काळ हा प्रत्यक्ष पत्रलेखनाच्या अगोदरचा बहुधा असतो. शिवशाहींतील मराठी पत्रांत हा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. कारण कोणाच्याही देव-नागरी लिपींतील शिक्यांत कालाचा उल्लेख केलेला नसतो.

३८. कित्येक पत्रांतून सुरु सन म्हणून पुढें कांहीं तरी आंकडा घातलेला असतो. त्या ठिकाणीं पाठीमागील शब्द सुरु सन असले तरी आंकडा फसली सनाचा असतो. हा प्रकार मुघली पत्रांत फार आढळतो. कधीं कधीं वर्षाचा उल्लेख सन समान १०४७ असा केलेला असतो. या ठिकाणीं समान म्हणजे शुहूर १०३८ व पुढील १०४७ ही फसली वर्षसंख्या घ्यावी लागते. असे उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आलेले आहेत व त्या प्रत्येक ठिकाणीं असा अर्थ केल्या-वर संगति लागते. कांहीं ठिकाणीं वर्षाचा उल्लेख सन हजार १०५७ असा केलेला असतो. या ठिकाणीं हजार शब्द काय सुचवितो हें सांगतां येत नाहीं. पण पुढील आंकडा फसली वर्ष दाखवितो हें मात्र खास. पत्रांत कधीं कधीं हकीकत सांगतांना सन

सलास असा शुहूर सनांतील एका आकड्याचा उल्लेख असतो. तेथें सलास हें शुहूर सनाचें 'ज्याच्या शेंवटीं तीनचा आंकडा आहे' असें वर्ष असतें. तें कोणतें हें मागचा–पुढचा संदर्भ पाहून अदमासानें ठरवावें लागतें. शिवकालीन मराठी कागदपत्र चाळीत असतां एक ठिकाण असें आढळलें कीं, तेथें हल्लीच्या पद्धतीप्रमाणें वर्षसंख्या व संवत्सरनाम हीं जुळत नाहीत. तें ठिकाण असें :–रा. २०, ले. ५४, श. १५९४ विरोधकृत. महाराष्ट्रांत शकवर्षसंख्येच्या सांगातीं संवत्सरनाम देण्याची जी पद्धत चालू आहे तीप्रमाणें या ठिकाणीं संवत्सराचें नांव दिलेलें नसून तमिळ पद्धतीप्रमाणें दिलेलें आहे असें वाटतें. तमिळ व महाराष्ट्र या दोन्ही देशांत संवत्सरांचें नांव एकच असतें; पण वर्षसंख्या मात्र आपल्यापुढें एक वर्ष असतें; म्हणजे आपल्या श. १८५१ ला तमिळ पंचागांत श. १८५२ म्हटलेलें असतें. यास चालू शक वर्ष म्हणतात. असलीं उदाहरणें फारच क्वचित् आढळत असल्यानें त्यांविषयीं अधिक लिहावयाचें कारण नाहीं. अर्थात् वरील ठिकाणीं श. १५९४ हें वर्ष दिलें असलें तरी श. १५९३ हेंच वर्ष घेतलें पाहिजे.

३९. शिचसा २, ले. ३८९ हा विजापुरी कागद आहे. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें आरंभीं शुहूर आहे. पण शेवटीं नेहमींप्रमाणें हिजरी न घालतां फसली घातला आहे. पण अशीं उदाहरणें फारच थोडीं असतील. रा. २०, ले. १९९ याच्या शेवटीं ९ जुलूस दिला असून नेहमींप्रमाणें त्याशीं जुळतें हिजरी वर्ष न देतां फसली १०७६ असें यदिलेंआहे. असलीं उदाहरणेंही क्वचित् आढळतात.

४०. शिवकालीन फर्मानादि फार्सी कागदपत्रांवर उठविलेल्या शिक्क्यांविषयीं कांहीं माहिती मागें आली आहे. मराठी राजपत्रांवरील शिक्क्यांविषयीं येथें थोडेसें लिहितों.

४१. शहाजीचा शिक्का फार्सी, अष्टकोनी व पाऊण इंच रुंदीचा असून त्यांत 'बन्दह शाहजी भोसलह' असें लिहिलें असावें. पण स्पष्ट लागत नाहीं. जिजाबाईचा शिक्काही फार्सीच होता. आकार कुयरीचा असून अधिकांत अधिक लांबी व रुंदी $\frac{6}{8}$ व $\frac{1}{2}$ इंच आहे.

४२. शिवाजीची मुद्रा, अष्टकोनी, १ इंच लांबरुंद व त्याच्या

हयातभर एकच होती. ती म्हणजे ‘ प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ’ ही होय. ‘मयादियं विराजते ’ ही शिवाजीची मोहर असून तिची लांबीरुंदी अनुक्रमें $\frac{१}{२}$ व $\frac{५}{८}$ आहे आणि आकार षट्कोनी आहे.

४३. शिवाजीचे मुख्य प्रधान तीन झाले असून त्यांच्या ५ मुद्रा आहेत. पहिला मुख्य प्रधान शामराज रांझेकर याची मुद्रा वाटोळी, एक इंच व्यासाची व ‘श्रीशिवनरपति हर्षनिदान सामराज मतिमत् प्रधान ’अशी होती. ही श. १५८४ वैशाख शु. १३ पर्यंत आढळते. दुसरा मुख्य प्रधान महादजी याची मुद्राही वर्तुळाकार, दीड इंच व्यासाची व ‘ श्रीशिवनरपति हर्षनिदान महादेव मतिमत् प्रधान ’ अशा मजकुराची होती. ही श. १५९४ फाल्गुनपर्यंत चालू होती. शिवाजीचा तिसरा मुख्य प्रधान मोरोपंत याच्या तीन मुद्रा आढळतात. एक कुयरीच्या आकाराची असून ‘श्रीशिवचरणी तत्पर त्र्यंबकसुत मोरेश्वर ‘ अशी होती. ’ दुसरी लंबवर्तुळाकार १ व १॥ इंच व्यासाची असून तींत ‘ श्रीशिवराजेन्द्र हर्षनिदान त्र्यंबकसुत मोरेश्वर मुख्य प्रधान ’ अशी होती. तिसरी मुद्रा ही दुसरीच्याच मापाची पण ‘ एषा श्रीशिवराजेंद्रमुख्यामात्यस्य सत्यधृक् मुद्रा मोरेश्वरस्यास्तां भद्रा सद्रागदायिनी’ अशी होती. पहिली मुद्रा श. १५९७ च्या विजयादशमीपर्यंत खात्रीपूर्वक चालू होती. दुसरी मुद्रा वरील विजयादशमीनंतर चालू झाली असावी; कारण शिचसा २, ले. २७५ व २७६ हीं पत्रें, श. १५९७ आश्विन शुद्ध ४ व वद्य १० चीं असून पहिल्यांत पहिली व दुसऱ्यांत दुसरी मुद्रा आहे. यानंतर मोरोपंताच्या दोन मुद्रा कांहीं दिवस चालू असाव्या; कारण रामदास–रामदासीच्या ६३।६४ अंकांतील महजरांत मोरोपंताची पहिलीच मुद्रा आहे. श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें यांतल्या १५९८ शकांतील कागदांत मोरोपंताची दुसरी मुद्रा आहे. तर रा. खं. ८, ले. ३६५, श. १५९९ चा असूनही त्यांत पहिलीच मुद्रा आहे. तिसरी मुद्रा श. १६०२ च्या कार्तिक महिन्यांतील पत्रांत दिसते. पण आंतील शब्दांवरून ती शिवाजीच्या मरणापूर्वीची (श. १६०२ चैत्र शुद्ध १५) असावी असें वाटतें. मोरोपंताची मोहोर

वाटोळी असून 'विळसंति लेखनावधिर्मुद्रा' अशा मजकुराची आहे.
४४. शिवाजीच्या कार्यकारी मंडळापैकीं सेनापति प्रतापराव गुजर याची मुद्रा चौकोनी असून तींत 'श्री शिवसेनाधिपमुद्रा जयति सुभद्रा प्रतापरायस्य' असा मजकूर आहे (रामदास-रामदासी अं. ६३।६४ यामध्यें प्रतापरावाच्या मुद्रेवर नागोजी गुजर लिहिलें आहे; तर पत्रसारसंग्रह ले. १४४१ मध्यें व बखरींमधून प्रतापरावाचें नांव कडतोजी गुजर असें येतें; तेव्हां प्रतापरावास दोन्ही नांवें होतीं असें वाटतें. याची मोहोर अजून आढळली नाहीं). शिवाजीचा दुसरा सेनापति हंबीरराव (हंसाजी) मोहिते याच्या दोन मुद्रा आहेत. पहिली वाटोळी व 'श्रीमच्छिवमहानुभाव सेनाधीश हंबीरराव' अशा मजकुराची आहे व दुसरी 'श्रीशिवचरणीं दृढभाव सरलश्कर मोहिते हंबीरराव' अशी होती. दोन्ही मुद्रा शिवाजीच्या कारकिर्दीतील दिसतात. पण पहिली मुद्रा श. १६०६ त (रा. खं. १५, ले. १७) व दुसरी श. १६२० मधील (रा. खं. ८, ले. ५३) आहे. पहिलीची संभवनीयता आहे. पण दुसरी शंकनीय आहे. अनाजी दत्तोची मुद्रा षट्कोनी व 'श्रीशिवचरणी तत्पर दत्तसुत अनाजीपंत निरंतर' अशी असून मोहोर वाटोळी व 'लेखनावधिरेधतें' अशा मजकुराची आहे. शिवाजीचे धर्माधिकारी पंडितराय यांची मुद्रा लंबवर्तुळी व 'श्रीचिंतामणिचरणशरण' अशी आहे. मोहोर षट्कोनी व 'सुभं भवतु' अशी आहे. दत्ताजी त्रिमल वाकेनिवीस याची मुद्रा आढळत नसून फक्त अष्टकोनी 'मोर्तब सुद' पाहण्यांत येतो.

---

# २९. इतिहासाचें तात्त्विक स्वरूप

१. इतिहास या सामासिक शब्दांत इति + ह + आस असे तीन शब्द असून त्यांचा एकत्रित अर्थ असें खरोखर झालें असा आहे. यामुळें या शब्दांत फार व्यापक अर्थ आहे. विश्वाच्या उत्पत्तीपासून तें व्यक्तीच्या—निरागस बालकाच्या हालचालीपर्यंत व आजच्या कालापर्यंत ज्या लहानमोठ्या घडामोडी झाल्या आणि ज्यांचें मान-

वास ज्ञान झालें, त्यांचा इतिहास शब्दांत तत्त्वतः समावेश होतो.

२. पण सध्या एवढ्या व्यापक अर्थानें हा शब्द न वापरतां मानवाचा सर्वांगीण इतिहास एवढा किंवा त्याहूनही मर्यादित म्हणजे एकेका राष्ट्राचा सर्वांगीण इतिहास हा अर्थ सामान्यतः केला जातो. त्याही अगदी खालीं व्यक्तीचा इतिहास असून त्याचाही अभ्यास चालू आहे. हा इतिहास म्हणजे वस्तुतः विश्व, पृथ्वी, देश, समाज, व्यक्ती इत्यादींच्या गतकालाचें संपूर्ण चित्र. पण निसर्ग व मानव यांचीं जाळपोळीसारखीं रानटी कृत्यें किंवा गतकालच्या ज्ञानाविषयीं अनास्था यांतून झालेल्या नाशांमुळें हें चित्र संपूर्ण मिळत नाहीं. तुर्कांनीं अलेक्झांड्रियाच्या ग्रंथालयांतील सात लाख ग्रंथांची होळी केल्यामुळें ज्ञानविज्ञानाचें केवढें बरें नुकसान झालें? इतिहास त्यांत होरपरळाच !

३. इतिहास हें मनोरंजनाचें साधन आहे कीं शास्त्र? शास्त्र म्हणजे तरी काय? अज्ञाताचें चुकत चुकत होणारें निश्चित रूपदर्शन म्हणजे शास्त्र. शास्त्रें दोन प्रकारचीं आहेत. एक प्रयोग-निरीक्षणात्मक व दुसरीं केवळ निरीक्षणात्मक. रसायन, पदार्थविज्ञान, वैद्यक, गणित, इत्यादि प्रयोग-निरीक्षणात्मक, तर खगोलविद्या, प्रस्तरावशेष, पुरातत्त्व, हवामान, हीं केवळ निरीक्षणात्मक आहेत. प्रयोगात्मक शास्त्रांतही एकाच प्रयोगाच्या निरनिराळ्या अवस्थेंतील पुनरावृत्तींचें निरीक्षण करून प्रमेयें बांधलीं जातात. निरीक्षणात्मक शास्त्रांत प्रयोग करतां येत नाहींत. निरीक्षणांत दिसून येणाऱ्या पुनरावृत्तींतून प्रमेयें बांधतात. इतिहास दुसऱ्या प्रकारचें शास्त्र आहे. उदा. शिवाजी महाराजांची जन्मतिथि घ्या. येथें प्रयोग करतां येण्यासारखी परिस्थिती नाहीं. प्रथम बखरींतील पुराव्यांचें निरीक्षण व पृथक्करण केलें असतां दिसून आलें कीं, त्यांचा एकमेकांशीं मेळ नाहीं. तो गणितानेंही बसत नाहीं. तथापि तात्पुरती कां होईना, पण तिथि ठरविण्याची आवश्यकता भासली; म्हणून कै. लोकमान्यांनीं श. १५४९ वैशाख शुद्ध १ ही तिथि सुचविली; पण समाजांत वैशाख शुद्ध ३ ला उत्सव चालू झाला. आतां नवीन पुरावे उपलब्ध झाले. त्यांचें निरीक्षण, पृथक्करण, जुन्या पुराव्यांशीं तुलना इत्यादि

केल्यावर श. १५५१ फाल्गुन वद्य ३ ही तिथि ग्राह्य ठरली. पण समाज व सरकार गतानुगतिकत्वामुळें निराळीच तिथि मानतात. इतिहासकारांच्या पाठीशीं कांहीं न्यायखात्याप्रमाणें सत्ता नाहीं. यामुळें त्यांचे निर्णय आचरणांत आणावयाचे तर त्यासाठीं मत-परिवर्तनावर अवलंबून रहावें लागतें.

४. इतिहासलेखन व न्यायदान यांच्या तुलनेंत साधर्म्य पुष्कळ व वैधर्म्य थोडें आहे. न्यायदानांत सामान्यतः दोन पक्षकार, त्यांचे वकील, कागदोपत्रीं किंवा लिखित पुरावा, साक्षीदार, न्यायाधीश, निकाल, चढत्या श्रेणींचीं न्यायालयें व कायद्याच्या कसोटया असतात; तर इतिहासप्रांतांत दोन पक्षकार, त्यांचे वकील, लिखित पुरावा, न्यायधीश या सर्वांचीं कामें इतिहाकारास एकटयालाच करावीं लागतात. इतिहासांत जिवंत साक्षीदार नाहींत. न्यायाधीशा-प्रमाणें निकाल दिलाच पाहिजे, अशी सक्ती नाहीं. सारासार विचार, मानवी हक्क व मानव्याचे धर्म या त्याच्या कसोटया आहेत. या तिघांचीही देशकालपरिस्थितीमुळें निरनिराळी प्रतीति झाली आहे. युरोप, अमेरिका व भारत यांतील गुलामगिरी किंवा सेव्यसेवकभाव यांत देशकालपरिस्थितिजन्य फरक तर होताच; पण प्रत्येक पक्षाच्या अधिकारकल्पनेंत आजवर एकसारखा बदल होत आला आहे. सुमारें ६० वर्षांपूर्वी गिरणींतील कामगार काम करीत असतां जायबंदी झाला व गिरणी मालकानें त्या मजुरास कांहीं द्रव्य दिलें तर तें भूतदयायुक्त साह्य समजलें जाई. आतां असें द्रव्य मिळणें कामगाराचा हक्क झाला आहे. पूर्वींच्या एका पक्षाच्या दयायुक्त साह्याचें सध्या दुसऱ्या पक्षाच्या हक्कांत रूपांतर झालें आहे. ज्या गुलामगिरीचें पूर्वीं मोठें स्तोम होतें, ती गुलामी आतां मानव्याविरुद्ध गुन्हा समजली जात आहे. पूर्वीं एखादा व्यापारी भरमसाट नफा घेऊन श्रीमंत बनला तर त्याचें कृत्य कर्तबगारीचें लक्षण समजलें जाई. आतां या कृत्याला नफेबाजी हें नांव मिळतें व जनसामान्यांत त्याजविषयीं तिटकारा उत्पन्न होतो. असो. इति-हासांत चढत्या श्रेणीचीं न्यायालयें नाहींत; इतिहासकारास निकाल बदलण्याचा अधिकार आहे; नवा पुरावा दाखल करतां येतो; पण

त्याचे निर्णय आचरणांत आणण्याची सत्ता त्याजपाशीं नसते. त्याचे निर्णय धर्मशास्त्रनिर्णयाप्रमाणें असतात. समाजानें स्वेच्छेनें तें निर्णय आचरणांत आणावयाचे असतात.

५. मनुष्य हा चांगले वाईट सद्भाव व विकार असलेला प्राणी आहे. पूर्वीच्या तत्त्वज्ञांनीं कांहीं वाईट विकारांचें षड्रिपु म्हणून एकत्र परिगणन केलें आहे. पण सद्भावांचें असें एकत्रित परिगणन प्रचारांत आलेलें दिसत नाहीं. भगवद्गीतेंतील दैवीसंपत्तीच्या वर्णना-मध्यें तें अंशतः आलें आहे. त्याग, ऋजुता, क्षमा, धैर्य इत्यादि सद्भावांत मोडतात. मनुष्याच्या प्रत्येक कृतीमागें एक किंवा अधिक सद्भाव–विकार असतात. कृति होऊन गेली असतां ही धूर्तता, संयम, इत्यादींमुळें हे प्रकट होतातच असें नाहीं. म्हणून मनुष्यांच्या कृतींचा अभ्यास करणें कठीण आहे. जड व सचेतन विशेषतः मानव यांच्या अभ्यासांत येथेंच फरक पडतो. गणितशास्त्रांत कधीं कधीं एकेका उदाहरणाचीं बहुसंख्य उत्तरें येतात. उदा. चार ही संख्या कोणत्या संख्यांचा वर्ग आहे म्हणून विचारलें तर २ व –२ अशीं दोन उत्तरें येतात. २० या संख्येचे अविभाज्य अवयव मांडून दाखवा म्हणून सांगितलें तर त्याचीं तीन प्रकारें उत्तरे येतात. १, २, ३, ४, या चार आकड्यांच्या किती संख्या होतील असें विचारलें तर त्याचें उत्तर २४ हें येतें. तथापि गणिताचा अभ्यास चालतो. तसेंच इति-हासांत आहे. स्थल, काल व व्यक्ति यांच्या भिन्नतेमुळें इतिहासांत एकरूप घटना नाहींत. समरूप घडतात. शिवाजी महाराजांचें आग्र्याहून, नेताजींचें कलकत्त्याहून व लायकअलीचें हैद्राबादेहून पलायन यांत काल, स्थल, परिस्थिति व उद्देश यांचे इतके फरक आहेत कीं, इतिहासाची पुनरावृत्ती होते या म्हणण्यांत कांहींच अर्थ उरत नाहीं. बाह्य कृती समान दिसल्या तरी हेतूंच्या भिन्नतेमुळें विरूपता फार वाढते. चालू इतिहासांत अतिशय सूक्ष्म अभ्यास करतां येतो. मागें जावें तों तों सामग्रीचे तुटवड्यामुळें अभ्यसनीय व्यक्ती व घटना कमी कमी होऊं लागतात. नंतर व्यक्ती संपतात, जमात राहते. पुढें समाज उरतो आणि शेवटीं सामग्री इतकी कमी मिळते कीं, मानवाचा केवळ साकल्यानेंच अभ्यास करतां येतो.

६. न्यायदान, दुर्दैवी घटनांचीं चौकशीमंडळें, पाहणीमंडळें, कशासाठीं असतात? खून होऊन गेलेला असतो; धरण फुटलेलें असतें. तथापि त्यांच्या चौकशींतून चुका काय झाल्या, दुर्घटना कां व कशी घडली, यांचा छडा लागून पुढें आपल्या वर्तनांत कोणत्या सुधारणा केल्या पाहिजेत हें समजतें. राष्ट्राराष्ट्रांचे इतिहास अभ्यासून त्यांतील लोकस्वभावाचें ज्ञान करून घेतलें तर राष्ट्राराष्ट्रांतील संबंध कसे ठेवावे या विषयीं इशारे मिळतात. कारण व भौगोलिक, भौतिक, नैसर्गिक परिस्थिती, हवामान इत्यादींमुळें विशिष्ट राष्ट्रांतील लोकांच्या बाह्य कृती भिन्न व बदलणाऱ्या असल्या तरी लोकस्वभाव स्थायी असतो. सारांश व्यक्ती, जमात, वर्ग, समाज, राष्ट्र व विश्व या सर्वांचा यथावत् इतिहास समजावून घेणें मानवाच्या पुढील प्रगतीच्या दृष्टीनें आवश्यक ठरतें.

---

## ३०. मुंबई सरकारचे दप्तरखाने

१. हल्ली मुंबई सरकारच्या ताब्यांत दोन मोठे दप्तरखाने व सेक्रेटॅरिएट ग्रंथसंभार असे तीन संग्रह आहेत. त्यांची नीट व्यवस्था लावून ऐतिहासिक सामग्री लोकांस हस्तलिखित किंवा मुद्रित स्वरूपांत उपलब्ध करून द्यावी अशी सरकारची इच्छा आहे. प्रादेशिक ग्रंथालयांच्या योजनेची अमलबजावणी सुरू झाल्यामुळें सेक्रेटॅरिएटमधील मराठी, कानडी व गुजराती पुस्तकें तेथून हलवीत म्हणावयाचीं. यामुळें सेक्रेटॅरिएट ग्रंथालयाचें काम पुष्कळ हलकें झालें असलें पाहिजे. उलट मुंबई सरकारचे मनांत एक प्रांतिक हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमिशन व प्रांतिक मॉन्युमेंटस कमिशन अशीं दोन कमिशनें स्थापावयाचीं आहेत असें दिसतें. अर्थात् कांहीं काम कमी झालें तर कांहीं वाढलें असें होणार आहे. आज पुण्याच्या एलिएनेशन ऑफिसमध्यें कोटयवधि कागदपत्र आहेत. पण ते चाळून त्यांतील ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध करणें किंवा ते इतिहासाभ्यासूंना उपयोगी पडतील अशा तऱ्हेनें लावून ठेवणें,

अगर कोणी इतिहासभ्यासू संशोधनासाठीं तेथें गेल्यास थोड्या श्रमांत त्याच्या हातून पुष्कळ संशोधन होण्याजोगें मार्गदर्शन करणें यांपैकीं कोणतेंही काम तेथें होत नाहीं. हें काम करूं शकेल असा मनुष्य सरकारनें तेथें नेमलेला नाहीं. मी सध्या तेथें फार्सी कागद तपासावयास जात असतो. या तपासणींत मला असें आढळलें आहे कीं, पाणिनीनें एकाच सूत्रांत कुत्रा, तरूण व इंद्र यांना जसें गोवलें तद्वत् किती तरी फार्सी दफ्तरांत हिशेबी कागद, पत्रविरहित लिफाफे, अखबार, पत्रव्यवहार, कागदांचे कोरे, कपटे, अखबार, बारनिशी वह्या, सनदापत्रें, इत्यादि विविध प्रकारच्या कागदपत्रांची एकच खिचडी झाली आहे. या ऑफिसमधील कागदांना प्रायः क्रमांक नाहींत हें सर्वप्रसिद्ध आहे. पण फार्सींच्या तर दफ्तरांनाही क्रमांक नाहींत हें अपूर्व आहे. या एकदोन गोष्टींवरून संशोधकाच्या दृष्टीनें एलिएनेशन ऑफिसमधील कागदपत्रांची व्यवस्था किती दोषपूर्ण आहे हें ध्यानांत येतें.

२. मुंबईच्या सेक्रेटॅरिएट ऑफिसमध्यें मुख्यतः ईस्ट इंडिया कंपनी व मुंबई सरकार यांचे कागदपत्र आहेत. कांहीं वर्षांपर्यंत तेथील व्यवस्था एलिएनेशन ऑफिसप्रमाणेंच होती असें वाटतें. पण अलीकडे श्री. दिघे नांवाच्या गृहस्थांची नेमणूक झाल्यापासून तेथील कागदपत्रांपैकीं ऐतिहासिक कागदपत्रांच्या नकला निराळ्या काढून ठेवण्याचें काम चालू आहे. श्री. दिघे हे १९२९ पासून आज तागायत म्हणजे जवळ जवळ अठरा वर्षें पुण्याचें एलिएनेशन ऑफिस व सेक्रेटॅरिएट रेकॉर्डस् यांमध्यें काम करीत असून श्री. रा. ब. सरदेसाई संपादित पेशवेदप्तराचे पंचेचाळीस भाग आणि विविध व्यक्तिसंपादित रेसिडेन्सी दप्तराचे अकरा खंड या दोन्ही कामांत श्री. दिघे यांचा वाटा मोठा वाटा आहे हें सरकारलाही कबूल करावें लागेल. आज इतकीं वर्षें काम केल्यामुळें दोन्ही ठिकाणच्या दप्तरांविषयीं श्री. दिघे यांच्या इतकी माहिती असणारा दुसरा मनुष्य कोणीही नाहीं हेंही तितकेंच खरें आहे. पूर्वीं ते मराठी इतिहासाचे एम् ए. होते, आतां पीएच्. डी. आहेत. वर सांगितल्याप्रमाणें दुरवस्था असलेल्या दफ्तरखान्यांची नीट.

व्यवस्था लावण्याच्या हेतूनें तेथें एक चांगला मनुष्य नेमावा अशी सरकारची इच्छा असून तसा एक प्रयत्न ८–१० महिन्यांपूर्वी झाला. त्यांत मराठीचा अभ्यास असलेल्या एका परप्रांतीय विद्वानाची शिफारस झाल्याची बातमी होती. पुढें काय झालें कोणास ठाऊक, पण त्या विद्वानाची नेमणूक झाली नाहीं. आणि त्या जागेची जाहिरात पुन्हा एकदां वर्तमानपत्रांत आली. त्या जाहिरातींत कांहीं दोष राहिले म्हणा किंवा सरकारी विचार बदलले म्हणा ती जाहिरात रद्द करण्यांत आली असें समजतें.

३. यासंबंधांत अगदीं अलीकडे म्हणजे २० मार्च १९४७ च्या सुमारास तिसरी जाहिरात प्रसिद्ध झाली आहे. तीमध्यें या जागेच्या वेतनाचें मान रु. ५०० ते ११५० ठरविलें असून लायक मनुष्यास सुरवातीसच अधिक पगार मिळण्याची शक्यता आहे असेंही नमूद करण्यांत आलें आहे. हें पगाराचें मान बऱ्यापैकीं असल्यामुळें नवे जुने पुष्कळ उमेदवार या जागेसाठीं प्रयत्न करतील हें उघड आहे. या नवीन जागेचीं कामें दिग्दर्शित केलीं आहेत तीं अशीं : सेक्रेटॅरिएट रेकॉर्डस ऑफिसचा कारभार, सेक्रेटॅरिएट रेकार्डस ऑफिस व एलिएॅनेशन रेकॉर्डस ऑफिस यांमधील संशोधन व प्रकाशन यांची जबाबदारी, सर्व सरकारी दप्तरांची व्यवस्था पाहणें आणि प्रॉव्हिन्शियल हिस्टॉरिकल रेकॉर्डस व मॉन्युमेण्टस् कमिशनें अस्तित्वांत येतील तेव्हां त्यांच्या कार्यवाहाचें काम करणें. यांत सेक्रेटॅरिएट लायब्ररीच्या व्यवस्थेचा निर्देश नसल्यामुळें तें काम यांत समाविष्ट केलेलें नाहीं हें उघड आहे. तसेंच उपर्युक्त कमिशनें अजून अस्तित्वांत यावयाचीं आहेत हेंहि स्पष्ट आहे.

४. या कामांचा विचार केला तर असें दिसेल कीं, यांत विद्वत्ता व कारभार अशा दोन कामांचें मिश्रण आहे. दोन ठिकाणच्या दप्तरखान्यांतच संशोधन–प्रकाशनाचें काम इतकें आहे कीं, तें काम प्रामाणिकपणें व फलनिष्पत्ति होईल अशा तऱ्हेनें करावयाचें तर एका व्यक्तीस झेपावयाचें नाहीं. मग त्यासच कमिशनांच्या कार्यवाहीचें व प्रांतांतील दप्तरांच्या व्यवस्थेचें काम दिलें म्हणजे

त्यांना बहुतेक वेळ कारभारी कामाकडे खर्च होऊन संशोधन-प्रकाशन प्रायः आजच्या प्रमाणें शून्याच्या आसपास राहील. त्यांतच आणखी पुराणवस्तुविषयक कामाची भर पडली म्हणजे संशोधन, प्रकाशन, संशोधनमार्गदर्शन इत्यादि कामें पूर्ण थंडावलीं म्हणून समजावयास हरकत नाहीं.

५. या जागेसाठीं अर्ज करणाऱ्या उमेदवारांच्या ठिकाणीं पुढील गुण असावयास पाहिजेत असें जाहिरातींत नमूद आहे:— (१) तो इतिहासाचा एम्. ए. असावा, पीएच्. डी. किंवा डी. लिट्. अगर इतिहासांतील इंग्लिश पदवी असल्यास अधिक चांगलें. याशिवाय ज्यास (२) दप्तरखाना किंवा ग्रंथालय यांच्या व्यवस्थेचें शिक्षण किंवा (३) मराठी-इंग्रजी काल व तत्संबद्ध कागदपत्र यासंबंधीं मूलग्राही संशोधनकार्याचा अनुभव किंवा (४) ताम्रशिलाशासनविद्या व नाणकशास्त्र यांतील शिक्षण किंवा (५) सार्वजनिक दप्तरखाना किंवा ग्रंथालय यांच्या व्यवस्थेचें उत्तम ज्ञान असेल त्याला अगोदर पसंत केलें जाणार आहे. खेरीज उमेदवार विद्वत्परिसंस्थांमध्यें सरकारी प्रतिनिधित्व पत्करून त्यांतील इतर जाडद्या विद्वानांबरोबर दप्तरखान्यांच्या चर्चेंत नीट भाग घेण्यास समर्थ असला पाहिजे. त्यास जुन्या अवशेषांच्या संरक्षणाबाबत सरकारास योग्य सल्ला देतां आला पाहिजे.

६. यांतील पहिल्या अटीविषयीं येवढें म्हणावेसें वाटतें कीं, उमेदवाराची पदवी केवळ इतिहासाची असून उपयोगी नाहीं, तर ज्या दप्तरखान्यांत काम करावयाचें आहे त्याचा विचार करतां तो मराठी-इंग्रजी कालखंडांतील व विषयासंबंधानें पदवी असणारा पाहिजे. ती जागा मिळाल्यावर वरील विषयांचा अभ्यास सुरू करणारा उमेदवार तेथें नेमणें योग्य होणार नाहीं. शिवाय इंग्लिश पदवीला अधिक महत्त्व देण्यात आलें आहे तेंही उचित नाहीं. अगोदर पसंतीच्या अटींपैकीं दुसरी अट इतकी महत्त्वाची आहे कीं, ती पदवीच्या अटीइतकीच आवश्यक असावयास पाहिजे होती. उलट तिसरी अट विकल्पानें कां होईना कशासाठीं ठेविली हें समजत नाहीं. सारा जन्म कागद चिवडण्यांत घालवावयाचा आहे

त्यास त्या अटींतील शास्त्रें समजलीं काय किंवा न समजलीं काय? या अटीची मुळीच जरूरी नाहीं असें वाटतें. १ व ४ या दोन अटींतील दप्तरखान्याचें शिक्षण किंवा त्याच्या व्यवस्थेचें उत्तम ज्ञान येवढा भाग ठीक आहे. परंतु ग्रंथालयाचें कलम विकल्पानें कां होईना पण या अटींत घालण्याचें कारण काय हें मुळींच समजत नाहीं. जुन्या अवशेषांचें संरक्षण हा विषय येथें कां आणला आहे याचेंही आकलन होत नाहीं. माझी कल्पना अशी आहे कीं, पुढील वर्षी सध्याच्या समजुतीप्रमाणें सत्तांतर होऊन प्रांतांना जवळ जवळ पूर्ण स्वायत्तता मिळाली कीं, आर्किऑलॉजीचें खातें प्रांतिक बनणार. तसें झाल्यावर डायरेक्टर ऑफ आर्किऑलॉजी ही जागा निश्चित निर्माण करावी लागेल. पण मग त्या विषयाची येथें घिसाडघाई कां करण्यांत आली ? सारांश जाहिरातीमध्यें उमेदवारापासून अपेक्षावयाच्या आवश्यक गुणांनाही विकल्प व अनावश्यक गुणांनाही विकल्प अशी परिस्थिति झाली आहे.

७. तेव्हां मुंबई सरकारला माझ्या स्पष्ट सूचना पुढीलप्रमाणें आहेत. ( १ ) सध्या एक वर्षभर पुराणवस्तूबाबत सरकारनें लक्ष घालूं नये. सत्तांतर होऊन तें खातें ताब्यांत आलें म्हणजे लेखविद्या, नाणकशास्त्र, शिल्प व वास्तु या विद्या इत्यादींतील प्रवीण मनुष्यास डायरेक्टर ऑफ आर्किऑलॉजी म्हणून जागा उत्पन्न करून तीवर नेमावें; (२) पुण्याचें एलिएनेशन ऑफिस कागदपत्र व सेक्रेटरिएट पत्रसंभार यांमध्यें संशोधनादि कामें करण्यासाठीं प्रत्येकी एक विद्वान मनुष्य मुख्य नेमून त्याच्या मदतीस जरुरीप्रमाणें एक किंवा अधिक विद्वान माणसें द्यावीं. तीं अशा तोलामोलाचीं असावीं कीं, मुख्याच्या गैरहजेरींत किंवा सेवानिवृत्तीनंतर तीं मुख्य बनूं शकतील म्हणजे परंपरा निर्माण होईल; (३) प्रांतांतील इतर छोटे मोठे दप्तरखाने पाहणी करून व्यवस्थित ठेवणें, प्रांतिक कमिशनची कार्यवाही, वगैरे कामें या दोघांत वाटून द्यावीं; (४) हीं दोन मुख्य माणसें नेमतांना तीं आपल्या कामांत पूर्ण वाकबगार आहेत, त्यांस नेमलें असतां तीं

खरोखरच उपयुक्त कामें करून दाखवितील, नुसता पगार खात स्वस्थ बसणार नाहींत, पूर्वी त्यांनीं पुष्कळ काम केलें आहे, इत्यादींविषयीं खात्री करून घेऊनच मग नेमलीं पाहिजेत; नेमणूक झाल्यावर जुनें इंग्रजी–मोडी वाचन व मराठी–इंग्रजी इतिहासाच्या अभ्यासाची सुरुवात करणारा तेथें येतां कामा नये. तसें झाल्यास ती अत्यंत दुर्दैवी घटना होईल; (५) दोन्ही दफ्तरखान्यांत ताबडतोब व क्रमानें कोणतीं कामें झालीं पाहिजेत याचा विचार करण्यासाठीं व कार्यक्रम आखून देण्यासाठीं ज्यांनीं खरोखरच या दोन्ही दप्तरखान्यांत संशोधनाचीं कामें केलीं आहेत व तें करीत असतां कोणत्या अडचणी येतात, हें ज्यांस नीट समजलें आहे, अशांची एक समिति सरकारनें नेमावी व तिच्या शिफारसी विचारांत घेऊन पक्का कार्यक्रम ठरवावा आणि सरकारनें तो अमलांत आणण्याची खटपट करावी.

८. या दोन्ही दफ्तरखान्यांची सध्याची व्यवस्था कशी आहे व भावी व्यवस्था कशी असावी, तेथें कोणतीं कामें कोणत्या क्रमानें व्हावीं, कोणते कागद अभ्यासूस खुले असावेत, अभ्यासू कोणास म्हणावें, अभ्यासूनें किंवा अभ्यासूविषयीं योग्य ती दक्षता न घेतल्यास दफ्तरखान्याचें कसें व किती नुकसान होतें, इत्यादि अनेक प्रश्नांवर पुष्कळ लिहितां येण्यासारखें आहे. माझ्या वरील सूचनांप्रमाणें सरकारनें एक कमिटी किंवा समिति नेमून तींत वरच्या प्रश्नांचा विचार झाला तर ठीकच; नाहींतर उपर्युक्त प्रश्नांविषयीं मी स्वतःच पुन्हा लिहीन. तूर्त सरकारच्या सध्याच्या योजनेंत जे दोष असल्याचें जाहिरातीवरून माझ्या तात्काळ ध्यानांत आलें ते पुढें मांडून त्यांवर उपाय सुचविले आहेत. सरकार त्यांचा योग्य परामर्ष घेईल अशी आशा आहे.



## ३१. महाराष्ट्रेतिहासपरिषद विभागाध्यक्षी भाषण—पेशवे काल

१. उपस्थित बंधूंनो व भगिनींनो महाराष्ट्रेतिहास परिषदेनें मला पेशवाई विभागाचें अध्यक्षत्व देऊन माझा गौरव केला याबद्दल प्रथम मी तिचे हार्दिक आभार मानतों. आपणांस कंटाळवाणें वाटेल एवढें लांबलचक व नीरस भाषण ऐकत बसण्याचा प्रसंग आपणांवर आणण्याची माझी इच्छा नाहीं व मला एवढी सवडही नाहीं. आपलें आमंत्रण येण्यापूर्वींच माझा पुढील एक महिन्याचा पक्का व त्यापुढील एक महिन्याचा कच्चा कार्यक्रम ठरलेला होता. तथापि या विभागीय अध्यक्षत्वाच्या निमित्तानें माझे कांहीं विचार आपल्यापुढें मांडण्याची संधी मिळणार आहे हें लक्षांत घेऊन मी मनाशीं ठरविलें कीं, शिवशाही व पेशवाई यांची जमेल तशी व त्या बाबतींत तुलना करून ती आपणांपुढें मांडावी. पण विषय मोठा आणि अभ्यासास व वाचनास अवधि थोडा. यामुळें माझें आजचें विवेचन सर्व मुद्द्यांना स्पर्श करणारें व पक्कें होणें शक्य नाहीं. तें कांहीं मुद्द्यांनाच स्पर्श करणारें व कच्चें आहे असें समजावें. अधिक अभ्यासानें यांत फेरफार करावा लागेल. तथापि आपणांस अभ्यास व विचार यांसाठीं खाद्य पुरवावें असा प्रयत्न येथें केला आहे. त्यानें अभ्यासाची दिशा कळून कोणी अभ्यासास प्रवृत्त झाला व अभ्यासानें त्याचीं मतें माझ्याविरुद्ध बनलीं तरीही माझ्या भाषणाचें सार्थक झालें असें समजेन.

२. मराठींत दुरून डोंगर साजरे असा एक वाक्प्रचार आहे. ज्या डोंगरावर खूप दाट व हिरवीगार झाडी असते तो, दुरून डोळ्यांना एवढा छान व आल्हाददायक दिसतो कीं, आपण पक्ष्यासारखें उडून त्या झाडीवर जाऊन बसावें व दृश्याचा मनसोक्त आनंद लुटावा असें वाटतें. या दृश्यामुळेंच कोयना खोऱ्यास इंग्रजांनीं ब्ल्यू व्हॅली असें नांव दिलें होतें. पण त्या डोंगराच्या जसजसें आपण जवळ जावें तसतसें झा[illegible]याचखळगे,दगडगोटे,

सरपटणारे प्राणी, आग्या माशा, वन्य पशुपक्ष्यांच्या हालचाली व आरडाओरड इत्यादि पहावयास व ऐकावयास मिळून मनांत धाकधूक उत्पन्न होते. अशा जंगलांत तुमचें मन शंकाकुल व भयाकुलच राहील. न जाणों एखादा साप हळूच चावणार तर नाहीं ना ? एखादा अस्वल नाचत पुढें येणार नाहीं कशावरून ? किंवा एखादा वाघ, चित्ता, बिबळ्या यानें आपणांवर अकस्मात हल्ला केला तर ? आपणांस डुकराची धडक तर बसणार नाहीं ना ? अशा अनेक शंका एकसारख्या मनांत येऊन आपल्या आनंदांत विक्षेप येत असतात. किंवा एखादा सृष्टिसौंदर्याचा फोटो पाहून एखाद्या स्थानाविषयीं जी कल्पना आपण करतों ती तें स्थान प्रत्यक्ष पाहिलें असतां टिकत नाहीं. कारण फोटोमध्यें पुष्कळसा तपशील नाहींसा होऊन कांहीं बाबीच वैशिष्टयपूर्ण उठून दिसतात. फोटोलाही मागें टाकणारीं मेरुलिंग, कास यांसारखीं स्थानें विरळाच.

३. शिवशाही व पेशवाई यांची स्थिती अशीच आहे. शिवशाही हा दूरचा तर पेशवाई हा जवळचा डोंगर आहे. शिवशाहीविषयक सामग्री प्रसिद्ध झाली आहे तिच्या वीस–पंचवीस पट पेशवाईची सामग्री प्रकाशित झाली आहे. यामुळें शिवशाहीविषयीं न मिळणारा असा किती तरी तपशील पेशवाईसंबंधीं उपलब्ध आहे. शिवकालांत परकी सत्तांशीं झालेल्या झगड्यांमुळें तत्कालीन चित्रास जो उठाव आहे तो पेशवेकालाच्या चित्रांत नाहीं हें उघड आहे. पण इतर तपशील पेशवाईइतका उपलब्ध नसल्यानें त्या कालाविषयीं आपल्या कल्पना रम्य असतात. ज्या कालाविषयीं आपणांस चांगलीशी माहिती नसते, पण एखादी अतिशय उठून दिसणारी बाब ठाऊक असते त्या कालांत इतरही अनेक चांगल्या बाबी झाल्या असल्या पाहिजेत असा आपला समज होतो. पण तो वस्तुस्थितीला धरून असतोच असें नाहीं. आपण तेथें शितावरून भाताची परीक्षा करतों.

४. शिवछत्रपतींचा स्वराज्य–स्थापनेचा प्रयत्न चालू झाला तेव्हां कोकणच्या समुद्रकिनाऱ्यावर मुख्य सत्ताधारी पोर्तुगीज व सिद्दी आणि त्या खालोखाल मुघल, विजापूरकर, इंग्रज व डच.

पैकीं पहिल्या दोघांनीं शिवपूर्वकालांतच समुद्रावर आपली सत्ता स्थापिली होती; तर डच व इंग्रज नव्यानें जम बसवूं पहात होते. या दोघांनीं पश्चिम किनाऱ्यावर राजापूर, वेंगुर्लें, कारवार, भडोच, सुरत, बिलियापट्टण इत्यादि ठिकाणीं वखारी स्थापन केल्या. त्या ठिकाणीं किल्ल्यासारख्या इमारती बांधल्या व तिच्या परिसराचे ते जणूं राजेच बनले. या सर्वांच्या वखारी जोंवर सुरतेस होत्या तोंवर कोणासच विशेष महत्त्व आलें नाहीं. पण इंग्रजांना मुंबई बेट मिळाल्यापासून त्यांच्या सत्तेचा वेगानें विकास व्हावयास लागला व डच मागें पडले. त्यामुळें छत्रपतींना उरलेल्या मुघल, विजापूरकर, पोर्तुगीज, सिद्दी व इंग्रज या पाचांशीं झगडा करण्याचा प्रसंग आला. यासाठीं त्यांनीं स्वतःचें आरमार व आरमारी लढवय्ये तयार केले. त्यांनीं या सत्तांना उखडण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. या सत्तांना फक्त कांहींसा पायबंद बसला. आवश्यक तें द्रव्य मिळवून आपल्या सर्व बळानें या सत्तांशीं ते झुंजत राहते तर कदाचित् या सत्ता नाहींशा झाल्या असत्या. पण देशावर व कर्नाटकांत त्यांनीं हां हां म्हणता जो प्रदेश जिंकला व द्रव्यसाधन केलें, त्या दोन्ही गोष्टी झाल्या नसत्या. तेव्हां त्यांनीं या सत्तांच्या पायबंदावर समाधान मानलें व इतरत्र सत्ताविस्तार केला. पेशव्यांनीं पोर्तुगीज व सिद्दी यांशीं झगडे केले. सिद्दी सातासारख्यास लढाईंत ठार केलें. रायगड, गोवळकोट, अंजनवेल, बाणकोट वगैरे त्याचीं अनेक ठाणीं घेऊन स्वातंत्र्ययुद्धकालांत आंग्र्यांचा विरोध असतांही त्याची सत्ता वाढली होती ती दुबळी व निरुपद्रवी करून टाकली. पोर्तुगीजांनीं नवी काबिजात पेशव्यांशीं लढून मिळविली नसून सावंतवाडीच्या सावंतांकडून मुख्यतः मिळविली होती. इ. १७४० पर्यंत पेशवे पोर्तुगीजांशीं लढतच होते कान्होजी आंग्र्यानंतर आंग्रे घराण्यांत स्वराज्याविषयीं निष्ठा किती राहिली होती हा प्रश्नच आहे. बाजीरावाच्या कारकिर्दींतच तुळाजीस शाहूच्या हुकुमानें कैदेंत टाकलें होतें. ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र व पत्रव्यवहार यांत श. १६६२ ( इ. १७४० ) च्या सुमाराचें एक महत्त्वाचें पत्र असून त्यांत

ही गोष्ट स्पष्ट केली आहे. त्या पत्रांत चिमाजी आप्पा ब्रह्मेंद्रस्वामीस लिहितो ‘ तुळाजी आंगरे याजविसीं लिहिलें तरी त्याची बेडी काढावयाचें आमचे हातीं आहे. बेडी आम्ही काढवूं. सोडावयाची आज्ञा राजश्री स्वामीची पाहिजे. राजश्री स्वामीस विनंती करूं. त्यांनीं सोडावयाची आज्ञा दिली तरी सोडून देऊं ’ हें कशासाठीं ? इंग्रज येथें शिरजोर झाले ते केवळ आंग्र्यांना बुडविण्यास त्यांची मदत घेतल्यानें झाले नाहींत. आमचा हात फारसा पोचला नव्हता अशा दक्षिणेंतील प्रदेशांत व तेव्हां त्यांनीं फ्रेंचांना मागें सारून व अर्काटच्या नबाबाचा निकाल लावून आपला जम बसविला. बंगालमध्येंही अलीवर्दीखानानंतर असाच जम बसवून ते बलिष्ठ झाले होते. प्रयागपर्यंत त्यांनीं आपला अमल बसवीत आणला होता. मुघल सत्ता खिळखिळी झाल्यामुळें मराठ्यांना, विशेषत: बादशाहाशीं साऱ्या हिंदुस्थानच्या रक्षणाचा ठराव केल्यामुळें व्यापण्यासाठीं येवढें मोठें क्षेत्र उपलब्ध झालें कीं, तें व्यापतां व्यापतां पुरेवाट झाली. जलद दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं आणि मुघली राज्यरक्षणाचे व राज्यवर्धनाचे उपाय त्यांना करण्याची इच्छा नसल्यानें, तसेंच इंग्रजी उपाय समजून न घेतल्यानें, दक्षिणेंत त्यांना निजामाशिवाय हैदर-टिपू हा नवा शत्रू उत्पन्न झाला. उत्तरेंत नजीबखान, त्याचा मुलगा झाबिताखान व नातू गुलाम कादर यांनीं कायमचें मराठ्यांशीं शत्रुत्व चालू ठेविलें. ते संपले नाहींत तोंच नजफखान, मिर्झा इस्माईल बेग व त्यांचे साथी पुढें आले. शीखही पुढें सरसावले. उलट मराठ्यांकडील अहिल्याबाई, तुकोजी होळकर, महादजी शिंदे, हरिपंत फडके, इत्यादि मुत्सद्दी व लढवय्ये मेले; सवाई माधवराव गेला; नानाची सद्दी संपली. यामुळें मराठी राज्य दुबळें झालें. जलद दळणवळणाच्या साधनाभावीं फार विस्तृत एकछत्री राज्य फार वर्षें टिकूं शकत नाहीं याचा अनुभव पेशवाईंतही आला.

५. शिवाजी महाराजांच्या उद्योगाचें स्वरूप कशा प्रकारचें होतें याची यथातथ्य कल्पना त्यांनीं स्वत:स राज्याभिषेक करून घेतल्यानंतर महाराष्ट्रांतील ब्राह्मण, मराठे, धनगर, इ. जमातींतील

मुत्सद्दी व सरदार यांस आली नसेल असें नाहीं. दक्षणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे, किंवा तुम्ही मराठे लोक आपले आहा, तुमचें गोमटें व्हावें या शिवछत्रपतींच्या उद्‌गारांत (शिपसासं२। १९०१), 'मराठा तितुका मेळवावा' या रामदासांच्या वचनांत, राजारामकालीन पत्रांत आलेल्या 'हें महाराष्ट्र राज्य आहे' अशा प्रकारच्या कित्येक निर्देशांत, बाळाजी बाजीरावानें निजामाविषयीं व्यक्त केलेल्या 'महाराष्ट्राचे तो ते परम द्वंदी' या अभिप्रायांत (हिंगणे दप्तर १।४७), पहिला बाजीराव, बाळाजी बाजीराव आणि सदाशिवराव यांनीं अनेकदा उच्चारलेल्या 'नाहीं तर सारी दक्षिण मोकळी होती, सारी दक्षिण मोकळी व्हावी ऐसा समय आला होता' अशा प्रकारच्या वाक्यांत (ब्रह्मेंद्र स्वामी चरित्र व पत्रव्यवहार, ले. ३३–३६; ऐलेपयाव ९२,९९; पुद १।१३९, २६०; ऐसंसा ७।६; रा १।१६६.) शिवशाहींत व पेशवाईंत पुढाऱ्यांना काय अभिप्रेत होतें हें स्पष्ट झालें आहे. त्यांच्या डोक्यांत आपण महाराष्ट्रांतील सारे लोक एक, त्यांचें ठीक चाललें पाहिजे, त्यासाठीं सारी दक्षिण आपल्या ताब्यांत पाहिजे हें ध्येय होतें. पण हें ध्येय साऱ्या लोकांपर्यंत पोचून त्यांत रुजलें नाहीं. यामुळें धर्माचारांत आचारसंहिता तयार होऊन तीप्रमाणें न वागणारास बहिष्कारादि शिक्षा या लोकीं व नरकादि शिक्षा परलोकीं होत व होणार अशी समजूत होती, त्याप्रमाणें स्वराज्याची आचारसंहिता तयार झाली नाहीं. मग निषिद्धाचारास शिक्षा कोण व कोणती देणार? सर्व सदसद्विवेक बुद्धीवर अवलंबून होतें. पण स्वार्थादि विकारांनीं अनेकदां तिचा मुडदा पाडला होता. यामुळें सावंतवाडीचे सावंत, मुधोळ, कोरेगांव-कुमठें येथील घोरपडे, बुध, मलवडी, कागल, इ. ठिकाणचे घाटगे, म्हसवडचे माने, शृंगारपूरचे सुर्वे, कित्येक मोरे, कित्येक भोसले भाऊबंद, एवढेंच नव्हे तर शिवाजीचा सख्खा मेहुणा बजाजी व पक्का जावई महादजी निंबाळकर हे पितापुत्र, इत्यादि अनेक मराठा सरदार शिवछत्रपतींच्या पक्षास मिळाले नाहींत. प्रथम विजापूरची आदिलशाही व नंतर मुघलाई यांना त्यांनीं आपली

निष्ठा वाहिली. संभाजीच्या काळांत कितीतरी लहानमोठे, जवळचे-दूरचे, ब्राह्मण-मराठे सरदार संभाजीस सोडून गेलेले दिसतात. जयपूर अखबारांत त्यांचे भरपूर उल्लेख आहेत. राजारामाच्या काळांत हे सरदार परिस्थित्यनुरूप कधीं राजारामाकडे येत, तर कधीं मुघलांकडे जात. छत्रपती शिवाजीच्या वेळीं संभाजी, संभाजीच्या वेळीं राजाराम, मुघलांकडे गेले किंवा जाण्याच्या मार्गांत होते. शाहू सुटण्याचा संभव दिसतांच ताराबाईनें मुघली अंकितत्व मान्य करण्याचा अर्ज केला व तें अंकितत्व पत्करून शाहू सुटल्यावर राजारामाचा मुलगा संभाजी हाच मुळीं निजामाकडे जाऊन शाहूशीं भांडत राहिला. मग चंद्रसेन व त्याचा मुलगा रामचंद्र जाधव, त्रिंबकराव दाभाडे, निंबाळकर महादजीचा दासीपुत्र रंभाराव व त्याचे मुलगे जानराव व सुलतानजी, खंडागळे, विठ्ठल सुंदर, गमाजी यमाजी, गोपाळराव पटवर्धन इ. कायमचे किंवा तात्पुरते निजामाचे बाजूस जाऊन लढले यांत नवल कसलें? आपल्या मनासारखें नाहीं जुळलें कीं चालले दुसऱ्या बाजूला. आपल्या आकांक्षेला सद्‌सद्विवेक बुद्धीनें मर्यादा घातली पाहिजे; कुचंबणा झाली तरी चालेल पण आपपर पक्ष कोणता हें जाणून घेऊन त्याचप्रमाणें चालावें असा पोक्त विचार तत्काल मनांत येत नसे. तात्कालिक विचार क्रमानें रुसणें, यागी-विरागी होणें, शत्रुपक्षास जाऊन मिळणें असा असे. मराठी राज्याच्या वारसांकडे त्यांची फार कुचंबणा झाली असती असें तरी कुठें आहे? पण कळ सोसण्याची तयारी दाखवीत नसत. तथापि दोन्ही काळांत दिसतें तें असें कीं, बहुसंख्य ब्राह्मण, मराठे, कर्तबगार लोक मराठी राज्यांतच राहिले.

६. जुने सरदार आपल्या प्रयत्नांत अंशभागी होणें कठीण असें पाहिल्यावर शिवछत्रपतींनीं बाजी प्रभू, तानाजी मालुसरे, कान्होजी जेधे व त्याचे मुलगे, प्रतापराव गुजर, हंबीरराव मोहिते इ. व शिवभारतांत निर्देशिलेले अनेक नवे सरदार व मुत्सद्दी उत्पन्न केले. संभाजी व राजाराम यांच्या कालांत संताजी घोरपडे, धनाजी जाधव, हणमंतराव निंबाळकर, दाभाडे, नेमाजी शिंदे,

केसोपंत पिंगळे, कान्होजी भोसले पुढें सरसावले. पेशवाईंत हे लोक मागें पडले. हे आपणांस उपयोगी पडतील कीं नाहीं याची शंका आल्यामुळें शाहू व पेशवे यांनी पिलाजी व दमाजी गायकवाड, राणोजी व इतर शिंदे, मल्हारराव होळकर, आनंदराव, यशवंतराव व इतर पवार, रघूजी, फत्तेसिंग व इतर भोसले, पिलाजी जाधव, पटवर्धन, हरिपंत फडके इ. पहिल्या प्रतीचे व विसाजी कृष्ण, विठ्ठल शिवदेव, नारो शंकर, गोविंदपंत बुंदेले, रामचंद्र गणेश कानडे इत्यादि दुय्यम प्रतीचे सरदार उत्पन्न केले. पिलाजी जाधवासारखे हुजरातींत असलेले सरदार कर्तबगारीनें कोणत्याही प्रकारें कमी नसतांही शिंदेहोळकरांसारखे मोठे होऊं शकले नाहींत. कोंकणांतही आंग्रे इतके उपयोगी पडत नाहींत असें पाहून धुळप, विचारे, इत्यादि नवे आरमारी सरदार उत्पन्न केले. या सर्वांच्या वर्तनांत मला असें दिसतें कीं, आपल्या मनासारखें नाहीं झालें कीं रुसले हे. राज्य म्हटलें कीं, कोणी प्रमुख, कोणी सहाय्यक, अशा श्रेणी असणारच. आपले मुद्दे स्पष्ट मांडावे; पण तसें झालें नाहीं तर अत्याग्रह धरून प्रसंगीं विरुद्ध मिळण्याचा अविचार करीत याचें वाईट वाटतें. तथापि शिवकालांत बहुसंख्य सरदार छत्रपति शिवाजीकडे आले तद्वत् पेशवाईंतही झालें.

७. स्वराज्याच्या स्थापनेपूर्वीं सामान्य कर्तबगारीच्या मनुष्यास आपली उन्नति करून घेऊन समृद्ध बनणें फार कठीण झालें होतें. त्यामुळें लहानसान उत्पन्नाच्या बाबींसाठींही लोकांमध्यें आपापसांत अहर्निश झगडे चाललेले दिसतात. राजवाडे खंड १५, १६, १७, १८, शिवचरित्रसाहित्य खंड १–१३ यांतील शिवकालीन करीणे किंवा कुळकटें या बाबतींत अभ्यासास योग्य आहेत. त्यांत क्षुद्र स्वार्थासाठीं खून, मारामाऱ्या इ. कसें होई व प्रसंगीं बाप, भाऊ, मुलगा, बायको इ. नातीं कशीं विसरलीं जात हें लक्षांत येतें. स्वराज्यस्थापनेनंतर आणि विशेषतः औरंगजेबाचें संकट संपल्यावर क्षुद्र उत्पन्नाचे झगडे फार झालेले दिसत नाहींत. कारण उणी–अधिक कर्तबगारी दाखवून नवें उत्पन्न मिळविण्याला भरपूर वाव मिळूं लागला होता. परिणामतः शिवकालाच्या मानानें पेशवाईंत लहान-

मोठे इनामदार, सरंजामदार, इ. फारच उत्पन्न झालेले दिसतात. शिवछत्रपति वतनें देण्याच्या विरुद्ध होते. त्यांनीं आपल्या कारकिर्दीच्या अखेरी–अखेरीस सर्व वतनें अमानत केलीं होतीं. तथापि वतनदारांचा वृत्तिच्छेद न व्हावा आणि ते आपल्या दाबांत तर रहावे यासाठीं त्यांस रोख रकमा देण्यास प्रारंभ केला. तरीही सेवानिरपेक्ष आनुवंशिक इनामें दिलीं गेलींच. संभाजीही त्यांतून सुटला नाहीं. राजारामाच्या वेळीं तर आनुवंशिक इनामें, वतनें, करून देणें भागच पडलें. तीच प्रथा पेशवाईंत चालू राहिली. येवढेंच नव्हे तर वाढली. बाळाजी बाजीरावानें एका पत्रांत तर आतां नवा प्रदेश व्यापिला नाहीं तर लोकांना वतनें, इनामें, सरंजाम इ. कोठून द्यावयाचें अशी चिंता व्यक्त केली आहे.

८. शिवपूर्वकाल, शिवकाल व शिवोत्तर काल यांमध्यें आमच्या सामाजिक, कौटुंबिक, देवधार्मिक इ. परिस्थितींत प्रगति–परागति झाल्यामुळें स्वराज्य आलें गेलें असें दिसत नाहीं. शिवकालांत स्वराज्य मिळण्याचीं मुख्य कारणें दोन. एक शिवछत्रपतींनीं आचरलेली युद्धपद्धती व दुसरें कारण त्यांचा कारभार. आरंभी तरी शिवछत्रपतींस तत्कालीन प्रगततम हत्यारें वापरून शत्रूवर मात करणें शक्य नव्हतें. तेव्हां त्यांनीं अज्ञात व अत्यंत त्वरित हालचालींनीं शत्रूस जेर केलें आणि लहानशा प्रदेशाचा कां होईना पण कार्यक्षम व सैनिकी हालचालींस उपयुक्त कारभार करून यौद्धिक बळ पराकाष्ठेचें वाढविलें. शिवछत्रपतींच्या सत्तेखालीं असणारा प्रदेश सामान्यतः डोंगराळ असल्यानें ईषत् उपजाऊ होता. केवळ त्यांतून मिळणाऱ्या कराच्या उत्पन्नांतून स्वराज्याची सिद्धि साधण्याचा खर्च भागणें शक्यच नव्हतें. व्यापारापासूनही फारसा पैसा मिळत नव्हता. तेव्हां त्या उच्च ध्येयसिद्धीसाठीं लागणारा पैसा मुख्यतः शत्रुप्रदेशाची लूट करून त्यांनीं मिळविला. शत्रूंनींही त्याच पद्धतीनें पैसा मिळविला होता. यांत विजापूरकर, मुघल, पोर्तुगीज, सिद्दी, इंग्रज, सर्व तोकडे पडले. पोर्तुगीज व इंग्रज यांजपाशीं हत्यारें छत्रपति शिवाजीपेक्षा सुधारलेलीं होतीं. तथापि त्यांचें मनुष्यबळ फारच कमी होतें आणि स्वतःचें आरमार उभारून त्यांच्या सागरी

सत्तेलाही छत्रपतींनीं आव्हान दिलें. पण सर्वत्र त्वरित व अचानक हल्ला हा त्यांच्या युद्धपद्धतीचा आत्मा होता. त्यांनीं हातघाईच्या लढाया मारल्या नाहींत असें नाहीं; पण त्या त्यांच्या उत्तर आयुष्यांत आहेत. तथापि अशा प्रकारच्या मुख्यतः लष्करी बळावर त्यांनीं स्वराज्य स्थापिलें यांत संशयच नाहीं. औरंगजेब शक्य तें सर्व मनुष्यबळ व द्रव्यबळ घेऊन दक्षिणेंत २६ वर्षें तळ देऊन राहिला असतां व दक्षिण जिंकण्याच्या मोहिमेचें नेतृत्व स्वतः करीत असतां, तसेंच पहिल्या इंग्रज-मराठे युद्धांत इंग्रजांना, याच पद्धतीच्या बळावर मराठ्यांनीं नामोहरम केलें. औरंगजेब तर हेतु साध्य न होतां मेलाच; पण इंग्रजांनाही मराठ्यांशीं तह करावा लागला. पुढें मात्र इंग्रजांनीं राजकारणें करून आणि शिस्तबद्ध सैन्यास प्रगत हत्यारें पुरवून मराठ्यांवर मात केली.

९. 'सर्व्हायव्हल ऑफ दि फिटेस्ट' हा न्याय दोन्ही ठिकाणीं लागू झाला. शिवछत्रपति, मुघल व आदिलशाही यापेक्षां वरचढ झाले, म्हणून दोन्ही शाह्यांचे लचके तोडून स्वतंत्र राज्य स्थापन करूं शकले. या दोन्ही शाह्यांत जे गुण नव्हते ते त्यांनीं आपल्या ठिकाणीं बाणवले व दोष होते त्यांचा त्याग केला. यामुळें ते प्रतिकूल परिस्थितींतही यशस्वी झाले. यास एक गणितांतलें उत्तम उदाहरण देतों. प्रारंभीं क व ख हे समबल आहेत असें गृहीत धरूनही पुढें कसा फरक होतो तें पहा. प्रारंभीं क = ख; पण पुढें (१) क–१ < ख; (२) क < ख + १; (३) क–१ < ख + १; (४) क + १ < ख + २. आरंभीं क = ख असतांही पुढील चार प्रकारांनीं–चार रीतींनीं ख वरचढ होऊं शकतो. एका वेळीं क व ख समबल असतां कचें बळ कमी झाल्यानें ख आपोआप वरचढ होतो.; तर दुसऱ्या वेळीं ख चें बळ वाढल्यानें क कमजोर ठरतो. तिसरा प्रकार असाही असूं शकतो कीं, क चें बळ कमी होत असतें तर ख चें वाढत असतें. यामुळेंही ख बलवत्तर होतो. चौथा प्रकार म्हणजे क चें बळ ज्या प्रमाणांत वाढतें त्यापेक्षां अधिक प्रमाणांत ख चें बळ वाढल्यानें ख वरचढ ठरतो. या चार प्रकारांपैकीं शिवाजीस स्वराज्य मिळतांना काय झालें? क

चा ऱ्हास झाला होता असें म्हणणें कठीण आहे. शिवछत्रपतींचे गुण वाढलें होते म्हणून ते विजयी झाले. म्हणजे २ ऱ्या प्रकारानें ते वरचढ बनले आणि ३ ऱ्या प्रकारानें इंग्रज बलिष्ठ झाले.

१०. पेशवाईच्या अखेरीस इंग्रजांनीं आम्हांस जिंकलें ते कसें? मला वाटतें दोन बाबींत आम्ही इंग्रजांच्या मानानें कमी पडलों व आम्ही हरलों. पैकीं एक म्हणजे राजनीतींत आम्ही तोकडे पडलों; आणि दुसरी बाब युद्धनीतींत आम्ही मागें राहिलों. राजनीतींत त्यांनीं फोडा आणि झोडा हें तत्त्व अमलांत आणलें. अठराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं व एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं त्यांनीं शिंदे, होळकर, गायकवाड, पटवर्धन इत्यादि मराठे सरदार पेशव्यांपासून व एकामेकांपासून फोडण्यास प्रारंभ केला. त्यासाठीं त्यांनीं नानाप्रकारच्या युक्त्या योजल्या. पैकीं एक ज्या योगें एकमेकांविरुद्ध मनें कलुषित होतील अशीं बनावट पत्रें तयार करून तीं एकमेकांच्या हातांत पडतील अशी व्यवस्था करणें. इंग्रजांच्या कुटिल राजनीतीविषयीं ज्यांना पक्की कल्पना नव्हती त्यांना हीं पत्रें खरीं वाटत. यामुळें कित्येक सरदारांचीं व पेशव्यांचीं मनें आपआपसांत कलुषित झालीं आणि ऐक्याला तडे गेले. त्यांच्या राजनीतीचा दुसरा प्रकार म्हणजे तैनाती फौजेची पद्धति. हीमुळें येथील सत्तांचा क्रमानें संकोच होत जाऊन अखेर त्या नष्ट झाल्या. शिवाय शिस्तबद्ध सैन्य आणि सुधारलेलीं हत्यारें व रोख पैशाची लालूच यांचेही फार मोठे परिणाम होऊन आम्ही हरलों.

११. मराठी राज्य जातेवेळीं मराठे कांहीं गुणांनी कमी झालें तर इंग्रजांचे गुण फार वाढल्यानें ते यशस्वी झाले. त्यांनीं आम्हांलाच जिंकलें असें नाहीं. त्यांनीं डच व पोर्तुगीज यांना तर केव्हांच मागें टाकलें होतें. फ्रेंच त्यांजबरोबर येथें व युरोपांत पुष्कळ वर्षें भांडत राहिले. इंग्रजांना युरोपांत फ्रेंचांचा पराभव करतांना वाटलें उजाडलें. पण हिंदुस्थानांत त्यांनीं फ्रेंचांना इ. १७६० च्या सुमारासच पराजित करून त्यांचें येथील वर्चस्व नाहींसें केलें. इंग्रजांनीं या वेळीं केवळ हिंदुस्थान जिंकला असें नव्हे तर सिलोन, ब्रह्मदेश, मलेशिया, इत्यादि प्रदेशही जिंकले; नेपाळ, भूतान, तिबेट, यांनाही

आपल्या वर्चस्वाखालीं आणलें; बलुचिस्तानाचा कांहीं भाग व्यापला; अफगाणिस्तान दाबण्याचा प्रयत्न केला; पण नाहीं जमलें त्यांना तें. तथापि एडन घेतलें व इराणी आखाताजवळचा कांहीं भाग घशांत घातलाच. हें सर्व करीत असतां पहिल्या जागतिक युद्धाने आपला प्रभाव पाडला, तर दुसऱ्या महायुद्धानें सारें ब्रिटिश साम्राज्य नष्टप्राय करून टाकलें. सांगण्याचें तात्पर्य असें कीं, आमच्यामध्यें फार ऱ्हास झाला नसतांही आपल्या आक्रमक गुणोत्कर्षानें इंग्रजांचें पारडें फार जड होऊन आम्ही हलके पडलों. उलट दोन महायुद्धांतून उत्पन्न झालेल्या मानवाच्या जन्मसिद्ध हक्कांच्या झंझावातानें बहुतेक साम्राज्यें नष्ट झालीं, त्यांत इंग्रजांचेंही गेलें. आतां पोर्तुगालसारख्या एखाद्या देशाचें साम्राज्य राहिलें आहे; पण तेंही फार वर्षें टिकण्याची शक्यता दिसत नाहीं. येथें कोणाच्याही उण्याअधिक गुणावगुणांचा परिणाम झाला नसून एका महान तत्त्वप्रणालीचा सध्या तरी विजय झाला आहे. हा विजय चिरकालिक आहे कां स्वार्थी प्रवृत्तींमुळें तात्कालिक ठरतो हें समजण्यास प्रस्तुतचें विसावें शतक लोटलें पाहिजे.

१२. व्याजाचा दर हें अस्थिर व ओढगस्त आर्थिक परिस्थितीचें एक गमक मानलें तर शिवकालापेक्षा पेशवेकाल दगडापेक्षा वीट मऊ या म्हणीप्रमाणें थोडा बरा असावा असा अंदाज आहे. शिवकालांत दीड–दोन वर्षांत दामदुप्पट होई, तर पेशवाईत तीन वर्षांपासून दहा बारा वर्षें लागत. पण ही स्थिती सर्वसामान्य लोकव्यवहारांत होती. सरकारी स्थितींत मोठींच स्थित्यंतरें झालीं. शिवछत्रपतींनीं शत्रुप्रदेशांतील नगरें–मग तीं महाराष्ट्रांतील असोत किंवा महाराष्ट्राबाहेरचीं होवोत – लुटून स्वराज्यसिद्धीसाठीं खूप पैसा जमा केला. त्याचा उपयोग त्यांना तर झालाच, पण नंतर शंभू छत्रपतींनाही झाला. त्यांनीं शत्रुप्रदेशांतील शहरें लुटण्याचा प्रयत्न केला. पण औरंगजेब स्वतःच दक्षिणेंत उतरल्यामुळें त्यांचा प्रयत्न सतत चालू राहूं शकला नाहीं व शिवछत्रपतींच्या वेळीं तुडुंब भरलेला खजिना शंभू छत्रपतींच्या अखेरीस रिता झाला. राजाराम छत्रपतींना निर्वासित होऊन जिंजीस जावें लागलें आणि

तेथें कर्ज काढून व कांहीं मराठी प्रदेशाची विक्री करून निर्वाह करावा लागला. महाराष्ट्रांत तर औरंगजेब व मराठे यांमध्यें सतत धावपळ आणि आघात-प्रत्याघात चालू असल्यानें मराठे खजिनापूर असणें शक्यच नव्हतें. भविष्यकालीन समृद्धीच्या आशेनें सर्वस्वी प्रतिकूल अशा द्रव्यपरिस्थितींत ते टक्कर देत राहिले हेंच त्यांचें त्या वेळचें वैशिष्टय. औरंगजेब मेला, मराठी राज्य स्थिरावलें, पेशवे व मराठे सरदार उत्तरेंत व दक्षिणेंत अनिरुद्ध संचार करूं लागले, तरी मराठेशाहीचा सरकारी खजिना कर्जबाजारीच होता. थोरल्या बाजीरावाची तक्रार अशी कीं, त्याचे सरदार कोटकोट खजिना बाळगून होते; पण कर्जापायीं त्याचें कपाळ मात्र छिनत चाललें होतें. बाळाजी बाजीरावाचें गाऱ्हाणें हें कीं, एक उत्तरेंतून दक्षिणेकडे व दुसरी दक्षिणेंतून उत्तरेकडे अशा दोन सुवर्ण नद्या वाहूं लागल्या होत्या; पण बेटया मधल्या मधेंच आटून जात. पुण्यापर्यंत पोंचतच नव्हत्या. बाळाजी बाजीरावाच्या वेळीं इ. १७५९ च्या सुमारास दौलतीला सव्वा ते दीड कोटी रुपये कर्ज असून ते फेडण्यासाठीं सरदारांत वाटून दिलें होतें व त्यांनीं तो भार उचलण्याचें मान्य केलें होतें. पण इ. १७५९ च्या सुमारास जनकोजी शिंदे लिहितो कीं, आमचेजवळ ऐवज कितपत आहे हें खावंद जाणतातच. तेव्हां आमचें संकट तेच निवारतील. तेव्हां असें वाटतें कीं, साधारणतः इ. १७३०ते१७५३ च्या दरम्यान सरदारांपाशीं कांही पैसा असला तरी इ. १७५२ च्या पहिल्या सहामाहींत कांहीं अटींवर अंतःशत्रू व बहिःशत्रू यांपासून साऱ्या मुघली पादशाहीचें रक्षण करण्याचा करार मराठ्यांनीं केल्यामुळें त्यांना भारतांत शत्रुप्रदेश उरला नाहीं. म्हणून त्यांना तत्त्वतः कुठेंही लुटालूट करतां येईना आणि सारावसुलीच्या नावाखालीं जुलमानें पैसा जमविणेंही उच्च संस्कृतीमुळें त्यांना जुळेना. तेव्हां करारानुसार ठरलेल्या रकमाही वेळच्या वेळीं जमा झाल्या नाहींत; वर्षानुवर्षें बाक्या ओढलेल्या तत्कालीन जमाखर्चांत दिसतात. थोरल्या माधवरावाला तोफा ओतण्यासाठीं घरांतील रोजच्या उपयोगाचीं सोन्या-रुप्याचीं भांडीं मोडावीं लागलीं एवढेंच नव्हे तर मरणापूर्वीं

लिहिलेल्या नऊ कलमी यादींत किंवा मृत्युपत्रांत दौलतीचें कर्ज वारावें असें नमूद करावें लागलें. दौलतीच्या कर्जाची चिंता थोरल्या बाजीरावापासून थोरल्या माधवरावापर्यंत अशा प्रकारें व्यक्त झाली आहे. याचा अर्थ कडक व शिस्तीचा राज्यकारभार चालविण्यास आवश्यक तो पैसा पेशव्यांजवळ नसल्यामुळें त्यांत ढिलेपणा उत्पन्न झाला. तसेंच हुजरातीमधील सैनिकांना वेळच्या वेळीं नालबंदी व शिबंदी मिळत निसल्यामुळें ते वारंवार नोकरी-वरून न विचारतां निघून जात. सैन्यांत राहण्यासाठीं त्यांवर रागनुरागांचा प्रयोग करावा लागे.

१३. आतां वेदोक्ताविषयीं थोडें बोलतों. प्रथम हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, वेदांचा अधिकार त्रैवर्णिकांसच असावा हें उचित नाहीं, यांत विषमता आहे अशीं तक्रार ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरींत

वेदु संपन्न होये ठांइ । परि कृपणु आन नाही ।।
जें कानि लागला तिहिं । वर्णाचांची ॥
एरां भवव्यथा ठेलेयां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां ॥
अनवसरू मांडूनिया । असे नव्हे ॥

इत्यादि ओव्यांनीं गीतेच्या अठराव्या अध्यायांतील सासष्टाव्या श्लोकावर व्याख्यान करतांना केली आहे. शकाच्या सोळाव्या शत-कांत (श. १५३४) कलावाद्यंतयोः स्थितिः असा विचित्र अभिप्राय आपल्या शूद्रकमलाकरांत व्यक्त करून भट्ट कमलाकरांनीं मोठाच गोंधळ उत्पन्न केला. परकी सत्ता, मोठी जनसंख्या व अध्ययन-अध्या-पनाच्या ऐवजीं इतर व्यवसाय मुख्य. यामुळें ब्राह्मणवर्गांत जेवढा आचारलोप झाला होता त्याहून कितीतरी अधिक इतर वर्गांत झाला होता हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. बाकी ब्राह्मणांतही आचारभ्रष्टता माजल्याची तक्रार विश्वगुणादर्शचंपूकार, समर्थ रामदास स्वामी इत्यादींनीं केली आहेच. पण क्षत्रियांचें मुख्य कर्म जें युद्ध त्या आचाराचें महाराष्ट्रांत भरपूर पालन होत होतें व शिवछत्रपतींनीं त्याची पराकाष्ठा केली. तेव्हां त्यांचें क्षत्रियत्व त्याच भट्टवंशांतील गागाभट्टानें मान्य करून त्याचा पुरस्कार केल्यामुळें त्यांचे घरीं सर्व कर्मं [illegible] ागलीं. पण मूळच्या

चार वर्णांच्य· शिवकालांत जन्मावलंबी इतक्या जातिजमाती अस्तित्वांत आल्या कीं त्या कोणत्या वर्णांत घालावयाच्या याचा निर्णय झाला नव्हता किंवा त्यांपैकीं कोणत्या त्रिवर्णांतर्गत व कोणत्या त्रिवर्णेतर याचा पत्ता लागणें त्या वेळींही अशक्य होतें, आजही अशक्य आहे. मराठींत नदीचें मूळ व ऋषीचें कुळ शोधूं नये असा एक वाक्प्रचार आहे. त्याचा पत्ता लागणें कठीग व विचित्र. मला वाटतें जातीचें खूळ शोधणें तितकेंच कठीण आहे. अशा स्थितींत प्रभु मंडळींपैकीं एकानें वेदोक्ताचा अधिकार मागितला तेव्हां चालू झालेला वाद शिवशाहींत तुटला नाहीं. पेशवाईंत सुटला नाहीं. कायस्थ – परभू – निर्णय हें प्रकरण अजिबांत बनावट असेल असें कसें समजावें ? पण पेशवाईंत जाधव, भोसले, गायकवाड, शिंदे, इत्यादींनीं वेदोक्ताचा आग्रह धरला होता कीं नाहीं याचा पक्का पत्ता लागत नाहीं. कायस्थपरभूनिर्णयांत सांगितलें आहे तें हें कीं, प्रभूंना पूर्वीं कधीं वेदोक्ताचा अधिकार होता असें दिसत नाहीं; तेव्हां नव्यानें तो देण्याचें कारण नाहीं. पेशवाईंत या वादांत थोडी प्रगति झाल्याचें दिसतें. हा वाद शाहूकडे गेला असतां कांहीं ब्राह्मण मंडळी प्रभूंना वेदोक्ताचा अधिकार द्यावा असें म्हणत होतीं, तर कांहीं देऊं नये असें प्रतिपादीत. शिवकालांत असे दोन पक्ष नसतीलच असें नाहीं. पण अस्तित्वाचा पुरावा नसल्यामुळें नव्हते असें सध्या धरून चालूं. या वादांत शाहूनें निर्णय दिला तो जुनें मोडूं नये, नवें करूं नये असा. कायस्थपरभूनिर्णयांत निकाल संभाजीच्या अध्यक्षत्वानें दिला गेला होता. दोन्ही वेळेला निर्णय देणारे ब्राह्मण नसून मराठे किंवा क्षत्रिय आहेत हें ध्यानांत घेतलें पाहिजे. ब्राह्मण सहाय्यक आहेत.

१४. आतां पतितपरावर्तन. शिवपूर्वकालांत किंवा शिवकालांत मुसलमानी व ख्रिश्चन सत्ताधारी बळाच्या जोरावर हिंदू धर्म, संस्कृति व भाषा यांवर आघात करीत होते. औरंगजेब तर देवळें तोडणें, मूर्ति फोडणें, क्षेत्रें भ्रष्ट करणें, कैद्यांना जीवदानाच्या मोबदल्यांत मुसलमान करणें, मुसलमान झाल्यास गुन्ह्याची माफी करणें, स्वेच्छेनें मुसलमान झाल्यास पारितोषिक देणें, इत्यादि जमेल त्या

उपायांनीं इस्लामचा प्रसार करीत होता. ख्रिस्ती सत्ताधारी वरील प्रकारचे उपाय योजून शिवाय इन्क्विझिशन सारख्या अमानुष उपायांचा अवलंब करून ख्रिश्चन धर्म व संस्कृती यांचा प्रसार करीत होते. त्याचे परिणाम लोकांच्या स्पष्टपणें डोळ्यांत भरत. तेव्हां शिवकालांत मार्गदर्शक कांहीं शुद्धीकरणें झालीं. विशेषतः नेताजी-सारखा पहिल्या प्रतीचा पण बळानें बाटवला जाऊन मुसलमान झालेला मराठा सरदार शिवछत्रपतींनीं परत हिंदू करून घेतलेला दिसतो. छत्रपति संभाजीच्या कालांतही अशा प्रकारचीं उदाहरणें आहेत. पण जन्मजात मुसलमानास वा ख्रिश्चनास हिंदू करून घेतल्याचें उदाहरण आज आमच्याजवळ नाहीं. पेशवाईंत जबर-दस्तीनें बाटून कोणी मुसलमान किंवा ख्रिश्चन झाला असेल असें वाटत नाहीं. म्हणून पेशवाईंत शुद्धीकरणें झालीं तीं विधर्मी बन-लेंल्यास स्वधर्मांत घेतल्याचीं क्वचित् असून (शाहू रोजकिर्द वि. ३७३, पृ. २१५; सु. ११२१, श. १६४३, इ. १७२१) आपसां-तील अन्नोदकसंसर्ग, असंगसंगति, पंक्तिपावनत्व इत्यादि विषयक मुख्यतः आहेत. तथापि अव्वल आंग्लाईपर्यंत बाटल्या–बाटविलेल्या मुसलमानांना परत हिंदू केल्याचीं उदाहरणें आहेत. जन्मजातांना हिंदू करून घेतल्याचीं उदाहरणें मात्र नाहींत. विचार येथवर पुढें दोन्ही कालांत गेले नव्हते.

१५. अंगवस्त्र ठेवणें, कुणबिणी ठेवणें हें दोन्ही कालांत सारखेंच चालू होतें. शिवाजी महाराजांच्या निरनिराळ्या वेळीं लग्नाच्या एकूण आठ बायका झाल्या. शिवछत्रपतींनीं अंगवस्त्र ठेवल्याचा पक्का समकालीन पुरावा नसला तरीही बखरकारांनीं त्यांस दोन रक्षा असल्याचें सांगण्यास कमी केलें नाहीं. विधियुक्त लग्नाच्या ८–९ बायका करणें आणि ४–२ अंगवस्त्रांसह एकच बायको असणें यांत व्यवहारतः जेवढा फरक आहे त्याहून कितीतरी पटींनीं अधिक तत्त्वाचा फरक आहे. पण शहाजी, संभाजी, राजाराम, शाहू, बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, नानासाहेब इत्यादि सर्वांना अंगवस्त्रें होतीं. शिवकालीन एका अंबाजी घोरपड्यानें २५ होन पाठवून ४-५ बऱ्या, नीटस, गोरिया, जातिवंत अशा कुणबिणी खरेदी

करण्यास सांगितलें आहे (शिचसा ४।७२४). अन्नोदकनिर्बंधामुळें जातिवंतचा अर्थ काय असावा हें ध्यानांत येतें; तसें बऱ्या, नीटस, गोरिया, शब्दांवरून त्यांचें प्रयोजन स्पष्ट होतें. त्यांचा भोगपत्नी म्हणून उपयोग करावयाचा होता. आतां अशा संसर्गामुळें अन्नोदक-निर्बंध नाहीं म्हटलें तरी सुटतात. बाजीरावाला अभक्ष्यभक्षण व अपेयपान करण्याचा दोष त्याची भोगपत्नी मस्तानी हिजपासून लागल्याचा निर्देश आहेच. तात्पर्य याबाबत दोन्ही काळांत कांहीं फरक पडला होता असें दिसत नाहीं. सखाराम बापू, नाना फडणीस इत्यादींनीं आठ आठ लग्नें केलीं; पण अंगवस्त्रें, भोगपत्न्या असूं नयेत, लग्नें पुष्कळ व विशेषत: म्हातारपणीं करूं नयेत, अशाविषयीं आवाज उठविला गेला नाहीं.

१६. सतीची चाल शिवकालांत होती तशी पेशवेकालांतही होती. ज्या जमातींत पुनर्विवाह रूढ होता त्यांत सतीची चाल नसावी. पण होळकरांच्या घराण्यांत तत्कालीं उच्च समजल्या जाणाऱ्या जमातींतल्या आचारविचारांचें अनुकरण होऊं लागल्यानें त्या घराण्यांत बायका सती गेलेल्या दिसतात, जाण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. शिंदे घराण्यांत कोणी सती गेल्याचें उदाहरण माझ्या लक्षांत येत नाहीं. लवकर लग्नें करण्याची चाल दोन्ही काळांत सारखीच प्रचलित होती. त्याचा परिणाम दोन्ही बाजूंनीं होई. एका बाजूस अकाली संभोग व गर्भधारणा यामुळें बायका लवकर मरत; तर दुसऱ्या बाजूनें अकाली समागम करावा लागल्यानें पुरूषही लवकर मरत.

१७. असो. शिवशाही व पेशवाई या संबंधींच्या तुलनेच्या संदर्भांत कांहीं थोडेसे मुद्दे हाताळले तर पुष्कळ राहून गेले. पण भाषणाची कालमर्यादा ओलांडल्यामुळें येथेंच थांबतों.

---

# ३२. पुरवणी

पृ. २१४, २६. पृ. २०३; परिच्छेद ६, ओळ ४ यांत गंबार असें एक सोन्याचें नाणें निर्दिष्ट आहे. मूळ लेख लिहितांना मला त्याचा उलगडा झाला नव्हता. पण अलीकडे (इ. १८३५ पूर्वी) प्रिन्सेपनें निरनिराळ्या ठिकाणच्या इंग्रजी सरकारी खजिन्यांत येणाऱ्या नाण्यांचीं नांवें व त्यांच्या इंग्रजी रुपयांत किंमती यांचीं जीं कोष्टकें तयार करून खजिन्याचें काम करणाऱ्या सर्व सरकारी अधिकाऱ्यांकडे पाठविलीं व जीं त्याच्या 'एसेज ऑन इंडियन अँटिक्विटिज' या पुस्तकास जोडलेल्या 'यूसफुल टेबल्स' या प्रकरणांत उण्याअधिक प्रमाणांत समाविष्ट आहेत, त्यांत हॉलंडमध्यें इसवीच्या सतराव्या शतकांत प्रचलित असलेल्या ड्यूकटलाच (Ducat) गबर (Gubber) हें दुसरें नांव होतें असें सांगितलें आहे. तेव्हा गबर>गंबार = ड्यूकट असें सिद्ध झालें. प्रिन्सेपनें आपल्या कोष्टकांमध्यें शंभर गबरांची किंमत मुंबईचे ४७५·६१९ (कलकत्ता ४६६·४६१) रुपये होते असें सांगितलें आहे. याचा अर्थ एका गबराची किंमत पावणेपांच मुंबई रुपयांहून थोडी अधिक अशी झाली. ऑक्सफर्डच्या कन्साइज इंग्रजी डिक्शनरींत (इ. १९५८) याची किंमत सुमारें ९ शिलिंग अशी सांगितली असून हा सामान्यतः बहुतेक युरोपीय देशांत चालू होता असें नमूद आहे.

२७. होन या शब्दाचा धात्वर्थ सोनें असा असल्याचें मी या लेखांत नमूद केलें आहे. तेव्हां होन म्हटला म्हणजे तो सोन्याचा असणार अशी आपली सामान्य समजूत आहे; पण ती समजूत बहुतांशीं अचूक आहे; सर्वांशीं नाहीं. सावंतवाडीकडील फार्सी कागदांत होन–इ–नुक्रह असा शब्दप्रयोग आला आहे. याचा अर्थ रुप्याचा होन असा आहे (शिचसा १३।१).

२८. पातशाही होन म्हणजे आदिलशाही होन अशी माझी मुहम्मद आदिलशाहाच्या फर्मानांवरून समजूत झाली होती; पण शिचसा ५।१३ हा कागद अहमदनगरच्या निजामशाही प्रदेशांतील व श. १५५१ चा म्हणजे निजामशाही बुडण्यापूर्वीचा असून

त्यांत पातशाही होन असा शब्दप्रयोग आला आहे. तेथें या शब्दांचा अर्थ आदिलशाही होन असणेंच शक्य नाहीं असें म्हणतां येत नसलें तरी तेथें बहुधा निज़ामशाही होन असण्याची शक्यता अधिक आहे.

२९. विजापूरचा सुल्तान दुसरा इब्राहीम यास नौरस या शब्दाविषयीं अतिशय आपुलकी वाटे. यानें स्वतःच्या नावानें विजापूरला जें उपनगर वसविलें त्याचें नांव नौरसपूर असें ठेविलें होतें. याच्या कारकिर्दींत फिरिश्त्यानें हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्यांचा इतिहास लिहिला त्याचें एक नांव नौरसनामा असें होतें. त्याप्रमाणें प्रस्तुत इब्राहीमनें जें सोन्याचें नाणें प्रचलित केलें त्यास नौरस असें म्हणत. या सुल्तानाच्या कालांतील कित्येक फर्मानांत नौरस ह्या नाण्याचा व होनाचा संबंध दाखविणाऱ्या नोंदी आढळतात. त्यावरून नौरस हा नऊ होनांचा होई असें दिसतें (श्री. ग. ह. खरे : ऐफासा ३।३६, ३८, ३९, ४१–४३. यांपैकीं ले. ४१ व ४३ मध्यें हिशेब दिला आहे, त्यावरून होनाला टंकही म्हणत असें दिसतें). नौरस हें जमीनीचें एक मापही होतें.

३०. शिवकालीन कागदांत शिवरायी होनाचा उल्लेख येणें अगदीं साहजिक आहे. हे होन पहावयास मिळणें मात्र आजकाल अतिशय दुर्मिळ झालें आहे. विजयनगरकालीन होन किती तरी पहावयास मिळतात. सुल्तानपूर्वकालीन कित्येक सोन्याचीं नाणीं अधूनमधून उपलब्ध होतात. परंतु शिवरायी होन पहावयास मिळणें अतिशय कठीण झालें आहे. सातारच्या महाराजांकडे असलेले शिवरायी होन शिवाजीच्या त्रिशतसांवत्सरीक जन्मोत्सवाच्या निमित्तानें भारत इतिहास संशोधक मंडळांत महाराजांचे त्या वेळचे कारभारी डोसाभाई माणेकजी ह्यांच्याकडून प्रदर्शनासाठीं आणले होते. त्यांचेंही पुनर्दर्शन प्रयत्न करूनही अद्याप घडत नाहीं. तथापि शिवकालांत ते मोठ्या प्रमाणांत व्यवहारांत प्रचलित होते असें दिसतें. पुण्याजवळच्या चिंचवड गावीं मोरया गोसाव्यांचा मठ आहे. त्या मठाचे मूळ पुरूष साधू होते, कां संत होते, कीं महंत होते हें सांगतां येत नाहीं. पण शिवकालांत ह्या मठाच्या गादीवर जे पुरूष बसले होते ते महंत बनले होते याविषयीं संशय नाहीं.

हुतात्मे छत्रपती संभाजी ह्यांची पत्नी येसूबाई, तिचा मुलगा शाहू व त्यांची कांहीं सेवक मंडळी औरंगजेबाच्या कैदेंत पडली असतां त्यांना दिवस फार हलाखींत काढावे लागले. ते वारंवार द्रव्याच्या मोठ्या अडचणींत सांपडल्याचें दिसतें. अशाच एका प्रसंगीं येसूबाईनें चिंचवडच्या मोरया गोसावींस पत्र लिहून कर्जाची मागणी केली व चांगले दिवस आल्यावर तें फेडूं असें आश्वासन दिलें.

३१. तात्पर्य राजारामकालीन मोरया गोसावी महंती व सावकारी करीत. यामुळें त्यांजकडील कागदपत्रांत नाणीं व त्यांचे विनिमयभाव यांचे उल्लेख येणें साहजिक आहे. अशाच एका कागदांत शिवरायी व निशाणी होनांचे विनिमयभाव समजतील असा हिशेब दिला आहे तो असा :‘१२६०९ ८ =सिवराई ३८९८॥ दर ३८ = ।–येकूण २४८३ निशाणी १२४१॥ दर २ ये’ याचा अर्थ एका शिवरायी होनाची किंमत सध्याच्या भाषेंत बोलावयाची तर ३ रुपये, तीन आणे, एक ढब्बू, एक पैसा अशी होते. तथापि शिवकालांत रुपयाच्या खालीं पण रुपयाशीं संबद्ध जीं नाणीं प्रचलीत होतीं त्यांस अधेली, पावली, चवली, आणा इत्यादि सध्याचीं नावें होतीं कीं नाहीं हा प्रश्नच आहे. ३८ = ।–ही रक्कम अक्षरीं सांगावयाची झाल्यास तीन रुपये, तीन दुवल, ब्याल, वीस अशी सांगावी लागेलसें वाटतें. कारण शिवोत्तर पण शाहूपूर्वकालीन एका कागदांत १५४७ या रकमेतून २॥ = । एवढी रक्कम वजा केली असतां १५४४।–।एवढी रक्कम शिल्लक रहाते असें दाखविलें असून या रकमेचें अक्षरीं रूपांतर पंधरासे सव्वा चौतालीस रुपये, दुवल, ब्याल असें लिहिलें आहे. या निर्देशाचा व होनाच्या भागांचा एकत्रित विचार केला तर काय आढळतें तें येथें मांडून दाखवितों :

१ रुपया = २ अधेल्या = ४ पावल्या = ८ चवल्या = १६ आणे = ३२ ढब्बू = ६४ पैसे
१ होन = २ प्रताप = ४ धरण = ८ चवल = १६ दुवल = ३२ ब्याल = ६४ वीस

३२. यावरून हें स्पष्ट होईल कीं, प्रस्तूतच्या कागदांत ज्यांना दुवल व ब्याल असें म्हटलें आहे त्यांना सध्याच्या भाषेंत आपणाला आणा व ढब्बू असें म्हटलें पाहिजे. तरच प्रस्तुतच्या कागदांतील हिशेब जुळूं शकेल. किंवा वरील रक्कम १५४४।–।+२॥–।=१५४७

अशीही मांडतां येईल. हा हिशेब जुळावयाचा तर अंत्य दोन उभ्या रेघा म्हणजे एक उपांत्य आडवी रेघ; चार उपान्त्य आडव्या रेघा म्हणजे पुर्णांकापुढील एक उभी रेघ असें समजलें पाहिजे. या उभ्या रेघेला नाव द्यावयाचें असेल तर धरण हें द्यावें लागेल. म्हणजे रुपयाच्या खालचीं धरण, दुवल व ब्याल अशा तीन नावांचीं नाणीं शिल्लक राहतील (शिचसा ११।७८).

३३. पृ. २१० परिच्छेद १८ यांत एक पादशाही होन = १। निशाणी होन = ३।।। रुपये असें सांगितलें आहे. याचा अर्थ एका निशाणी होनास ३ रुपये हा भाव येतो. पण शिचसा खंड ३ पृष्ठ ११८ व इतरत्र अनेक ठिकाणीं एक निशाणी होन = २ रुपये असा भाव दिलेला सापडतो. चिंचवड दप्तरापैकीं वर दिलेल्या कागदांतील हिशेबावरूनही एक निशाणी होन = २रुपये असाच भाव येतो.

३४. पृ. २०८, परिच्छेद १६. यामध्यें शेवटीं आटपाडोकडे वीसाचे दोन भाग करीत असें नमूद आहे. सांवतवाडीकडेही वीसाचे दोनच भाग करीत असें दिसतें (श्री. वि. पु. पिंगुळकर: सावंतवाडी संस्थानचा इतिहास पृष्ठ १४०).

३५. पृ. २१४ नवा परिच्छेद क्रमांक २५ अ. एका अप्रसिद्ध पत्रांत सापिका ८१।। अशी नोंद आहे. म्हणजे १।। रुक्याचा सापिका होईल. त्यालाच अधेला किंवा दिडकी असें अलीकडे म्हणत. तथापि एक लक्षांत ठेवलें पाहिजे तें हें कीं, पैसा हा शब्द थोड्या वर्षांपूर्वीं चाळिसगावाकडे दुंडा पसा किंवा ढब्बू या साठींही वापरीत असत.

३६. जमीनीचें माप सांगतांना कधीं कधीं नाण्यांचा निर्देश येतो. उदाहरणार्थ, लिमये कुलवृत्तान्त जुनी आवृत्ती पृष्ठ ६१ वर जमीनीचें माप मार व ब्याल शब्दांनीं सांगितलें आहे. मार शब्द अजूनही कर्नाटकांत जमीनीचें माप सांगतांना वापरतात. जुन्या कागदांत ब्याल हा शब्द वापरला आहे. तिसरा शब्द सजगाणी. याचा जमीनीचें क्षेत्र सांगतांना उपयोग केला आहे.

पृ. २४९, ४५. प्रतापराव गुजराची चौरस पण थोडी निराळी आणखी एक मुद्रा शक १५९४ कार्तिक वद्य ९ (इ. १६७२ नोव्हेंबर ३

या कालाची आहे ती अशी : श्रीशिवसेनानेतुर्मुद्रा जयति प्रतापरायस्य (शिचसा ११।४४). शिवाजी महाराजांचा पहिला अमात्य निळो सोनदेव याचे दोन शिक्के व दोन मोर्तबें आढळतात तीं अशीं : १) सीतापतीचरणपरायण । नीलकंठ सोनाजी नारायण; लेखनसीमा समुल्लसती. २) श्रीरामचंद्रचरण । नीलकंठ सोनदेव शरण; राजते लेखनावधि. दुसरा अमात्य कांहीं दिवस नारो नीलकंठ. याचीं शिक्कामोर्तबें मला आढळली नाहींत. तिसरा अमात्य रामचंद्र नीलकंठ. यानें प्रथम कांहीं दिवस आपल्या पित्याचा दुसरा शिक्का वापरला. नंतर 'श्रीरामजगद्वंदितसंदेशा {देशा} नंदविधायिनी। नीळकंठजनेर्मुद्रा रामचंद्रस्य राजते' हा शिक्का वापरूं लागला असें म्हणतात. पण मला तो कोठें आढळला नाहीं. शिवाय त्याचा पाठही अत्यंत अशुद्ध आहे. यामुळें असा शिक्का खरोखरच होता कीं नाहीं या विषयींच शंका येते (इतिहास ऐतिहासिक ३ रें वर्ष, पृ. ११३; शिवशाहीचा लेखनालंकार पृ. ४४).

पृ. २५८, ९. मुंबई सरकारचे दप्तरखाने हा लेख लिहून आज २५ वर्षे झालीं. एवढया अवधींत परिस्थितीमध्यें किती तरी फरक पडला आहे. या अवधींत प्रथम संस्थानें विलीन झालीं. नंतर कर्नाटकाचा भाग मुंबई प्रांतापासून गळून पडला आणि पुढें गुजरात जाऊन त्याऐवजीं जुन्या मध्य प्रांतांतील ८ व हैद्राबाद संस्थानांतील ५ जिल्हे महाराष्ट्रांत येऊन एकूण मुंबईसह २६ जिल्ह्यांचा महाराष्ट्र बनला. आतां या नव्या महाराष्ट्र राज्यांत मुंबई, पुणें, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद, अशा पाच ठिकाणीं लहान-मोठया लेख्यशाला आहेत किंवा होऊं घातल्या आहेत. ह्या लेख्यशाला, तसेंच पुरातत्त्वविभाग आणि नव्यानें उत्पन्न झालेला संग्रहालय विभाग यांचें संचालन करण्यासाठीं सध्या तरी संचालक म्हणून एकच अधिकारी आहे. आतांपर्यंत डॉ. पु. म. जोशी आणि डॉ मो. गं. दीक्षित असे दोन संचालक होऊन गेले असून श्री. वि. गो. खोबरेकर हे तिसरे संचालक आहेत. महाराष्ट्राशिवाय इतर बहुसंख्य राज्यांत अभिलेखागार, पुरातत्त्व आणि संग्रहालय असे तीन स्वतंत्र विभाग करून त्या प्रत्येकावर

एकेक संचालक नेमल्याचें आढळून येतें. पण महाराष्ट्रांत मात्र ह्या तिन्ही विभागांवर मिळून एकच संचालक आहे.

१०. या व्यवस्थेमुळें तिन्ही विभागांची समान प्रगती होत नसल्याचें दिसून आल्यावरून उपाययोजनेचा विचार करण्यासाठीं महाराष्ट्र शासनानें इ. १९६८ डिसेंबरच्या शेवटीं महामहोपाध्याय द. वा. पोतदार, प्रा. ग. ह. खरे (निमंत्रक), श्री. दे. व्यं. चौहान, श्री. बा. दि. गांगल आणि या तीन विभागांचे संचालक प्रथम डॉ. मो. गं. दीक्षित आणि त्यांच्या मृत्यूनंतर श्री. वि. गो. खोबरेकर अशा पाच जणांची एक समिती नेमली. तिच्या मुंबई व पुणें ह्या दोन ठिकाणीं मिळून सात बैठकी झाल्या. या समितीनें मुंबई व पुणें ह्या ठिकाणच्या लेख्यशाला स्वतः पाहिल्या आणि समितीचे एक सभासद प्रा. ग. ह. खरे यांनीं कोल्हापूरच्या लेख्यशालेची पाहणी केली.

११. या समितीनें अनेक शिफारसी केल्या आहेत. पण त्यांतील महत्त्वाच्या व कायम स्वरूपाच्या शिफारसी अशा. १) सध्या लेख्यशालांवर जमाबंदी, सामान्य प्रशासन व शिक्षण अशा तीन खात्यांचा अधिकार चालतो; त्याऐवजीं इतर राज्यांप्रमाणें हा विभाग शिक्षण खात्याकडे सोपवावा. २) वर सांगितलेले तीन विभाग सांभाळण्याचें काम एकाच संचालकाकडे ठेवल्यानें कोणत्याही विभागाचें काम समाधानकारक रीतीनें प्रगत होणार नाहीं. म्हणून पुराभिलेख आणि पुरातत्व (व संग्रहालय) असे निदान दोन विभाग करून त्यांवर प्रत्येकी स्वतंत्र संचालक नेमावा. ३) मुंबईच्या दमट हवेचा विचार करतां तेथें असलेल्या अभिलेखांचें आयुष्य कमी होण्याचा धोका आहे. म्हणून मुंबईची लेख्यशाला शक्य तितक्या त्वरेनें हलवून ती पुण्यास न्यावी व तेथें तिजसाठीं एलिएनेशन कचेरीजवळच प्रशस्त वास्तू बांधावी. ४) प्रत्येक लेख्यशालेंत नेमके किती कागद आहेत हें आज कोणालाही सांगतां येत नाहीं. यामुळें या लेख्यशालांतील एखादा कागद कोणत्याही कारणानें गळबटला तर त्याचा शोध घेणें शक्य होत नाहीं. म्हणून या सर्व कागदांवर हिशेबाला सोईचें जाईल अशा तऱ्हेनें पण अत्यंत त्वरेनें क्रमांक घालावे. ५) मुंबई व पुणें येथील लेख्यशालांच्या

मार्गदर्शिका आहेत; पण त्या फार जुन्या झाल्या आहेत आणि शिवाय त्या अगदीं त्रोटकही आहेत. कोल्हापूरच्या लेख्यशालेची तर मार्गदर्शिकाही नाहीं. तरी सर्वत्र लेख्यशालांच्या विस्तृत अशा मार्गदर्शिका तयार कराव्या. ६) अशा मार्गदर्शिका तयार केल्या तरीही तेथील पत्रसंख्या एवढी मोठी आहे कीं, नवीन संशोधकाला लेख्यशालेच्या कोणत्या भागांत नेमके कोणत्या प्रकारचे कागद मिळतील हें समजणें शक्य होणार नाहीं. म्हणून सध्या मुंबई, पुणें, कोल्हापूर ह्या तीन ठिकाणीं जाणते संशोधक–अधीक्षक नेमावे या लेख्यशाला विभागातर्फे संशोधनाचें, सूचीकरणाचें किंवा अशाच तऱ्हेचें आणखी जें कांहीं कार्य चालेल त्यावर लक्ष ठेवण्याचें व त्यांत मार्गदर्शन करण्याचें कामही अधीक्षकांवर सोपवावें. ७) ह्या लेख्यशालांचा संशोधकांना उत्तम उपयोग व्हावयाचा असेल तर तेथील कागदपत्रांच्या हरएक प्रकारच्या सूची करणें आवश्यक आहे. पूर्वीच्या मुंबई प्रांताच्या शासनानें किंवा सध्याच्या महाराष्ट्र शासनानें या बाबतींत विशेष प्रगती केलेली आढळत नाहीं. म्हणून आतां तरी जागे होऊन आवश्यक तितकीं माणसें कामास लावून सूची करण्याचें काम अंगावर घेतलें पाहिजे व तें शक्य त्या त्वरेनें पार पाडलें पाहिजे. ८) या कार्यासाठीं लागणारा पैसा नियमितपणें उपलब्ध व्हावा म्हणून पुराभिलेख विभागाचा पुरातत्व विभागाप्रमाणेंच पंचवार्षिक योजनांत समावेश करावा.

१२. समितीचा वृत्तान्त इ. १९६९ डिसेंबरच्या शेवटीं महाराष्ट्र शासनाकडे पाठविला. तो आतां शासनानें प्रकाशित केला आहे. त्यांतील वर दिलेल्या शिफारशींस अनुसरून महाराष्ट्र शासनानें काय केलें तें पुढें देतों. अजून प्रत्येक विभागावर स्वतंत्र संचालक नेमलेला नाहीं. हा विभाग योजनांत समाविष्ट केलेला नाहीं. प्रत्येक लेख्यशालेच्या प्रत्येक कार्यालयांत तृतीय श्रेणींतील कामगारांचीं नव्यानें कांहीं भरती केली आहे. पण अद्याप कोठेंही अधीक्षक नेमलेले नाहींत. पुण्याच्या लेख्यशालेंतील शाहू दप्तराच्या सूचीचे सुमारें एक हजार डबल रॉयल पृष्ठांचे दोन खंड व कोल्हापूरच्या लेख्यशालेंतील निवडी दप्तराचा एक खंड असे तीन सूची-

खंड प्रकाशित केले आहेत. मुंबईंतील लेख्यशालेचा एक सूची खंड सुमारें १५ वर्षांमागें प्रकाशित झाला आहे. कागदपत्रांचा विभाग अद्याप शिक्षणखात्याकडे सर्वस्वी सोपविलेला नाहीं. कागदपत्रांची क्रमांकांसह मोजदाद चालू केली कीं नाहीं हें मला समजलेलें नाहीं. गेल्या पंचवीस वर्षांत त्या जोड विभागानें आणखी कांहीं प्रकाशनें केलीं आहेत. पण त्यांचा या समितीच्या शिफारशींशीं संबंध नसल्या-मुळें त्यांचें परिगणन येथें केलेलें नाहीं.

१३. पृ. २७१. १३ व्या परिच्छेदांत मी वेदोक्ताविषयीं थोडे विचार प्रगट केले आहेत. मूळ अध्यक्षीय भाषणांत प्रगट केलेले माझे कांहीं विचार, तें भाषण छापतांना काढून टाकलेले आढळले; त्या भाषणाची संपूर्ण प्रत मजपाशीं नव्हती; त्रुटीत होती. तीवरून मूळ भाषणांतील गाळण्यांत आलेला कांहीं भाग मी जेथल्या तेथें घातला. तथापि मूळ भाषणांत असलेला पण छापण्यांत गाळलेला एक भाग कांहीं केल्या सापडेना; शेवटीं नुकताच तो सापडला. रा. ६।४४ या पत्रांत प्रभूंविरुद्ध झालेल्या ९ ग्रामण्यांचें परिगणन केलें आहे. त्यांचा तपशील दिला आहे त्यावरून हीं ग्रामण्यें बहुवंशीं वेदोक्त कर्मं व इतर आचार यांविषयीं होतीं यांत शंका उरत नाहीं. त्यांतील पहिल्या ग्रामण्याचा काळ श. १३६१ हा दिला आहे; तर शेवटच्या ग्रामण्याचा समय १७४५ शक आहे. पहिलें ग्रामण्य फार जुनें दाखविल्यामुळें शंकनीय वाटतें. दुसऱ्याचा समय दिलेला नाहीं. पण तें कोकणांत झाल्याचें सांगितलें आहे. उरलेल्या सात-ग्रामण्यांपैकीं पाचांत कालोल्लेख आहेत. दोहोंचा काल ठरवितां येण्यासारखा आहे. ३ व ४ क्रमांकांचीं ग्रामण्यें शिवकालांतील असून तिसऱ्यांत बाळाजी आवजी चिटणीसाचा मुलगा आवजी याच्या मुंजीविषयीं नोंद आहे. याचाच विचार कायस्थपरभू-निर्णय प्रकरणांत आला आहे. पण तेथें बाळाजीचा मुलगा खंडोजी याच्या मुंजीच्या प्रकरणीं ग्रामण्य झालें म्हणून सांगितलें आहे.

# सूची

या सूचींत, आरंभीं सानुस्वार अक्षर असलेल्या नोंदींची स्वतंत्र बाराखडी केली असून मुख्य नोंदीपुढें अर्धविराम घालून पोट नोंद दाखविली आहे.

अशीही मांडतां येईल. हा हिशेब जुळावयाचा तर अंत्य दोन उभ्या रेघा म्हणजे एक उपांत्य आडवी रेघ; चार उपान्त्य आडव्या रेघा म्हणजे पुर्णांकापुढील एक उभी रेघ असें समजलें पाहिजे. या उभ्या रेघेला नाव द्यावयाचें असेल तर धरण हें द्यावें लागेल. म्हणजे रुपयाच्या खालचीं धरण, दुवल व ब्याल अशा तीन नावांचीं नाणीं शिल्लक राहतील (शिचसा ११।७८).

३३. पृ. २१० परिच्छेद १८ यांत एक पादशाही होन = १। निशाणी होन = ३।।। रुपये असें सांगितलें आहे. याचा अर्थ एका निशाणी होनास ३ रुपये हा भाव येतो. पण शिचसा खंड ३ पृष्ठ ११८ व इतरत्र अनेक ठिकाणीं एक निशाणी होन = २ रुपये असा भाव दिलेला सापडतो. चिंचवड दप्तरापैकीं वर दिलेल्या कागदांतील हिशेबावरूनही एक निशाणी होन = २रुपये असाच भाव येतो.

३४. पृ. २०८, परिच्छेद १६. यामध्यें शेवटीं आटपाडोकडे वीसाचे दोन भाग करीत असें नमूद आहे. सांवतवाडीकडेही वीसाचे दोनच भाग करीत असें दिसतें (श्री. वि. पु. पिंगुळकर: सावंतवाडी संस्थानचा इतिहास पृष्ठ १४०).

३५. पृ. २१४ नवा परिच्छेद क्रमांक २५ अ. एका अप्रसिद्ध पत्रांत सापिका ✓१॥ अशी नोंद आहे. म्हणजे १॥ रुक्याचा सापिका होईल. त्यालाच अधेला किंवा दिडकी असें अलीकडे म्हणत. तथापि एक लक्षांत ठेवलें पाहिजे तें हें कीं, पैसा हा शब्द थोड्या वर्षांपूर्वीं चाळिसगावाकडे दुंडा पसा किंवा ढब्बू या साठींही वापरीत असत.

३६. जमीनीचें माप सांगतांना कधीं कधीं नाण्यांचा निर्देश येतो. उदाहरणार्थ, लिमये कुलवृत्तान्त जुनी आवृत्ती पृष्ठ ६१ वर जमीनीचें माप मार व ब्याल शब्दांनीं सांगितलें आहे. मार शब्द अजूनही कर्नाटकांत जमीनीचें माप सांगतांना वापरतात. जुन्या कागदांत ब्याल हा शब्द वापरला आहे. तिसरा शब्द सजगाणी. याचा जमीनीचें क्षेत्र सांगतांना उपयोग केला आहे.

पृ. २४९, ४५. प्रतापराव गुजराची चौरस पण थोडी निराळी आणखी एक मुद्रा शक १५९४ कार्तिक वद्य ९ (इ. १६७२ नोव्हेंबर ३

या कालाची आहे ती अशी : श्रीशिवसेनानेतुर्मुद्रा जयति प्रतापरायस्य (शिचसा ११।४४). शिवाजी महाराजांचा पहिला अमात्य निळो सोनदेव याचे दोन शिक्के व दोन मोर्तबें आढळतात तीं अशीं : १) सीतापतीचरणपरायण । नीलकंठ सोनाजी नारायण; लेखनसीमा समुल्लसती. २) श्रीरामचंद्रचरण । नीलकंठ सोनदेव शरण; राजते लेखनावधि. दुसरा अमात्य कांहीं दिवस नारो नीलकंठ. याचीं शिक्कामोर्तबें मला आढळली नाहींत. तिसरा अमात्य रामचंद्र नीलकंठ. यानें प्रथम कांहीं दिवस आपल्या पित्याचा दुसरा शिक्का वापरला. नंतर 'श्रीरामजगद्वंदितसंदेशा {देशा} नंदविधायिनी । नीळकंठजनेर्मुद्रा रामचंद्रस्य राजते' हा शिक्का वापरूं लागला असें म्हणतात. पण मला तो कोठें आढळला नाहीं. शिवाय त्याचा पाठही अत्यंत अशुद्ध आहे. यामुळें असा शिक्का खरोखरच होता कीं नाहीं या विषयींच शंका येते (इतिहास ऐतिहासिक ३ रें वर्ष, पृ. ११३; शिवशाहीचा लेखनालंकार पृ. ४४).

पृ. २५८, ९. मुंबई सरकारचे दप्तरखाने हा लेख लिहून आज २५ वर्षें झालीं. एवढया अवधींत परिस्थितीमध्यें किती तरी फरक पडला आहे. या अवधींत प्रथम संस्थानें विलीन झालीं. नंतर कर्नाटकाचा भाग मुंबई प्रांतापासून गळून पडला आणि पुढें गुजरात जाऊन त्याऐवजीं जुन्या मध्य प्रांतांतील ८ व हैद्राबाद संस्थानांतील ५ जिल्हे महाराष्ट्रांत येऊन एकूण मुंबईसह २६ जिल्हयांचा महाराष्ट्र बनला. आतां या नव्या महाराष्ट्र राज्यांत मुंबई, पुणें, कोल्हापूर, नागपूर व औरंगाबाद, अशा पाच ठिकाणीं लहान-मोठया लेख्यशाला आहेत किंवा होऊं घातल्या आहेत. ह्या लेख्यशाला, तसेंच पुरातत्त्वविभाग आणि नव्यानें उत्पन्न झालेला संग्रहालय विभाग यांचें संचालन करण्यासाठीं सध्या तरी संचालक म्हणून एकच अधिकारी आहे. आतांपर्यंत डॉ. पु. म. जोशी आणि डॉ मो. ग. दीक्षित असे दोन संचालक होऊन गेले असून श्री. वि. गो. खोबरेकर हे तिसरे संचालक आहेत. महाराष्ट्राशिवाय इतर बहुसंख्य राज्यांत अभिलेखागार, पुरातत्त्व आणि संग्रहालय असे तीन स्वतंत्र विभाग करून त्या प्रत्येकावर

एकेक संचालक नेमल्याचें आढळून येतें. पण महाराष्ट्रांत मात्र ह्या तिन्ही विभागांवर मिळून एकच संचालक आहे.

१०. या व्यवस्थेमुळें तिन्ही विभागांची समान प्रगती होत नसल्याचें दिसून आल्यावरून उपाययोजनेचा विचार करण्यासाठीं महाराष्ट्र शासनानें इ. १९६८ डिसेंबरच्या शेवटीं महामहोपाध्याय द. वा. पोतदार, प्रा. ग. ह. खरे (निमंत्रक), श्री. दे. व्यं. चौहान, श्री. बा. दि. गांगल आणि या तीन विभागांचे संचालक प्रथम डॉ. मो. गं. दीक्षित आणि त्यांच्या मृत्यूनंतर श्री. वि. गो. खोबरेकर अशा पाच जणांची एक समिती नेमली. तिच्या मुंबई व पुणें ह्या दोन ठिकाणीं मिळून सात बैठकी झाल्या. या समितीनें मुंबई व पुणें ह्या ठिकाणच्या लेख्यशाला स्वतः पाहिल्या आणि समितीचे एक सभासद प्रा. ग. ह. खरे यांनीं कोल्हापूरच्या लेख्यशालेची पाहणी केली.

११. या समितीनें अनेक शिफारसी केल्या आहेत. पण त्यांतील महत्त्वाच्या व कायम स्वरूपाच्या शिफारसी अशा. १) सध्या लेख्यशालांवर जमाबंदी, सामान्य प्रशासन व शिक्षण अशा तीन खात्यांचा अधिकार चालतो; त्याऐवजीं इतर राज्यांप्रमाणें हा विभाग शिक्षण खात्याकडे सोपवावा. २) वर सांगितलेले तीन विभाग सांभाळण्याचें काम एकाच संचालकाकडे ठेवल्यानें कोणत्याही विभागाचें काम समाधानकारक रीतीनें प्रगत होणार नाहीं. म्हणून पुराभिलेख आणि पुरातत्व (व संग्रहालय) असे निदान दोन विभाग करून त्यांवर प्रत्येकी स्वतंत्र संचालक नेमावा. ३) मुंबईच्या दमट हवेचा विचार करतां तेथें असलेल्या अभिलेखांचें आयुष्य कमी होण्याचा धोका आहे. म्हणून मुंबईची लेख्यशाला शक्य तितक्या त्वरेनें हलवून ती पुण्यास न्यावी व तेथें तिजसाठीं एलिएनेशन कचेरीजवळच प्रशस्त वास्तू बांधावी. ४) प्रत्येक लेख्यशालेंत नेमके किती कागद आहेत हें आज कोणालाही सांगतां येत नाहीं. यामुळें या लेख्यशालांतील एखादा कागद कोणत्याही कारणानें गळबटला तर त्याचा शोध घेणें शक्य होत नाहीं. म्हणून या सर्व कागदांवर हिशेबाला सोईचें जाईल अशा तऱ्हेनें पण अत्यंत त्वरेनें क्रमांक घालावे. ५) मुंबई व पुणें येथील लेख्यशालांच्या

मार्गदर्शिका आहेत; पण त्या फार जुन्या झाल्या आहेत आणि शिवाय त्या अगदीं त्रोटकही आहेत. कोल्हापूरच्या लेख्यशालेची तर मार्गदर्शिकाही नाहीं. तरी सर्वत्र लेख्यशालांच्या विस्तृत अशा मार्गदर्शिका तयार कराव्या. ६) अशा मार्गदर्शिका तयार केल्या तरीही तेथील पत्रसंख्या एवढी मोठी आहे कीं, नवीन संशोधकाला लेख्यशालेच्या कोणत्या भागांत नेमके कोणत्या प्रकारचे कागद मिळतील हें समजणें शक्य होणार नाहीं. म्हणून सध्या मुंबई, पुणें, कोल्हापूर ह्या तीन ठिकाणीं जाणते संशोधक–अधीक्षक नेमावे या लेख्यशाला विभागातर्फे संशोधनाचें, सूचीकरणाचें किंवा अशाच तऱ्हेचें आणखी जें कांहीं कार्य चालेल त्यावर लक्ष ठेवण्याचें व त्यांत मार्गदर्शन करण्याचें कामही अधीक्षकांवर सोपवावें. ७) ह्या लेख्यशालांचा संशोधकांना उत्तम उपयोग व्हावयाचा असेल तर तेथील कागदपत्रांच्या हरएक प्रकारच्या सूची करणें आवश्यक आहे. पूर्वीच्या मुंबई प्रांताच्या शासनानें किंवा सध्याच्या महाराष्ट्र शासनानें या बाबतींत विशेष प्रगती केलेली आढळत नाहीं. म्हणून आतां तरी जागे होऊन आवश्यक तितकीं माणसें कामास लावून सूची करण्याचें काम अंगावर घेतलें पाहिजे व तें शक्य त्या त्वरेनें पार पाडलें पाहिजे. ८) या कार्यासाठीं लागणारा पैसा नियमितपणें उपलब्ध व्हावा म्हणून पुराभिलेख विभागाचा पुरातत्व विभागाप्रमाणेंच पंचवार्षिक योजनांत समावेश करावा.

१२. समितीचा वृत्तान्त इ. १९६९ डिसेंबरच्या शेवटीं महाराष्ट्र शासनाकडे पाठविला. तो आतां शासनानें प्रकाशित केला आहे. त्यांतील वर दिलेल्या शिफारशींस अनुसरून महाराष्ट्र शासनानें काय केलें तें पुढें देतों. अजून प्रत्येक विभागावर स्वतंत्र संचालक नेमलेला नाहीं. हा विभाग योजनांत समाविष्ट केलेला नाहीं. प्रत्येक लेख्यशालेच्या प्रत्येक कार्यालयांत तृतीय श्रेणींतील कामगारांचीं नव्यानें कांहीं भरती केली आहे. पण अद्याप कोठेंही अधीक्षक नेमलेले नाहींत. पुण्याच्या लेख्यशालेंतील शाहू दप्तराच्या सूचीचे सुमारें एक हजार डबल रॉयल पृष्ठांचे दोन खंड व कोल्हापूरच्या लेख्यशालेंतील निवडी दप्तराचा एक खंड असे तीन सूची-

खंड प्रकाशित केले आहेत. मुंबईंतील लेख्यशालेचा एक सूची खंड सुमारें १५ वर्षांमागें प्रकाशित झाला आहे. कागदपत्रांचा विभाग अद्याप शिक्षणखात्याकडे सर्वस्वी सोपविलेला नाहीं. कागदपत्रांची क्रमांकांसह मोजदाद चालू केली कीं नाहीं हें मला समजलेलें नाहीं. गेल्या पंचवीस वर्षांत त्या जोड विभागानें आणखी कांहीं प्रकाशनें केलीं आहेत. पण त्यांचा या समितीच्या शिफारशींशीं संबंध नसल्यामुळें त्यांचें परिगणन येथें केलेलें नाहीं.

१३. पृ. २७१. १३ व्या परिच्छेदांत मी वेदोक्ताविषयीं थोडे विचार प्रगट केले आहेत. मूळ अध्यक्षीय भाषणांत प्रगट केलेले माझे कांहीं विचार, तें भाषण छापतांना काढून टाकलेले आढळले; त्या भाषणाची संपूर्ण प्रत मजपाशीं नव्हती; त्रुटीत होती. तीवरून मूळ भाषणांतील गाळण्यांत आलेला कांहीं भाग मी जेथल्या तेथें घातला. तथापि मूळ भाषणांत असलेला पण छापण्यांत गाळलेला एक भाग कांहीं केल्या सापडेना; शेवटीं नुकताच तो सापडला. रा. ६।४४४ या पत्रांत प्रभूंविरुद्ध झालेल्या ९ ग्रामण्यांचें परिगणन केलें आहे. त्यांचा तपशील दिला आहे त्यावरून हीं ग्रामण्यें बहूवंशीं वेदोक्त कर्में व इतर आचार यांविषयीं होतीं यांत शंका उरत नाहीं. त्यांतील पहिल्या ग्रामण्याचा काळ श. १३६१ हा दिला आहे, तर शेवटच्या ग्रामण्याचा समय १७४५ शक आहे. पहिलें ग्रामण्य फार जुनें दाखविल्यामुळें शंकनीय वाटतें. दुसऱ्याचा समय दिलेला नाहीं. पण तें कोकणांत झाल्याचें सांगितलें आहे. उरलेल्या सात-ग्रामण्यांपैकीं पाचांत कालोल्लेख आहेत. दोहोंचा काल ठरवितां येण्यासारखा आहे. ३ व ४ क्रमांकांचीं ग्रामण्यें शिवकालांतील असून तिसऱ्यांत बाळाजी आवजी चिटणीसाचा मुलगा आवजी याच्या मुंजीविषयीं नोंद आहे. याचाच विचार कायस्थपरभू-निर्णय प्रकरणांत आला आहे. पण तेथें बाळाजीचा मुलगा खंडोजी याच्या मुंजीच्या प्रकरणीं ग्रामण्य झालें म्हणून सांगितलें आहे.

---

# सूची

या सूचींत, आरंभीं सानुस्वार अक्षर असलेल्या नोंदींची स्वतंत्र बाराखडी केली असून मुख्य नोंदीपुढें अर्धविराम घालून पोट नोंद दाखविली आहे.

